# स्वामी विवेकानंद

यांचे



# समग्र ग्रंथ.




षष्ठम खंड.

१९१७.

Printed and published by G. N. Kulkarni,
at his Karnatak Printing Press,
No. 434, Thakurdwar,
Bombay.

देवाच्या प्रसादें करा रे भोजन ।
व्हाल कोण कोण अधिकारी ते ॥
ब्रह्मादिकांसी हें दुर्लभ उच्छिष्ट ।
नका मानूं वीट ब्रह्मरसीं ॥
अवघियांपुरतें वोसंडलें पात्र ।
अधिकार सर्वत्र आहे येथें ॥
इच्छादानीं येथें वळला समर्थ ।
अवघेंचि आर्त पुरवितो ॥
सरे येथें नाहीं ऐसें कदाकाळीं ।
पुढती वाटे कवळीं घ्यावें ऐसें ॥
तुका म्हणे पाक लक्ष्मीच्या हातें
कामारी सांगातें निरुपम ॥

# कळकळीची प्रार्थना.

आज सुमारें एक वर्षानंतर प्रस्तुत मालेचा सहावा खंड वाचकांच्या हातीं देण्याचा सुयोग प्राप्त झाला याबद्दल आह्मांस आनंद होत आहे.

युरोपांतील महायुद्धामुळें इकडील सर्व धंद्यांस ज्या भयंकर अडचणी आरंभापासूनच जाणवूं लागल्या होत्या, त्यांत दिवसेंदिवस अधिकाधिक भरच पडत गेली. छपाईच्या सर्व जिनसांचे भाव कल्पनेपलीकडे वाढल्यामुळें सर्व ग्रंथप्रकाशकांस आपल्या पुस्तकांच्या किमती वाढविणें भाग पडलें; परंतु अशी स्थिति असतांही किंमत मुळींच न वाढवितां दोन खंड आम्ही आमच्या वाचकांच्या हातीं दिले. प्रत्येक खंडाच्या प्रस्तावनेंत वेळोवेळीं विनंती केल्याप्रमाणें आमच्या आश्रयदात्यांपैकीं प्रत्येकानें एकदोन नवीन वर्गणीदार मिळवून देऊन वर्गणीदारांच्या संख्येंत बरीचशी भर घातली असती तर पूर्वीच्याच किमतींत ही माला आम्हांस चालू ठेवितां आली असती. प्रस्तुत कार्य आमच्या हातून शेवटास जावें अशी पुष्कळांची इच्छा आहे. 'ही माला बंद करूं नका' अशा अर्थाचीं शेंकडों पत्रें आमच्या वर्गणीदारांकडून आम्हांस आलीं आहेत. त्यांच्या या सदिच्छेबद्दल व उत्तेजनाबद्दल आह्मी त्यांचे आभारी आहों; परंतु थोडयाशा वर्गणीदारांच्या केवळ सदिच्छेवरच प्रस्तुतसारखें अवघड कार्य शेवटास जाणें शक्य नाहीं. आमच्या मेहनतीचा योग्य किंवा कांहींही मोबदला आम्हांस न मिळाला तर अल्पसंतुष्ट राहून किंवा निरपेक्षतेनें आह्मी हें कार्य शेवटास नेण्यास तयार होऊं; परंतु बाजारभाव आमच्या हातचे नसल्यामुळें हातीं घेतलेलें काम शेवटास नेणेंच असेल तर पडेल ती किंमत देण्याशिवाय आह्मांस गत्यंतर नाहीं; याकरितां या खंडापासून प्रत्येकीं चार आण्यांनीं किंमत वाढविणें आह्मांस अगदीं निरुपायानें भाग झालें आहे. सर्वत्र किंमतींची वाढ झाली आहे हें लक्ष्यांत घेऊन आमचे वर्गणीदार नाराज होणार नाहींत अशी आह्मांस आशा आहे. युद्धसमाप्तीनंतर बाजारभाव पूर्वस्थितीवर येतांच पुढील खंड पूर्वीच्याच किंमतींत देण्यांत येतील.

आमच्या प्रिय वर्गणीदारांनीं थोडी मेहनत घेऊन प्रत्येकीं एकदोन नवीन वर्गणीदार मिळवून द्यावे ह्मणून आह्मी प्रत्येक वेळीं विनंती करीत असतों; परंतु तिचा फारसा उपयोग होत नाहीं हें कळविण्यास आह्मांस फार खेद होतो. कोणत्याही सांपत्तिक मोबदल्याची इच्छा मनांत न बाळगतां **स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ** अर्थात् त्यांच्या मुखांतून निघालेले हे विजयध्वनि महाराष्ट्रवाचकांस सादर करावे हाच एक, हें काम हातीं घेण्याचा आमचा शुद्ध हेतु होता व अझूनही आहे. वास्तविक हें काम सर्व महाराष्ट्रीय वाचकांचें असल्यामुळें त्या सर्वांना या ग्रंथप्रकाशनाचा सारखाच अभिमान असावयास पाहिजे; परंतु प्रत्येक खेपेस ' एकदोन नवीन वर्गणीदार द्या ' अशी निष्फळ याचना करणें भाग पडावें याबद्दल मात्र आह्मांस अधिक वाईट वाटतें. सर्वांनीं हें काम आपलेंच आहे असें समजून व आह्मी हातीं घेतलेल्या या कार्यास मनापासून हातभार लावून माला शेवटास नेण्याच्या यशांत सहाय्यभूत व्हावें अशी सर्वांस नम्र प्रार्थना आहे. याही खेपेस आमच्या विनंतीचा कांहींच उपयोग झाला नाहीं व बाजारभाव आज आहे त्याच स्थितींत कायम राहिला—शक्य नसलें तरी—असें मानलें तरी आज असलेल्या वर्गणीदारांच्या संख्येवरून पाहतां प्रत्येकीं चार आणे वाढवूनसुद्धां पुढील खंड प्रसिद्ध करतां येणें शक्य दिसत नाहीं. स्वामी विवेकानंदांच्या ग्रंथांसारख्या स्वयंसिद्ध उत्कृष्ट आणि जगन्मान्य वाङ्मयास जीव धरून राहण्यापुरते सुद्धां वर्गणीदार न मिळाल्यामुळें त्याचें प्रकाशन बंद करावें लागणें हें मात्र महाराष्ट्रीय वाचकांस खास शोभण्याजोगें नाहीं; आणि ह्मणूनच आह्मी आजपर्यंत केव्हांही न केलेली अशी ही लांबलचक आणि **कळकळीची प्रार्थना** आज करीत आहों. तर मुळींच हयगय न करितां आपल्या मित्रमंडळीपैकीं कोणी वर्गणीदार होण्यास कबूल असतील त्यांचीं नांवें कळवून त्यांजकडे पहिल्यापासून किंवा त्यांची मर्जी असेल तेथपासून खंड पाठविण्याविषयीं आह्मांस एका कार्डानें कळविण्याची आमच्या आश्रयदात्यांनीं अवश्य तसदी घ्यावी.

**प्रकाशक.**

# अनुक्रमणिका.



# स्वामी विवेकानंद यांचे समग्र ग्रंथ

## षष्ठम खंड.

## वर्तमानपत्रकारांशीं मुलाखती.

नंबर १.

### लंडनांत आलेला हिंदुस्थानांतील एक योगी.

वेस्टमिन्स्टर गॅझेट, २३ आक्टोबर १८९५.

हिंदुस्थानांतील तत्त्वज्ञानाचा पगडा गेलीं कांहीं वर्षें इकडील लोकांवर अधिकाधिक बसत असून त्यासंबंधीं लोकांचें कुतूहलही वाढत्या प्रमाणावर दिसत आहे. आजपर्यंत हिंदुतत्त्वज्ञानासंबंधीं जे लेख इकडे प्रसिद्ध झाले त्यांचे लेखक पाश्चात्य शिक्षणांत व पाश्चात्य विचारसरणींत तयार झालेले असल्यामुळें वेदान्तांतील खरीं महत्वाचीं रहस्यें त्यांच्या लेखांत फारशीं आढळून येत नाहींत, आणि जीं कांहीं थोडीं रहस्यें पाश्चात्य लोकांस उपलब्ध झालीं आहेत तींही कांहीं विविक्षित व्यक्तींकडूनच प्राप्त झालेलीं आहेत. केवळ भाषापंडितांच्या उपयोगासाठीं केलेलीं भाषांतरें इतकीं बोजड आहेत कीं, त्यांतून खरा अर्थ शोधून काढण्याचे श्रम करण्याचें धैर्य फारकरून कोणास होत नाहीं. पौर्वात्य विचारपरंपरेंत मुरलेल्या वाचकास या मूल ग्रंथांपासून जें उच्च ज्ञान प्राप्त होतें, तें पाश्चात्यांस भाषांतराच्या द्वारें मिळत नाहीं.

अशी स्थिति असल्यामुळें आमचा बातमीदार, स्वामी विवेकानंद यांस भेटावयास गेला, तेव्हां आपणास कशा प्रकारची माहिती मिळेल याबद्दल त्याच्या मनांत बरेंचसें कुतूहल असल्यास नवल नाहीं. स्वामी विवेकानंद हे एक हिंदु योगी आहेत. युगानयुगें जें ज्ञान योगी आणि संन्यासी यांनीं आजपर्यंत हिंदुस्थानांत जतन करून ठेविलें आहे, त्याचें ज्ञान पाश्चात्य लोकांस करून देण्याचें कार्य स्वामी विवेकानंद यांनीं मोठया धैर्यानें पत्करिलें आहे. याच उद्देशानें काल रात्रीं त्यांनीं प्रिन्सेस हॉलमध्यें एक व्याख्यानही दिलें.

डोक्याला फेटा बांधलेले आणि शांत व दयार्द्र मुद्रेचे अशा स्वामींकडे पाहून कोणाच्याही मनांत पूज्यभाव ताबडतोब उत्पन्न होतो.

आमचा बातमीदार ह्मणतो, स्वामीजींच्या नांवाचा अर्थ काय ? असा प्रश्न मी त्यांस विचारला तेव्हां स्वामी ह्मणाले, माझ्या नांवांतील पहिलें पद विवेक असें असून तें त्यागाचें दर्शक आहे. ‘ विवेकानंद ’ याचा अर्थ ‘ विवेकापासून होणारा आनंद ’ असा आहे.

“ स्वामी महाराज, सामान्य लौकिक मार्गाचा त्याग आपण कां केला ? ”

“ लहानपणापासून धर्म आणि तत्त्वज्ञान या विषयांची मला अत्यंत आवड होती. त्यागी अथवा संन्यासी बनणें हेंच मानवी जीविताचें उच्चतम ध्येय आहे असें आमच्या शास्त्रांनीं सांगितलें आहे. अशाप्रकारचे विचार माझ्या मनांत लहानपणापासूनच घोळत होते. यामुळें रामकृष्ण परमहंसासारख्या सद्गुरूची गांठ पडतांच संन्यासी होण्याचा माझा निश्चय कायम झाला. श्रीरामकृष्ण परमहंस हे स्वतः पूर्ण त्यागी होते. माझें ध्येय त्यांच्या ठिकाणीं मला मूर्तिमंत आढळून आलें. ”

“ तर मग त्यांनीं एखादा नवा पंथ काढिला असून त्याचाच पुरस्कार आपण करीत आहां काय ? ”

“ छे छे ! मुळींच नाहीं; उलटपक्षीं अनेक पंथवाल्यांतील भेद नाहींसे करण्यांतच त्यांनीं आपलें सारें आयुष्य खर्चिलें. त्यांनीं कोणताही पंथ स्थापिला नाहीं. पूर्ण विचारस्वातंत्र्य सर्वांस असावें असें त्यांचें ह्मणणें होतें; आणि त्यांनीं या दिशेनेंच सारी खटपट केली. ते महायोगी होते. ”

" तर मग या देशांतील कोणत्याही पंथाशीं अथवा मंडळीशीं तुमचा संबंध नाहीं काय ? थिऑसॉफिकल् किंवा ख्रिश्चन सायंटिस्ट अशासारख्या कोणत्याही संस्थेशीं आपला मुळींच संबंध नाहीं काय ? "

" मुळींच नाहीं ! " ( स्वामीजी अगदीं स्पष्ट स्वरांत आणि ठांसून बोलत होते. त्यांच्या चेहऱ्यावर सरळपणाचें आणि खुल्या दिलाचें तेज चमकत होतें. ) माझ्या सद्गुरूंच्या द्वारा आमच्या प्राचीन ग्रंथांतील ज्ञानाचा जो कांहीं अर्थ मला समजला तोच मी सांगत असतों. मला कांहीं अलौकिक रीतीनें ज्ञानप्राप्ति झाली आहे असें मी ह्मणत नाहीं. माझ्या सांगण्यांतील जो कांहीं भाग विशाल बुद्धीच्या आणि विचारी पुरुषांस पसंत पडेल तेवढाच जरी त्यांनीं ग्रहण केला तरी माझ्या श्रमांचें सार्थक झालें. भक्ति, ज्ञान अथवा योग यांचें शिक्षण कोणत्या तरी मूर्त रूपानें द्यावें हाच साऱ्या धर्मांचा उद्देश आहे. वेदान्ततत्त्वज्ञान हें अमूर्त शास्त्र असून त्याच्या पोटीं या साऱ्या धर्मपद्धतींचा अंतर्भाव होतो. हें वेदान्ताचें अमूर्त तत्त्वज्ञान स्पष्ट करणें इतकेंच माझें कार्य आहे. स्वतःच्या परिस्थित्यनुरूप त्याला मूर्तस्वरूप कसें द्यावें हें मी ज्याचें त्याजवर सोंपवितों. प्रत्येक मनुष्याला जे सामान्य अनुभव येतात, त्यांच्याच द्वारें हीं तत्त्वें मी प्रथम विशद करतों; आणि कांहीं प्रसंगीं ग्रंथांचा आधार मला द्यावा लागला तर मी अशा ग्रंथांचा देतों कीं ते सर्व ग्रंथ उपलब्ध असून त्यांचा अभ्यास ज्याचा त्यानें करण्यास माझी मुळींच हरकत नाहीं. गुप्त महात्म्यांनीं दिलेलें ज्ञान जगास देणारा मी त्यांचा प्रत्यक्ष संदेशवाहक आहें असेंही मी सांगत नाहीं हें प्रथम लक्ष्यांत ठेवा. तसेंच माझें ज्ञान कांहीं गुप्त ग्रंथांतून अथवा लिखितांतून मी पैदा केलें आहे अशीही प्रौढी मी मिरवीत नाहीं. गुप्त मंडळ्यांचें ज्ञान जगापुढें मांडणारा संदेशवाहक मी नाहीं. असल्या प्रकारच्या संस्थांपासून कांहीं फायदा होतो असेंही मला वाटत नाहीं. सत्याला कशाचाही आधार लागत नाहीं; आणि दिवसाढवळ्या तें चव्हाठ्यावर मांडलें तरी तें भंग पावत नाहीं."

" येथें एखादी नवी संस्था अथवा मंडळी स्थापन करण्याचा आपला उद्देश नाहीं असेंच म्हणावयाचें काय ?"

" मला कसलीही संस्था अथवा मंडळी स्थापावयाची नाहीं. प्रत्येक व्यक्तीच्या अंत:करणांत जें सत्य गुप्तपणें वास करीत आहे आणि जें सर्वांस

सारखेंच उपलब्ध आहे, त्याचीच ओळख सर्वांस पटवावयाची हें माझें काम आहे. सत्य वस्तूची ज्यांस ओळख पटली आहे अशीं मूठभर माणसें सुद्धां आजमितीस सारें जग इकडचें तिकडे करतील. पूर्वकाळीं अशा प्रकारच्या एकेकट्या व्यक्तींनेंही सारें जग हालविलें आहे."

"आपण थेट हिंदुस्थानांतूनच येथें आलां काय?"

"नाहीं. १८९३ सालीं शिकागो येथें जी महाधर्म परिषद् भरली होती, तींत माझ्याकडे हिंदुधर्माचें प्रतिनिधित्व होतें. त्या वेळेपासून अमेरिकेंतील संयुक्त संस्थानांतील निरनिराळ्या शहरीं फिरून मी व्याख्यानें दिलीं. या विषयाची गोडी अमेरिकन श्रोत्यांस बरीच असून त्यांनीं स्नेहपूर्वक माझें स्वागत केलें असें माझ्या अनुभवास आलें. माझें कार्य तेथें इतकें फलद्रूप झालें आहे कीं, तिकडे आतां लौकरच मला परत जावें लागेल."

"स्वामी महाराज, पाश्चात्य धर्मासंबंधीं आपल्या मनाचा कल कसा काय आहे?"

"मी जें तत्त्वज्ञान सांगतों त्याच्या पायावर जगांतील कोणत्याही धर्माची अथवा धर्मपंथाची उभारणी करतां येण्यासारखी आहे. सर्व धर्माबद्दल माझ्या मनांत अत्यंत सहानुकंपा आहे. कोणत्याही धर्माविरुद्ध मी एक अक्षरही बोलत नाहीं. माझा कटाक्ष मुख्यतः व्यक्तीच्या सुधारणेवर आहे. प्रत्येक व्यक्ति ईश्वरांश असून हें सत्य प्रत्येक व्यक्तीनें ओळखावें हाच माझ्या शिक्षणाचा मुख्य रोंख आहे. वास्तविक पाहतां प्रत्येक धर्माचा रोंख असाच आहे. कांहीं धर्मांत ही गोष्ट उघडपणें सांगितली असेल अथवा कांहींत तीं स्पष्टपणें सांगितली नसेल; तथापि साऱ्यांचा मुद्दा तोच आहे."

"हा उद्देश सिद्धीस नेण्यासाठीं आपण कोणते उपाय योजणार?"

"वर सांगितलेलीं तत्त्वें लोकांच्या मनांत व्यक्तिशः ठसवावीं असा माझा हेतु आहे. हीं तत्त्वें त्यांच्या मनांत ठसलीं ह्मणजे त्यांनीं तीं इतरांच्याही मनांत ठसवावीं अशाबद्दल त्यांस प्रोत्साहन द्यावें अशी माझी इच्छा आहे. हीं तत्त्वें त्यांनीं कोणत्या स्वरूपानें लोकांसमोर मांडावीं याचा विचार मी त्यांचा त्यांजवरच सोंपविणार आहें. सत्याचा अखेरीस जय होईल याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. या कामीं माझे एक दोन मित्र मला सहाय्य करणार आहेत. या कार्याची बाह्य व्यवस्था या माझ्या मित्रांकडे

मी सोंपविली आहे. पिक्याडिली मधील प्रिन्सेस हॉलमध्यें बावीस आक्टोवर रोजीं माझ्या व्याख्यानाची व्यवस्था त्यांनीं केली आहे; याबद्दल वर्तमानपत्रांतून जाहिरातीही दिल्या आहेत. माझ्या व्याख्यानाचा विषय ‘ आत्मज्ञान ’ हा आहे. यानंतर दुसरे जे कांहीं मार्ग सांपडतील त्या मार्गांनीं पुढें पाऊल टाकण्याची माझी तयारी आहे. उदाहरणार्थ कोणी घरगुती व्याख्यानाची व्यवस्था केली तर घरोघर व्याख्यानें द्यावयाचीं, कोणीं या विषयासंबंधीं पत्रें लिहिलीं तर त्यांचीं उत्तरें द्यावयाचीं आणि तसेंच संभाषणें करावयाचीं असे मार्ग मी योजिले आहेत. चालू काळ वणिग्वृत्तीचा आहे ही गोष्ट खरी; तथापि हा उद्योग द्रव्यप्राप्तीस्तव मी स्वीकारला नाहीं इतकें सांगावयास हरकत नाहीं. ”

एवढें संभाषण झाल्यावर बातमीदार निघून गेला.

## नंबर २.

## भरतभूमीचा संदेश.

सन्डे टाइम्स, लंडन १८९६.

इंग्लंडांतून ख्रिस्तीधर्मप्रचारक हिंदुस्थानांत जात असतात, ही गोष्ट इंग्रज लोकांस पक्की माहीत आहेच. ‘ तुम्हीं जगभर फिरा आणि हा धर्मसंदेश सर्वांस सांगा ’ या येशू ख्रिस्ताच्या आज्ञेचें पालन इंग्रज लोक पूर्णपणें करीत असतात. ही ख्रिस्ताची आज्ञा पाळण्यांत एकही पंथ चुकारपणा करीत नाहीं; पण हिंदुस्थानांतूनही इंग्लंडांत धर्मप्रचारक येत असतात ही गोष्ट मात्र आमच्या लोकांस फारशी ठाऊक नसेल.

केवळ यदृच्छेनें स्वामी विवेकानंद यांच्यांशीं माझी भेट झाली. सध्यां ते सेंट जार्जेस रस्त्यावरील नं० ६३ च्या घरांत राहत आहेत. इंग्लंडांत ते कशासाठीं आले आहेत, हें मला जाणून घ्यावयाचें होतें आणि हें सांगण्यास त्यांचीही कांहीं हरकत न दिसल्यामुळें मी त्यांच्याशीं भाषणाचा उपक्रम केला. माझी विनंति त्यांनीं तावडतोब मान्य केली, या गोष्टीचें मला मोठें नवल वाटलें आणि मी त्यांस तसें बोलूनही दाखविलें. तेव्हां ते ह्मणाले,

" वर्तमानपत्रांच्या बातमीदारांच्या भेटी घेणें ही गोष्ट अमेरिकेंतच माझ्या आंगवळणीं पडली आहे. हिंदुस्थानांत या चालीचा फारसा प्रसार नाहीं; तथापि ज्या देशांत मी जातों तेथें अस्तित्वांत असणाऱ्या साधनांचा उपयोग माझ्या कार्याकडे मी करून घेऊं नये असें नाहीं. माझा संदेश मला सर्वांस सांगावयाचा आहे. सर्व प्रकारच्या उपलब्ध साधनांनीं त्याचा प्रसार व्हावा हीच माझी इच्छा आहे. १८९३ सालीं शिकागो येथें महाधर्म परिषद् भरली, त्या वेळीं हिंदुधर्माचा प्रतिनिधी या नात्यानें मी तींत हजर राहिलों होतों. अमेरिकेंत माझ्या कार्यास थोडेंबहुत यश आलें असें ह्मणण्यास हरकत नाहीं असें मला वाटतें. शिकागोशिवाय इतर मोठमोठ्या शहरांतूनही मला निमंत्रणें आलीं होतीं. गेल्या सालचा उन्हाळा मी इंग्लंडांत काढला. तेवढ्या काळावांचून बाकीचा सारा वेळ मी अमेरिकेंतच होतों. एकंदरींत अमेरिकेंत मी सुमारें तीन वर्षें होतों. माझ्या मतें अमेरिकन संस्कृति फार मोठ्या दर्जाची आहे. नवीन कल्पनांचें ग्रहण करण्यास अमेरिकन जनता फार उत्सुक आहे असें मला आढळून आलें. एखादी कल्पना केवळ नवीन ह्मणून तिचा त्याग कोणीही करीत नाहीं. यथायोग्य परीक्षण झाल्यानंतर ती कल्पना लोकांस ग्राह्य होते; अथवा ती हिणकस ठरल्यास लोक तिचा त्याग करतात.

" इंग्लंडांत याहून कांहीं वेगळाच प्रकार असावा असा आपल्या ह्मणण्याचा आशय दिसतो. "

" होय, इंग्लंडांतील संस्कृति अमेरिकन संस्कृतीहून अधिक जुनी आहे. यामुळें अनेक शतकांचीं पुटें तिजवर बसलीं आहेत. विशेषतः इंग्रज लोकांत दृढमूल होऊन बसलेल्या कांहीं पूर्वग्रहांचें उच्चाटन प्रथम करणें भाग पडेल. इंग्रज लोकांशीं कोणालाही या कामीं बुद्धिवाद करावयाचा झाला तर त्यानें ही गोष्ट प्रथम लक्ष्यांत ठेविली पाहिजे. "

" हा प्रवाद पूर्वींही माझ्या कानीं आला आहे. अमेरिकेंत आपण कोणताही नवा पंथ अथवा धर्म स्थापन केला नाहीं असें मी ऐकतों. "

" ही गोष्ट खरी आहे. धर्मपंथांचा सुकाळ करीत बसणें ही गोष्ट आमच्या मूलतत्त्वाच्याच विरुद्ध आहे; आणि खरें ह्मणाल तर या पंथांना सांप्रत काळीं ऊत आलेला दिसतो. मग त्यांत आणखी भर कशाला ? याशिवाय

एखादा पंथ स्थापावयाचें ह्मटलें तर तो पुढें चालविण्यास व्यक्तीही तयार केल्या पाहिजेत. आतां ज्यांनीं चतुर्थाश्रम स्वीकारला असेल त्यांना ही गोष्ट करणें शक्य नाहीं; कारण त्यांनीं सर्व लौकिक वस्तूंचा त्याग केलेला असतो."

" धर्मांचा तुलनात्मक अभ्यास करण्याची पद्धति लोकांस शिकवावी असा तुमचा इरादा आहे काय ? "

" सर्व धर्मांचें मुख्य तत्त्व लोकांस सांगावें असें ह्मणणें अधिक सयुक्तिक आहे. निरनिराळ्या धमात जे निरर्थक भाग सांचले आहेत, ते वेगळे काढून त्यांतील फक्त रहस्य लोकांच्या नजरेस प्रमुखत्वानें येईल असें करणें हें माझें कार्य आहे. श्रीरामकृष्ण परमहंसांचा मी एक शिष्य आहें. ते पूर्ण संन्यासी होते. त्यांचीं सर्व मतें मी आपलींशीं केलीं आहेत. इतर धर्मांचें परीक्षण करीत बसावें असा प्रकार श्रीरामकृष्णांनीं कधींही केला नाहीं. निरनिराळ्या धर्मांतील तत्त्वांचें उद्‌घाटन करून त्यांचा प्रत्यक्ष आचार कसा करावा हेंच त्यांनीं लोकांस शिकविलें. वादविवाद करून कलह वाढविणें हें त्यांस अगदीं असंमत होतें. जग हें प्रेमाच्या आधारावर चाललें आहे असा त्यांचा सिद्धांत असल्यामुळें कसल्याही प्रकारच्या वादविवादास अथव भांडणास त्यांनीं थारा दिला नाहीं. हिंदुधर्म परधर्मियांचा केव्हांही छळ करीत नाहीं ही गोष्ट तुह्मांस ठाऊक आहेच. हिंदुस्थानांत सर्व धर्म शांततेनें आणि सहकारितेनें एकत्र वास करितात. रक्तपात आणि हाणामाऱ्या या मुसलमानांनीं आपल्याबरोबर आणल्या; पण तोंपर्यंत हिंदुस्थानांत निस्सीम शांतता नांदत होती. निरीश्वरवादी जैन आमच्या देशांत सुखानें नांदत होते आणि आजमितीसही नांदत आहेत. निरुपद्रवीपणा हा आम्हां लोकांचा मोठा गुण आहे. यांतच खऱ्या सामर्थ्याचें रहस्य आहे, असें भरतभूमीनें आपल्या उदाहरणानें सिद्ध केलें आहे. तंटेबखेडे आणि मारामाऱ्या हीं दौर्बल्याचीं लक्षणें आहेत. "

" टॉलस्टॉय यांच्या मतासारखेंच हें मत दिसतें. अशा प्रकारची वर्तणूक कदाचित् व्यक्तीनें केल्यास चालेल. वास्तविक व्यक्तीला सुद्धां अशा प्रकारच्या वर्तणुकीपासून कितपत फायदा होईल याबद्दल मला स्वत:ला शंकाच आहे; आणि राष्ट्रांस तर अशा प्रकारची वर्तणूक यत्किंचित् तरी उपयोगी पडेल असें तुह्मांस वाटतें काय ? "

" होय; अशा प्रकारच्या वागणुकीनें राष्ट्रांचेंही कल्याण होईल यांत संशय नाहीं. भरतभूमीस परकीयांनीं जिंकावें आणि नंतर तिनें परकीयांस जिंकावें अशीच तिची कर्मरेषा होती. मुसलमानांसंबंधीं असाच प्रकार घडून आला. मुसलमानांनीं हिंदुस्थानांत प्रथम आपलें राज्य स्थापिलें;आणि नंतर ते हिंदूंचेच अनुयायी बनले. सुशिक्षित मुसलमान सुन्नी पंथाचे आहेत. त्या पंथांत आणि हिंदुधर्मांत फारसा भेद नाहीं. महंमदीय संस्कृतींत हिंदुतत्त्वज्ञानानें आपला प्रवेश केला आहे. अशा रीतीनें मुसलमान हिंदूंचे शिष्य बनले. मोगल बादशहा अकबर यानें जवळ जवळ हिंदुधर्माचा स्वीकार केला होता. अशाच रीतीनें इंग्लंडही जिंकलें जाईल. आज इंग्रज लोक तरवारीच्या बळावर तेथें राज्य करीत आहेत; पण तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत तलवारीचा यत्किंचितही उपयोग नाहीं. हिंदुतत्त्वज्ञानाचा प्रसार कसा होत जाणार याबद्दल शॉपेनहॉर यानें काढलेले उद्गार तुम्हांस ठाऊक असतीलच. जुन्या अज्ञान युगाचा काळ संपत असतां ग्रीक आणि लॅटिन् संस्कृतीच्या पुनरुदयानें साऱ्या युरोपांत जी क्रांति घडून आली तशाच प्रकारची क्रांति हिंदुतत्त्वज्ञान युरोपांत घडवून आणील, असें शॉपेनहॉरचें भविष्य आहे. "

" माफ करा स्वामी महाराज; पण अद्यापि तरी असा प्रकार घडण्याचें एकही आगाऊ चिन्ह दिसत नाहीं. "

" कदाचित् तसें चिन्ह आज स्पष्ट दिसत नसेल. " स्वामी गंभीरपणानें म्हणाले; " ग्रीक आणि लॅटिन संस्कृतीचा पुनरुदय होऊं लागला तेव्हांही पुष्कळ लोकांना या उदयाचीं चिन्हें दिसत नव्हतीं. या संस्कृतीचा पगडा प्रत्यक्ष दिसूं लागल्यानंतरही ती गोष्ट पुष्कळांच्या ध्यानीं आली नाहीं; पण काळ कसा चालला आहे हें जाणण्याचें ज्ञान ज्यास आहे अशा लोकांच्या लक्ष्यांत ही गोष्ट येणें अशक्य नाहीं. पौर्वात्यांच्या प्राचीन संस्कृतीचा अभ्यास अलीकडे वाढत्या प्रमाणावर सुरू झाला आहे. आज फक्त पंडितच हा अभ्यास करीत आहेत. त्यांनीं केलेलें कार्य शुष्क आणि बोजड आहे असेंही बाह्य दृष्टीनें दिसत असेल; पण हळू हळू त्यांच्या या कार्यावर अधिक अधिक प्रकाश पडत जाईल; आणि कालेंकरून या ज्ञानाचा प्रसार सामान्य जनतेपर्यंत होईल. "

" अशा रीतीनें भविष्यत् कालीं भरतभूमी ही जेत्यांची भूमि होईल, असेंच आपलें ह्मणणें ना ? तथापि आपल्या तत्त्वज्ञानाचा प्रसार करण्याकरितां हिंदुस्थान देश कोणीहीं प्रचारक बाहेर पाठवीत नाहीं. सारें जग शिष्यत्वाच्या नात्यानें भरतभूमीच्या पायापाशीं येईपर्यंत ती वाट पाहणार काय ? "

" पूर्व काळीं हिंदुस्थानांतून अनेक धर्मप्रचारक बाह्यदेशीं जात असत. इंग्लंडनें ख्रिस्तीधर्माचा स्वीकार करण्याच्या पूर्वी कित्येक शतकें बुद्धानें आपल्या मतांचा प्रसार करण्याकरितां आशिया खंडांतील देशांत आपले प्रचारक पाठविले होते. सांप्रतही विचारपरंपरेंत क्रांति घडून येत आहे. सध्यां या स्थितीला नुकताच कोठें आरंभ झाला आहे. कोणत्याही एका विशिष्ट धर्माचे न ह्मणविणारे असे लोक दिवसेंदिवस वाढत आहेत. सुशिक्षित वर्गात या चळवळीचा प्रसार अधिक प्रमाणावर होत आहे. कोणत्याही विशिष्ट पंथाच्या सदराखालीं नांवें न नोंदविलेले असे लोक अमेरिकेंत पुष्कळ असल्याचें गेल्या खानेसुमारीवरून दिसून येतें. कितीही वेगवेगळे धर्म झाले तरी एकाच सत्याचीं तीं अनेक रूपें आहेत. यामुळें एक तर सर्वच धर्मांचा विजय होईल अथवा सर्वच मरून जातील. जगांत भिन्न भिन्न प्रकृतीचे लोक असल्यामुळें त्या सर्वांसच उपयुक्त होतील असे निरनिराळे धर्मपंथही पाहिजेत. "

" आतां आपण मुद्यावर येत चाललों. एकच सत्य ह्मणून जें आपण आतां ह्मणालां तें कोणतें ? "

" प्रत्येक वस्तूच्या अंतर्यामीं परमेश्वराचा वास आहे हेंच तें सत्य. कोणताही प्राणी कितीही क्षुद्र दर्जाचा असला तरी त्याच्या ठिकाणींही परमेश्वराचा वास आहे. त्याच्या ठिकाणीं असलेला ईश्वरांश गुप्त असल्यामुळें तो प्रत्यक्ष नजरेस येत नाहीं. हिंदुस्थानांत झालेल्या बंडाच्या वेळची घडलेली एक गोष्ट आतां सहज माझ्या लक्ष्यांत आली ती सांगतों. एका स्वामीनें पुष्कळ वर्षेपर्यंत मौनव्रत धारण केलें होतें. बंडाच्या दिवसांत कोणी एका मुसलमानानें त्या स्वामीच्या छातींत सुरा भोंसकला. त्या खुनी मनुष्याला दुसऱ्या कांहीं माणसांनीं पकडून स्वामीपुढें आणलें आणि ते स्वामीस ह्मणाले, ' स्वामी महाराज, आपला हुकूम होण्याबरोबर या

दुष्टाचा शिरच्छेद करतों.' पुष्कळ वर्षेपर्यंत मौन धारण केलेल्या त्या स्वामीनें आपलें तोंड उघडलें आणि मरतां मरतां ह्मटलें, ' माझ्या लेंकरांनों, तुम्हीं सारे मोठी चूक करीत आहां. हा मुसलमान प्रत्यक्ष परमेश्वरच आहे. सर्व विविधतेच्या पाठीमागें एकतानताच आहे. हेंच मुख्य मध्यवर्ती सत्य आहे. या एकात्मतेला परमेश्वर, प्रेम, अल्ला, स्पिरिट्, जिहोवा यांपैकीं कोणतेंही नांव द्या. अत्यंत क्षुद्र मनुष्यापासून तों थेट एखाद्या अवतारी पुरुषापर्यंत सर्वत्र हेंच एकरूप भरून राहिलें आहे. एक मोठा बर्फमय समुद्र असून जागजागीं त्याला भोंकें पडलीं आहेत अशी कल्पना करा. यांतील प्रत्येक भोंक हें जीवात्म्यासारखें आहे. परिस्थितीप्रमाणें तें लहान अथवा मोठें आहे; आणि तें अधिकाधिक मोठें होत जाण्याची खटपट करीत आहे. "

"पाश्चात्य आणि पौर्वात्य तत्त्वज्ञानांत एक फरक माझ्या दृष्टीनें मला दिसतो. संन्यासमार्गानें व्यक्तीची उन्नति करून तिला पूर्णत्वास पोंचवावयाचें असा पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा उद्देश दिसतो. उलटपक्षीं सामाजिक पूर्णत्वाकडे जाण्याचा पाश्चात्य तत्त्वज्ञानाचा रोंख दिसतो; आणि याच उद्देशानें राजकीय आणि सामाजिक प्रश्नांचा ऊहापोह आह्मी करीत असतों. समाजाच्या उन्नतीवर आमची संस्कृति अवलंबून आहे आणि त्यायोगें ती चिरस्थायी होईल असें आह्मांस वाटतें. यास्तव व्यक्तीपेक्षां समाजाकडेच आमचें चित्त अधिक वेधलेलें असतें.

पण सामाजिक अथवा राजकीय पद्धतीही व्यक्तीच्याच चांगुलपणावर अवलंबून असतात हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. पार्लमेंटानें चांगले कायदे पास केले एवढ्याचमुळें कोणतेंही राष्ट्र मोठें अथवा चांगलें होत नाहीं; तर राष्ट्राचें महत्व व्यक्तीच्या चांगुलपणावर आणि मोठेपणावर अवलंबून असतें. केवळ सुसंघटित समाजरचनेचा विचार केला तर या बाबींत चीनदेश जगांतील दुसऱ्या कोणत्याही राष्ट्राला हार जाणार नाहीं असें मला आढळून आलें; पण वस्तुस्थिति पाहतां ती याच्या अगदीं उलट आढळून येते. चीनचें राष्ट्र सांप्रत पेंढाऱ्यांच्या राष्ट्रासारखें झालें आहे. तेथें कसल्याही समाजरचनेचा मागमूस सध्यां दिसत नाहीं. कारण, प्राचीन काळीं समाजरचनेचे जे नियम अस्तित्वांत आले, ते वागणुकींत आणण्यास लागणारी पात्रता चिनी लोकांच्या आंगीं राहिलेली नाहीं. अशा स्थितींत धर्म हा

मुळापासूनच सुधारणा करितो. अव्यवस्थेचें मूळ कारण नाहींसें करण्यास धर्म हाच एक उपाय आहे. धर्म योग्य स्थितींत असेल तर बाकीची सारी व्यवस्था आपोआप घडून येईल. "

" वस्तुमात्रांत ईश्वरांश असून तो गुप्त स्थितींत आहे हें तत्त्व व्यवहारी दृष्टया थोडेंसें अस्पष्ट दिसतें. सर्वत्र या तत्त्वाचा पाठलाग करीत राहणें शक्य दिसत नाहीं. "

" अनेक व्यक्ती पुष्कळ वेळां एकाच कार्याच्या सिद्धीसाठीं यत्न करीत असतांही ती गोष्ट त्यांच्या लक्ष्यांत येत नाहीं. कायदा, शासनपद्धति अथवा राष्ट्रांचे परस्पर संबंध हीं सारीं अखेरचीं साध्यें आहेत असें कोणीही ह्मणणार नाहीं. जेथें कायदा पोहोंचूं शकत नाहीं, त्यापलीकडे आपलें अखेरचें साध्य आहे. फार काय, पण 'संन्यासी' हा शब्दही हेंच तत्त्व दर्शवितो. संन्यासी म्हणजे मानवी कायद्याच्या बाहेर गेलेला मनुष्य. सर्व महात्म्यांनीं अखेरचें एकच तत्त्व सांगितलें आहे. मनुष्याचें अखेरचें साध्य कायद्याच्या द्वारें सिद्ध होणारें नसून त्याच्या मुळाशीं नीति आणि पावित्र्य हींच असलीं पाहिजेत ही गोष्ट ख्रिस्ताला कळून आली. 'पौर्वात्य तत्त्वज्ञानाचा कल व्यक्तिसुधारणेकडे असून पाश्चात्याचा कल समाजसुधारणेकडे आहे' असें नुकतेंच तुह्मी ह्मणालां; पण व्यक्तिशः व्यक्ति आणि सामाजिक व्यक्ति यांतील भेद तुम्ही विसरलां नसालच. "

" याचा अर्थ आह्मीं केवळ दिखाऊ सुधारणेच्या मागें असून तुह्मीं खरी सुधारणा करीत आहां असाच घ्यावयाचा ना ? "

" निरनिराळ्या पायऱ्यांनीं प्रत्येक मानवी मन अधिकाधिक उच्चप्रतीच्या स्थितीकडे जात असतें. प्रथम प्रत्यक्षाची मदत तें घेतें; आणि नंतर हळू हळू तें परोक्ष तत्त्वज्ञानाकडे वळूं लागतें. विश्वबंधुत्वाच्या कल्पनेचा उदय कसा झाला याचा इतिहास पहा. प्रथम एकाच पंथांतील लोकांत आपलेपणाच्या भावनेचा उदय होतो. या वेळीं ती भावना अगदीं संकुचित ह्मणजे थोड्याशा लोकांपुरतीच असते. पायरीपायरीनें हीच मूळ कल्पना विस्तृत होत जाते आणि अखेरीस विश्वबंधुत्वाच्या परोक्ष भावनेचा उदय होऊं लागतो. "

" तर मग, आम्हीं इंग्रजलोक ज्यांस मोठ्या प्रेमानें कवटाळतों ते सारे पंथ कालेंकरून मरून जातील असें आपणास वाटतें काय ? आमच्या देशांत ( इंग्लंडांत ) हजारों पंथ प्रचलित आहेत ही गोष्ट साऱ्या युरोपखंडास माहीत आहे. "

" कालेंकरून हे सारे पंथ नामशेष होतील अशी माझी पक्की खात्री आहे. या साऱ्या पंथांचें अस्तित्व ज्या तत्त्वांवर अवलंबून आहे तीं तत्त्वेंच चिरस्थायी रूपाचीं नाहींत. त्यांतील टिकाऊ भाग अर्थातच राहील; आणि त्याचा अंतर्भाव भावी इमारतींत अवश्य केला जाईल. "

" आपलें कार्य इंग्लंडांत कितपत फलद्रूप होत आहे हें मला सांगण्याची कृपा कराल काय ? "

" माझ्या कार्याला हळूहळू यश येत आहे. तें फारसें झपाट्यानें चालू नाहीं याचीं कारणें मी पूर्वी सांगितलींच आहेत. कोणत्याही कार्याला जेव्हां थेट पायापासून आरंभ करावयाचा असतो तेव्हां त्याची प्रगती हळूहळूच होणार हें उघड आहे. अमुक एका मार्गानेंच माझ्या या कल्पनांचा प्रसार होईल असें नाहीं. कोणत्या ना कोणत्या तरी मार्गानें त्यांचा प्रसार होईल हें खरें. त्यांचा प्रसार करण्याचा योग्य काल आतांच आहे असें आम्हांपैकीं पुष्कळांस वाटत आहे. "

यानंतर आपल्या कार्याची दिशा स्वामींनीं मला समजाऊन सांगितली. प्राचीन पद्धतीप्रमाणें स्वामींचें ज्ञानदानाचें कार्यही विनमोलानें होत असतें. त्यासाठीं ते कोणाकडूनही पैसा घेत नाहींत. या कार्यासाठीं लागणाऱ्या पैशापैकीं जो भाग कोणी केवळ खुशीनें देईल तेवढ्याचाच स्वीकार केला जातो.

पौर्वात्य पद्धतीच्या पोषाखांत असलेली स्वामी विवेकानंदांची मूर्ति खरोखर पाहण्यालायक आहे. त्यांची वागणूक अगदीं साधेपणाची आणि त्यांचा स्वभाव मनमिळाऊ आहे. सर्वसंगपरित्याग केलेला मनुष्य स्वभावानें शुष्क व कर्कश असतो, असा जो सामान्य लोकांचा समज आहे, तो स्वामींच्या बाबतींत तरी खोटा दिसतो. इंग्रजी भाषेवर स्वामीजींचें असामान्य प्रभुत्व आहे. त्यांचें वाक्पाटवही खरोखर वाखाणण्यासारखें आहे. यामुळें त्यांच्याकडे कोणाचेंही चित्त वेधल्यावांचून राहणार नाहीं. संन्यासा-

श्रमाचा स्वीकार केला असल्यामुळें पैसा, कीर्ति अथवा लौकिक मोठेपणा या सर्वांचाच त्यांनीं त्याग केला आहे. फक्त धर्मज्ञानच संपादन करावयाचें असा त्यांच्या या आश्रमाचा हेतु आहे.

---

## नंबर ३.

## हिंदुस्थान आणि इंग्लंड.

इंडिया-लंडन, १८९६.

लंडनच्या चालू सालच्या मोसमांत स्वामी विवेकानंद हे येथें आले असून त्यांचें तत्त्वज्ञान आणि त्यांचीं मतें ऐकावयास जाणाऱ्या लोकांपुढें ते व्याख्यानें देत आहेत. धर्मप्रचारक बाह्यदेशीं पाठविण्याचा मक्ता जणूंकाय एकट्या इंग्लंडनेंच घेतला आहे अशी पुष्कळ इंग्रज लोकांची समजूत आहे. याकरितां मी स्वामी विवेकानंद यांस मुद्दाम भेटावयास गेलों होतों. हिंदुस्थान इंग्लंडला असा संदेश तरी कोणता पाठविणार हें जाणण्याची जिज्ञासा मला होती. हिंदुस्थानानें इंग्लंडला आजपर्यंत कधीं संदेश पाठवावयाचे ह्मटले तर ते खर्चाच्या बाबतीबद्दल अथवा न्यायपद्धती अथवा लष्करी खर्चाच्या बाबीची तक्रार यांबद्दल असावयाचे; असें असतां याहून वेगळा असा संदेश हिंदुस्थानांतून स्वामींनीं कोणता आणला असेल हें मला समजून घ्यावयाचें होतें.

स्वामी ह्मणाले, “ हिंदुस्थानांतून बाह्यदेशीं धर्मप्रचारक जाणें ही गोष्ट आजच नव्यानें घडून येत आहे असें नाहीं. अशोक राजाच्या काळीं पुष्कळ धर्मप्रचारक बाह्यदेशीं संचार करीत असत. त्या वेळीं बौद्ध धर्माचा नुक्ताच जन्म झाला होता. बाह्यदेशांना देण्यासारखें नवें तत्त्वज्ञान त्या वेळीं बौद्ध धर्मापाशीं होतें. ”

“ तर मग हें धर्मप्रचाराचें कार्य मध्यें कां बंद पडलें? आणि आतांच तें पुन्हां कां सुरू झालें? ”

“ धर्मप्रचाराचें कार्य बंद पडलें याचें कारण हिंदुलोक आपलपोटे झाले हें होय. परस्परविचारांचा विनिमय झाल्यावांचून कोणतेंही राष्ट्र जिवंत राहूं शकत नाहीं अथवा भरभराटीस येऊं शकत नाहीं, हें तत्त्व हिंदुलोक

विसरले. हिंदुस्थानानें फक्त एकच कार्य आजवर केलें आहे. जगांत धर्मप्रसार करावा यासाठींच जणूंकाय त्या देशाचा जन्म आहे. कित्येक युगांचा काळ चालून पाहतां मानवी मनोव्यापारांचें सूक्ष्म निरीक्षण करण्याचा हक्क जणूंकाय, एकट्या हिंदुस्थानासच आहे असें वाटतें. परोक्ष तत्त्वज्ञान, सूक्ष्मेंद्रिय शास्त्र, न्याय इत्यादि विषयांच्या बाबतींत भरतभूमीनें सर्वांहून विशेष प्रकारची खटपट केली आहे. इंग्लंडनें हिंदुस्थानांत जें कांहीं कार्य केलें आहे, त्यांतूनच माझें हें कार्य निर्माण झालें आहे, असेंच वास्तविक ह्मटलें पाहिजे. इंग्लंडनें देश जिंकावे, तेथें राज्य करावें आणि आधिभौतिक शास्त्रांच्या ज्ञानाचा उपयोग स्वतःच्या व जित देशाच्या फायद्याकडे करावा हें इंग्लंडचें नियत कार्य आहे. असाच प्रकार हिंदुस्थानांतही घडून आला. हिंदुस्थानानें जगाकरितां काय केलें आहे व जगाच्या कल्याणांत कोणत्या प्रकारची भर घातली आहे याचा विचार मी करूं लागलों ह्मणजे इंग्रजी व संस्कृत या दोन भाषांतील दोन ह्मणींची आठवण मला ताबडतोब होते. एखादा मनुष्य मृत झाला ह्मणजे त्यानें 'आत्म्याचा त्याग केला' असें इंग्रजींत ह्मणतात; उलटपक्षीं 'त्यानें देहाचा त्याग केला' असें आम्हीं ह्मणतों. 'शरिराला आत्मा आहे' असें तुम्हीं ह्मणतां त्या वेळीं मानवी रचनेंत शरीर हें धन्याच्या जागीं आहे असा अर्थ तुमच्या भाषणांतून ध्वनित होतो. उलटपक्षीं आत्मा हा मुख्य भाग असून शरीर हें त्याच्या हस्तकाच्या जागीं आहे असें आम्हीं ह्मणतों. केवळ बाह्य दृष्टीनें पाहतां या गोष्टी अगदीं क्षुल्लक दिसतात. तथापि त्यांत राष्ट्रीय विचारांच्या परंपरेचा अजमास लागतो हें खोटें नाहीं. ग्रीक आणि लॅटिन संस्कृतीच्या पुनरुदयानें युरोपांत जशा प्रकारची क्रांति घडून आणली तशाच प्रकारची क्रांति आमचें तत्त्वज्ञान घडवून आणील हें शॉपेनहॉरचें भविष्य तुमच्या ध्यानांत असेलच. पौर्वात्य विद्येंतील शोध झपाट्यानें सुरू आहेत. सत्याच्या शोधार्थ जे कोणी खटपट करीत आहेत त्यांस जणूंकाय एक नवें जगच दिसूं लागलें आहे."

"अखेरीस हिंदुस्थान आपल्या जेत्यांस जिंकील, असाच तुमच्या ह्मणण्याचा आशय आहे काय ?"

"होय; तत्त्वज्ञानाच्या साम्राज्यांत हिंदुस्थान इंग्लंडास जिंकील. पूर्वी ज्याप्रमाणें मुसलमानांनीं हिंदुस्थान देश जिंकला, त्याचप्रमाणें इंग्लंडानेंही

हिंदुस्थान तरवारीनें जिंकला. तथापि पुढें अकबर बादशाहा जवळ जवळ हिंदु बनून गेला. आजही सुशिक्षित मुसलमान सुफी पंथाचे आहेत. हा पंथ हिंदुधर्माच्या अगदीं जवळ आहे. या पंथाचे लोक गो-मांस भक्षण करीत नाहींत. अशाच दुसऱ्या आमच्या कित्येक चालींचें अनुकरण त्यांनीं केलें आहे. आमच्या तत्त्वज्ञानानें त्यांच्या विचारपरंपरेंत मोठी क्रांति घडवून आणिली आहे. "

" तर मग हिंदुस्थानांतल्या बड्या साहेबांची वाट अशीच लागावयाची असें तुमचें भविष्य दिसतें; तथापि असें होण्याचीं चिन्हें आजतरी फारशीं दिसत नाहींत. "

" छे छे ! तुम्हांला वाटतें तितका तो काळ लांब नाहीं. धर्मदृष्ट्या हिंदु आणि इंग्रज यांच्या विचारपरंपरेंत बराचसा सारखेपणा आहे. ज्या कोणा इंग्रजाला हिंदूंच्या साहित्याचें ज्ञान होतें आणि ज्यानें हिंदूंचे तत्त्वग्रंथ पाहिले आहेत, त्याच्या चित्तांत हिंदूंबद्दल सहानुकंपा तात्काल उत्पन्न होते; आणि पुढें ती वाढत जाते. कित्येक इंग्रज लोक अगदीं तुसडेपणानें वागतात याचें कारण त्यांचें अज्ञान आहे असें ह्मणावयास हरकत नाहीं. "

" होय; ही गोष्ट खरी आहे. त्यांच्या तुसडेपणाच्या प्रमाणानें त्याचा मूर्खपणा अजमावतां येईल असें ह्मणावयास हरकत नाहीं. इंग्लंडला येण्याच्या अगोदर आपण या कार्यासाठीं प्रथम अमेरिकेंत कां बरें गेलां ? "

"हें केवळ यदृच्छेनें घडून आलें. त्या वेळीं अमेरिकेंत मोठें प्रदर्शन भरलें होतें; आणि त्यांतच महाधर्म परिषदेचें अधिवेशनही झालें. ह्मैसूरचे महाराज आणि दुसरे माझे कित्येक मित्र यांनीं हिंदुधर्माचा प्रतिनिधि या नात्यानें माझी रवानगी अमेरिकेला केली. अमेरिकेंत मी तीन वर्षें होतों. फक्त गेल्या आणि या उन्हाळ्यांत मात्र मी लंडन येथें व्याख्यानें दिलीं. अमेरिकन लोकांबद्दल मला मोठा आदर वाटतो. त्यांपैकीं कित्येक माझे चांगले स्नेही झाले आहेत. इंग्रज लोकांत आढळून येणारे पूर्वग्रह अमेरिकन लोकांत फारसे दिसून येत नाहींत. एखादी नवी कल्पना कोणी त्यांच्यापुढें मांडली ह्मणजे ती केवळ नवी ह्मणून तिचा त्याग ते करीत नाहींत. तिचें परीक्षण करण्याची त्यांची सदोदित तयारी असते. ते लोक परकीयांचें आदरातिथ्यही चांगलें करितात. मी अमेरिकेंतील पुष्कळ शहरें फिरलों. बोस्टन्, न्यू-

यॉर्क, फिलाडेल्फिया, बाल्टिमोर, वॉशिंग्टन्, डेस्मॉनिस, मेंम्फिस आणि दुसऱ्याही कित्येक शहरीं मी व्याख्यानें दिलीं. ”

“ तेथें पुष्कळ लोक आपले शिष्यही झाले असतील ? ”

“ होय. अमेरिकेंत माझे पुष्कळ शिष्य आहेत; पण मी कोणत्याही पंथाची स्थापना केली नाहीं. नवा पंथ स्थापणें हें माझें कार्य नाहीं. सध्यां पंथांचा तर जिकडे तिकडे सुळसुळाटच झाला आहे. एखादा पंथ स्थापावयाचें म्हटलें तर तो चालवावयास माणसें पाहिजेत. तसेंच त्यासाठीं पैसा आणि वजन यांचीही आवश्यकता आहेच. यांची खटपट एकवार सुरू झाली कीं त्याबरोबरच अहमहमिका आणि भांडणें यांचीही सुरवात होते. ”

“ आपलें कार्य काय आहे हें थोडक्यांत सांगतां येईल काय ? सर्व धर्मांची परस्पर तुलना करावयाची असा आपला उद्देश आहे काय ?

“ सर्व धर्मांतील तत्त्वज्ञान आणि रहस्य लोकांस सांगावयाचें हें माझें कार्य आहे. लोकांनीं केवळ बाह्यविधींच्या मागें न लागतां अंतर्गत रहस्य आपलेंसें करावें अशी माझी इच्छा आहे. जगांतील सर्व धर्मांत आपणास आवश्यक आणि अनावश्यक असे दोन भाग आढळून येतात. यांतील अनावश्यक भाग गाळून टाकला तर बाकी राहिलेला भाग हाच सर्व धर्मांचा मूळ पाया आहे असें आपणास आढळून येईल. हीं सर्व मूलतत्त्वें सर्व धर्मांत सारखींच आढळून येतात. या सर्व धर्मांच्या मुळाशीं एकात्मता आढळन येते. या एकात्मतेला आपण गॉड, अल्ला, जिहोवा, स्पिरिट् अथवा दुसरें कोणतेंही नांव दिलें तरी त्यामुळें मूलरूपांत भेद उत्पन्न होत नाहीं. क्षुद्र कीटकापासून तों थेट मानवी प्राण्यापर्यंत सर्वत्र हीच एकात्मता भरून राहिली आहे. अशा प्रकारची एकात्मता सर्वत्र आहे ही गोष्ट विशेषेंकरून आपण लोकांपुढें मांडिली पाहिजे. युरोपांत काय अथवा इतर देशांत काय, सामान्य जनतेचा भर बाह्यविधींवरच अधिक असतो. या बाह्यविधींसाठीं परस्परांशीं युद्धें करून हीं माणसें एकमेकांचे जीव घेण्यासही मागें पुढें पाहत नाहींत. ईश्वरावर आणि मनुष्यमात्रावर प्रेम करावें हें तत्त्व सर्व धर्म शिकवीत असतांही जगांत धर्मांच्या बाबतींत युद्धें होतात हा खरोखर मोठा चमत्कार आहे. ”

" मला वाटतें, धर्माच्या बाबतींत हिंदुलोक कोणाचाही छल करीत नाहींत. "

" आजपर्यंत तरी हिंदुलोकांनीं कोणाचाही छल केला नाहीं. परमतसहिष्णुतेच्या बाबींत जगांतील दुसऱ्या कोणत्याही लोकांहून हिंदुलोक श्रेष्ठ आहेत. ते अत्यंत धार्मिक असल्यामुळें नास्तिकांचा छळ करण्याकडे त्यांची प्रवृत्ति असावी असें कोणासही वाटेल; पण नास्तिकांचा सुद्धां ते छळ करीत नाहींत. जैन लोक पक्के नास्तिक आहेत पण जैनांचाही कोणी छळ केला नाहीं. धर्माच्या बाबतींत हिंदुस्थानांत फक्त मुसलमानांनींच हातीं तरवार धरिली. "

" इंग्लंडांत आपल्या कार्याला कितपत यश येत आहे ? या देशांत सध्यां हजारों पंथ प्रचलित आहेत. "

" स्वातंत्र्य आणि ज्ञान यांचा प्रसार जसजसा अधिक होत जाईल तसतसे हे पंथही हळूहळू नामशेष होतील. अनावश्यक गोष्टींवरच या पंथांची उभारणी झाली आहे. या गोष्टी अनावश्यक आहेत एवढ्यामुळेंच त्या चिरस्थायी होऊं शकणार नाहींत हें उघड आहे. लहान लहान जनसमूहांत बंधुभाव उत्पन्न करावा हें या पंथांचें कार्य होतें. हें कार्य आतां पूर्ण झाल्यामुळें या पंथांची आवश्यकताच उरली नाहीं. विश्वबंधुत्वाच्या कल्पनेचा उदय हळूहळू होऊं लागला आहे. या कल्पनेमुळें मनुष्यामनुष्यांतील पडदे हळूहळू नाहींसे होऊं लागले आहेत. इंग्लंडांत माझ्या कार्याचें पाऊल हळूहळू पुढें पडत आहे. कदाचित् सांप्रतचा काळ या कार्यास नुकताच अनुकूल होऊं लागल्यामुळें असें घडत असेल; तथापि त्याचें पाऊल पुढें पडत आहे हें मात्र खरें. अशाच प्रकारचें दुसरें एक कार्य हिंदुस्थानांत इंग्लंड करीत आहे हेंही लक्षांत ठेवण्यासारखें आहे. अर्वाचीन जातिभेदांमुळें हिंदुस्थानाचें पाऊल पुढें पडत नाहीं. या भेदांमुळें समाजाचे लहान लहान तुकडे पडून ते आपापल्या कक्षेंतच कुजूं लागले आहेत. नव्या कल्पनांच्या उदयाबरोबर जातिभेदाच्या या कल्पनाही नाश पावत आहेत."

" तथापि हिंदुस्थानाबद्दल सहानुकंपा बाळगणाऱ्या आणि त्या देशाचा इतिहास जाणणाऱ्या कित्येक इंग्रज लोकांस जातिभेद बहुतांशीं हिंदुस्थानास हितावह आहे असें वाटतें. एखाद्या मनुष्यावर युरोपीय कल्पनांची बरीचशी

छाप बसली जाण्याचा संभव आहे. आमच्या पुष्कळ कल्पना खुद्द आपणास चार्वाकीय अशा वाटतात. ”

“ होय; ही गोष्ट पुष्कळांशीं खरी आहे. हिंदुस्थान आणि इंग्लंड यांचा एकजीव होऊन जावा अशासाठीं कोणीही न्यायी मनुष्य खटपट करणार नाहीं. अंतर्गत विचारांच्या अनुरोधानेंच बाह्य शरीर बनत असतें. अशाच रीतीनें राष्ट्रीय विचारांपासून राष्ट्रदेहाची घटना होत असते. हिंदुस्थानाच्या देहांत हजारों वर्षांची विचारपरंपरा सांठविलेली आहे. याकरितां हिंदुस्थानाला पूर्ण युरोपीय बनवूं पाहाणें ही गोष्ट अगदीं अशक्य कोटींतील आणि मूर्खपणाची आहे. ज्या मूतलत्त्वांवर देशाची उन्नति होते तीं मूलतत्त्वें हिंदुस्थानांत नित्य जिवंत आहेत. हिंदुस्थानांत जेव्हां जेव्हां शांततेचा काल सांपडला तेव्हां तेव्हां या तत्त्वांनीं आपलें अस्तित्व जाहीर केलें आहे. उपनिषत्कालापासून तों चालू घटकेपर्यंत अनेक महापुरुषांनीं जातिभेद मोडून टाकण्याचा यत्न केला आहे. याचा अर्थ त्यांनीं मूळची वर्णव्यवस्था मोडण्याचा यत्न केला असा मात्र नव्हे; तर वर्णव्यवस्था अवनत होत जाऊन जो सांप्रतचा दुष्ट जातिभेद निर्माण झाला आहे, तो मोडून टाकावा अशी त्यांची इच्छा होती. सांप्रतच्या जातिभेदांत अद्यापिही जो कांहीं चांगला अंश दिसतो तो मूळच्या वर्णव्यवस्थेचा अंश होय. वर्णव्यवस्था हें समाजरचनेचें एक अत्यंत उज्वल असें आंग होतें. ही मूळची वर्णव्यवस्था पुन्हा स्थापावी यासाठीं भगवान् बुद्धानें खटपट केली. हिंदुस्थानांत जागृतीचा काल जेव्हां जेव्हां आला, तेव्हां तेव्हां जातिभेद मोडून टाकण्याचे यत्न झाले आहेत. तथापि आमच्या देशाची उन्नति आह्मीं हिंदवासियांनींच घडवून आणिली पाहिजे; आणि तिच्यासाठीं ज्या कांहीं परकीयांच्या कल्पना आह्मांस उसन्या घ्याव्या लागतील त्यांचेंही ग्रहण आह्मीं केलें पाहिजे. पण अशा रीतीनें परकीय कल्पना आपल्याशा करीत असतां आपली प्राचीन पूर्वपरंपरा सुटतां उपयोगी नाहीं हेंही आह्मी लक्षांत ठेविलें पाहिजे. हें कार्य आमचें आह्मींच केलें पाहिजे; तें परकीयांकडून होणें शक्य नाहीं. कोणतीही वाढ चिरस्थायी व्हावयास ती आंतूनच झाली पाहिजे. या कार्यांत हिंदुस्थानाला इंग्लंड थोडीशी मदत करूं शकेल इतकेंच. कोणतीही सुधारणा हिंदुस्थानाच्या घशांत कोंबण्याचा यत्न करणें निरुपयोगी आहे

असें माझें मत आहे. गुलामांच्या श्रमांनीं एखादें महत्कार्य निर्माण झालें तरी तेंही अखेरीस अवनतीस पोहोंचवितें. "

" राष्ट्रीय सभेनें चालविलेल्या चळवळीकडे आपलें थोडेंबहुत लक्ष्य आहे काय ? "

" या कामीं फारसें लक्ष्य मीं घातलें आहे असें म्हणवत नाहीं. माझ्या कार्याची दिशा अगदीं वेगळी आहे; तथापि ही राष्ट्रीय सभेची चळवळ विशेष परिस्थितीची निदर्शक असल्यामुळें तिलाही यश यावें अशी माझी मनापासून इच्छा आहे. निरनिराळ्या मानवकुलांतून आतां एक हिंदी राष्ट्र बनलें जात आहे. युरोपांत जसे निरनिराळे देश व निरनिराळे मानववंश आहेत तसेच ते हिंदुस्थानांतही आहेत असें कित्येक वेळां माझ्या मनांत येतें. हिंदुस्थानाचा व्यापार आपल्या हातीं असावा या उद्देशानें पूर्वीं युरोपखंडानें फार खटपट केली. या व्यापारानें जगाच्या संस्कृतींत मोठें कार्य केलें आहे. किंबहुना मानवजातीच्या इतिहासांतील हा काळ मोठ्या आणीबाणीचा येऊन गेला. हें व्यापारी वर्चस्व संपादन करण्यासाठीं डच, पोर्तुगीज्, फ्रेंच आणि इंग्रज यांनीं आळीपाळीनें खटपट केल्याचें आपणास दिसून येतें. "

"या साऱ्याचा शेवट कोठें होईल असें आपणास वाटतें?"

" अखेरीस हिंदुस्थान हें एक राष्ट्र बनून जाईल अशी माझी खात्री आहे. उदार कल्पनांचा उदय आतां हिंदुस्थानांत होऊं लागला आहे. बुद्धीची वाढ करण्याचा हक्क पूर्वकाळीं थोड्याशा लोकांनीं आपल्या हातीं ठेविला होता, पण आतां हा हक्क त्यांजकडेच राहणें शक्य नाहीं. यापुढें तो हळू हळू कनिष्ट जातींसही प्राप्त होत जाईल. शिक्षणाची वाढ होत आहे आणि यापुढें सत्तीचें शिक्षणही सुरू होईल. आम्हां हिंदुस्थानवासियांच्या अंगांत जी मोठी औद्योगिक शक्ति आहे तिचा उपयोग करून घेतला पाहिजे. भरतभूमीचें पुष्कळसें सामर्थ्य सध्यां गुप्त दशेंत आहे. हें सामर्थ्य कालेंकरून बाहेर पडेल. "

" लष्करी सामर्थ्याच्या पाठिंब्यावांचून कोणत्याही राष्ट्राचा उदय झाल्याचा दाखला आहे काय ? "

"होय; चीन देश हें असेंच एक उदाहरण आहे. अनेक देश मी फिरलो त्यांतच चीन आणि जपान या देशांतही मी प्रवास केला आहे. आज चीन देश म्हणजे अव्यवस्थित पेंढाऱ्यांच्या मुलखासारखा वाटतो; पण, आपल्या उन्नतीच्या काळीं तोच देश अत्यंत सुसंघटित होता. अशा प्रकारची घटना जगांतील दुसऱ्या कोणत्याही राष्ट्रास साध्य झाली नाहीं. आपल्या पुष्कळशा कल्पना आणि समाजपद्धति हीं अर्वाचीन आहेत असा आपला समज आहे. पण, चीन देशांत याच गोष्टी हजारों वर्षें अस्तित्वांत होत्या. उदाहरणार्थ परीक्षा घेण्याची पद्धत ही प्रथम चीननेंच अस्तित्वांत आणिली."

" मग या साऱ्या घटनेचा लोप कसा झाला ? "

"ही घटना अस्तित्वांत ठेवण्यासाठीं लागणाऱ्या योग्य माणसांचा तुटवडा पडला तेव्हां ती घटनाही मोडूं लागली. पार्लमेंटानें चांगले कायदे केले म्हणजे तेवढ्यानें माणसें सद्गुणी होत नाहींत ही गोष्ट तुह्मांस ठाऊक आहेच. या तत्त्वाचा अनुभवही चिनी लोकांनीं तुमच्या पूर्वींच घेतला आहे. यासाठींच राजनीतीपेक्षां धर्म अधिक महत्वाचा आहे; कारण, धर्म हा थेट मुळापर्यंत प्रवेश करतो आणि लोकांच्या वागणुकीच्या मूलतत्त्वांचें तो संशोधन करतो. "

" अशा प्रकारची जागृति हिंदुस्थानांत होऊं लागली आहे, याची जाणीव हिंदुलोकांस आहे काय ? "

" होय; त्यांना ही जाणीव पूर्णपणें झाली आहे. हिंदुस्थानांतील या जागृतीचें स्वरूप बाह्य देशांना फक्त राष्ट्रीय सभा आणि सामाजिक सुधारणा याच रूपानें मुख्यतः दिसतें; पण, हिंदुस्थानांत धर्मजागृतीही होत आहे हे खरें आहे. या दुसऱ्या प्रकारच्या जागृतीचें काम निस्सीम शांततेनें चाललें आहे इतकें मात्र खरें. "

" मानवी जीवितासंबंधीं पाश्चात्य आणि पौर्वात्य ध्येयें परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत. समाज पूर्णत्वाला न्यावा हें आमचें ध्येय आहे असें वाटतें. या ध्येयाच्या पूर्णतेसाठीं आह्मी पाश्चात्य लोक खटपट करीत असतां पौर्वात्य जनता परोक्ष विचारांत मग्न झाल्यासारखी दिसते. सुडान मधील हिंदी सैन्याचा खर्च कोणी द्यावा याबद्दल येथल्या पार्लमेंटांत मोठे कडाक्याचे वादविवाद होतात. या बाबतींत सरकारानें मोठा अन्याय केला

आहे असें ह्मणून पुराणमतवादी वर्तमानपत्रकार सरकारच्या विरुद्ध टाहो फोडीत असतात आणि इकडे अशी गडबड चालली असतां तुह्मीं तिकडे खुशाल स्वस्थ बसतां. हा प्रश्न लक्ष्य देण्याइतक्या किमतीचा नाहीं असेंच जणूं काय तुह्मांस वाटतें."

"या बाबतींत तुह्मी मोठी चूक करीत आहां." एक वर्तमानपत्र हातीं घेऊन स्वामी ह्मणाले. "या बाबींत माझी सहानुकंपा माझ्या जन्मभूमीकडेच असावी यांत कांहीं नवल नाहीं. तथापि या बाबींत मला आमच्या एका जुन्या ह्मणीची आठवण होते. 'हत्ती दिल्यावर शेंपटासाठीं भांडण कशाला?' अशी ही ह्मण आहे. पैसे देण्याचें काम हिंदुस्थान नेहमींच करीत आलें आहे. मुत्सद्द्यांचे हे तंटे फार चमत्कारिक स्वरूपाचे असतात. राजनीति आणि धर्म हीं एकत्र चालतील असें होण्यास आणखी कित्येक युगांचा काळ लोटला पाहिजे."

"हें खरें आहे; तथापि अशा प्रकारचा यत्न जितक्या लवकर सुरू होईल तितकें बरें नव्हे काय?"

"होय; या बड्या लंडन शहरांत अशा कल्पनेची मुहूर्तमेढ रोवणें अनिष्ट नाहीं. एवढ्या मोठ्या साम्राज्याची राजसत्ता एका केंद्रांत यापूर्वी कधींही आली नव्हती. या सत्तेचें सामर्थ्य आणि ज्या तपशीलवार रीतीनें ती पूर्णत्व पावली आहे, त्या रीतीचें अवलोकन मी पुष्कळ वेळां करीत असतों. एकाच केंद्रांत आलेली ही सत्ता निरनिराळ्या नाड्यांतून कशा रीतीनें प्रसरण पावते याचाही अभ्यास मी करतों. कोणी मनुष्य असा अभ्यास करूं लागला ह्मणजे हें साम्राज्य किती मोठें आहे आणि त्याजवरील जबाबदारीही किती मोठी आहे हें त्याच्या लक्ष्यांत येतें. राज्यनियमनाचें काम अशा प्रकारें चालू असतां हें साम्राज्य विचारविनियमही करीत आहे. अशा प्रकारच्या साम्राज्याच्या केंद्रस्थानीं नव्या कल्पनांचा प्रसार कोणी करूं लागला, तर त्याचा तो यत्न अनाठायीं होईल असें नाहीं. कारण, कोणत्याही नव्या कल्पनांनीं या केंद्रस्थानीं एक वेळ जीव धरला, तर त्यांचा प्रसार पृथ्वीच्या दुसऱ्या टोंकापर्यंत आपोआपच होईल."

स्वामी विवेकानंद हे असामान्य पुरुष आहेत असें त्यांच्या चेहऱ्यावरून उघड दिसतें. त्यांची शरीरयष्टि उंच आणि रुंद असून त्यांचा चेहरा रेखींव

आहे. त्यांच्या एकंदर उठावांत त्यांच्या पोषाखानेंही भर पडते. जन्मतः ते बंगाली आहेत. कलकत्ता युनिव्हर्सिटीची बी. ए. ची पदवी त्यांस मिळाली आहे. त्यांचें वक्तृत्वही उच्चप्रतीचें आहे. कोणत्याही प्रकारच्या टिपणांशिवाय तासदीडतास ते सहज भाषण करूं शकतात. तसेंच शब्दयोजनेसाठीं त कधीं अडखळत नाहींत.

## नंबर ४.

## इंग्लंडास हिंदुधर्मप्रचारकाचा संदेश.

धी एको, लंडन, १८९६.

स्वामी विवेकानंद हे स्वतःच्या देशांत असते तर ते तेथें एखाद्या झाडाखालीं अथवा एखाद्या देवळाच्या आजूबाजूस रहातांना आढळले असते. तसेंच त्यांचा पोशाखही हिंदुस्थानच्या रीतीरिवाजास अनुकूल असाच असता; पण लंडनची चालरीत निराळी असल्यामुळें स्वामीही सामान्य लोकांप्रमाणें एका घरांत रहात आहेत. तेथें मी त्यांस भेटावयास गेलों, तेव्हां काळसर नारिंगी रंगाचा एक लांब झगा घालून ते बसले होते. आपला पौर्वात्य पोषाख –विशेषतः डोकीस घातलेला फेटा हीं लंडनच्या सामान्य जनतेस फारशीं पसंत पडत नाहींत असें स्वामीजी हंसत हंसत ह्मणाले.

* * *

"अलीकडच्या काळीं मुद्यापेक्षां इतर बिनमहत्वाच्या गोष्टींवरच लोकांचा अधिक भर आहे असें आपणास वाटतें काय ?"

"होय. मागसलेल्या राष्ट्रांत आणि युरोपांतील सुधारलेल्या पण कमी संस्कृत अशा प्रकारच्या राष्ट्रांत असाच प्रकार चालू आहे असें मला वाटतें. सुसंस्कृत आणि श्रीमान् लोकांत याहून वेगळा प्रकार असावा असा ध्वनि तुमच्या प्रश्नाच्या रोंखांत उमटतो, ही गोष्ट खरी आहे. इकडील श्रीमंत लोक एकतर केवळ चैनीच्या मागें हात धुवून लागलेले आहेत अथवा अधिक द्रव्यार्जनासाठीं धडपडत आहेत अशा प्रकारचे लोक आणि इतर धंदेवाले लोक धर्मासंबंधीं विचारही करीत नाहींत. धर्म ह्मणजे एक सडकी नासकी, विचारांतही न घेण्यासारखी बाबत आहे असें त्यांस वाटतें. धर्माचा विचार करणें ह्मणजे बुद्धीचा आणि काळाचा अपव्यय करणें आहे असें त्यांस प्रामाणिकपणें वाटत असतें. सध्या देशाभिमान हाच काय तो

या लोकांचा धर्म होऊन बसला आहे. फक्त विवाहसंस्काराकरितां आणि मृतांच्या संस्काराकरितां मात्र अलीकडे लोक चर्चांत ( देवळांत ) जात असतात. ”

“ आपल्या उपदेशानें ते वारंवार देवळांत जातील असें आपणांस वाटतें काय ? ”

“ असें होईलसें वाटण्यास फारशी जागा नाहीं. याचें एक कारण असें कीं बाह्य विधींसंबंधीं अथवा विशिष्ट मतांसंबंधीं माझा मुळींच कटाक्ष नाहीं. कोणी कोणत्या प्रकारचे धर्माचार पाळावे हें सांगणें हें माझें कार्यच नव्हे. प्रत्येक गोष्टींत धर्म भरला असून धर्म हेंच मानवी जीविताचें सारसर्वस्व आहे असें लोकांस पटवून देणें हेंच माझें कार्य आहे. आतां इंग्लंडांतील परिस्थिति कशी आहे ती पहा. सोशिॲलिझम् अथवा लोकांचें स्वायत्त-शासन येथें रूढ होऊं पाहात आहे. लोकांच्या सांसारिक गरजा प्रथम भागल्या पाहिजेत असें या पक्षाचें ह्मणणें आहे. या पक्षाचे मुख्य सूत्र थोडक्या शब्दांत सांगावयाचें ह्मटलें तर तें ‘ कमी काम आणि अधिक पैसा ’ या शब्दांत सांगतां येईल. त्यांना कोणत्याही प्रकारचा दाब आवडत नाहीं. ज्या राजशासनाच्या मुळाशीं धर्म नाहीं असलें राजशासन कोणत्याही स्वरूपाचें असलें तरी तें चिरस्थायी होऊं शकेल अशी हमी कोण देईल ? समाजरचनेंत जीं कांहीं व्यंगें आढळून येतात, त्यांचें मूलतः उच्चाटन करणें हें फक्त धर्मालाच साध्य आहे. धर्म शाबूद राहिला तर समाजरचनाही शाबूद राहील. ”

“ प्रत्येक धर्मांतील सार अथवा त्यांतील सूक्ष्मेंद्रियशास्त्राचे सिद्धांत हे सामान्य जनतेच्या गळीं उतरविणें हें मोठें कठीण काम आहे; कारण, या तत्त्वांचा विचार सामान्य जनतेच्या मनांतही कधीं येत नाहीं. अथवा त्यांचा संबंध व्यवहाराशींही नाहीं. ”

“ कोणताही धर्म झाला तरी त्यांत कमी उज्वल सत्यापासून निघून अधिक उज्वल सत्याकडे आपण जात असतों. धार्मिक बाबतींत आपला प्रवास असत्यांतून सत्याकडे होत असतो हें म्हणणें चुकीचें आहे. सर्व सृष्टीच्या मागें एकरूपता आहे पण मानवी मनांत मात्र भिन्नता दिसत आहे. **‘ एकं सद् विप्रा बहुधा वदन्ति। ’** यामुळें एखादा धर्म कितीही

वाईट दिसत असला तरी तो असत्य सांगत नसून वाईट रूपानें सत्यच सांगत आहे हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. हळूहळू उज्वल सत्याकडेच प्रवास करण्याचा त्याचा उद्देश आहे. भूताखेतांची पूजा करण्यास सांगणारा धर्म-ही याच दृष्टीनें सत्य धर्माचें एक विकृत रूप आहे असें तुमच्या लक्षांत येईल. सर्वच सत्य ज्यांत पूर्णपणें भरून राहिलें आहे असा कोणताही धर्म या जगांत तुम्हांस आढळून येणार नाहीं. ”

“आतां जो धर्म शिकविण्याकरितां आपण येथें आलां आहां त्याचे मूळ शोधक आपणच आहां काय? ”

“छे छे! मुळींच नाहीं. श्रीरामकृष्णपरमहंस यांचा मी एक शिष्य आहें. आमच्या प्राचीन ऋषींप्रमाणें श्रीरामकृष्ण हे विद्वान् नव्हते, तथापि ते अत्यंत पवित्र होते. वेदान्त तत्त्वांचें सार त्यांच्या ठिकाणीं पूर्ण भरून वाहात होतें; किंबहुना तत्त्वें असें ह्मणण्याऐवजीं धर्मांचें सार असें ह्मटल्यास तें अधिक युक्त होईल असें मला वाटतें. कारण, श्रीरामकृष्ण हे नुस्ते तत्त्वदर्शी नसून परमधार्मिकही होते. प्रोफेसर मॅक्समुल्लर यांनीं त्यांजसंबंधीं लिहि-लेला लेख तुह्मीं अवश्य वाचा. श्रीरामकृष्णांचा जन्म इसवी सन १८३४ सालीं हुगळी जिल्ह्यांत झाला, आणि १८८६ सालीं ते समाधिस्थ झाले. केशवचंद्र सेन आणि दुसरेही कित्येक लोक यांच्या आयुष्यक्रमांत त्यांनीं बरीच क्रांति घडवून आणिली. मानसिक आणि शारीरिक योगानें त्यांना तीक्ष्ण अंतर्दृष्टि प्राप्त झाली होती. एखाद्या बालकास शोभणारी मृदुता त्यांच्या चेहेऱ्यावर झळकत असे. त्यांचा स्वभाव अत्यंत लीन होता; आणि त्यांच्या अंतःकरणाची माधुरी चेहऱ्यावर व्यक्त होत होती. त्यांचें दर्शन झाल्याबरोबर न विरघळणारा असा प्रेक्षक विरळा. ”

“ तर मग वेदांत जें कांहीं सांगितलें आहे तेंच आपण सांगणार काय ? ”

“ होय; वेदान्त या शब्दाचा अर्थ वेदांचा अंत असा आहे. वेदांच्या तिसऱ्या भागांत उपनिषद्ग्रंथांचा समावेश होतो. उपनिषद्ग्रंथांत ज्या तत्त्वांचें पूर्णत्वानें विवेचन केलें आहे, त्या तत्त्वांचें केवळ मूळरूप मात्र संहितांत अथवा ब्राह्मणग्रंथांत आढळून येतें. संहिता हा वेदग्रंथांचा प्राचीनतम भाग आहे. या ग्रंथांची संस्कृतभाषाही फार जुन्या पद्धतीची

असून यास्कांच्या निरुक्ताच्या सहाय्यावांचून त्या भाषेचा अर्थही समजणें दुरापास्त आहे."

"हिंदुस्थानास आह्मां इंग्रज लोकांपासून पुष्कळशा गोष्टी अद्यापि शिकावयाच्या आहेत असा आमचा समज आहे. हिंदुस्थानापासून आपणास कांहीं शिकण्यासारखें असेल अशी कल्पना येथल्या सामान्य जनतेस असेल असें मला वाटत नाहीं."

"ही गोष्ट खरी आहे; तथापि हिंदुस्थानापासून आपणास काय शिकावयाचें आहे आणि तें किती महत्वाचें आहे याची जाणीव येथील विद्वान् लोकांस झाली आहे. मॅक्समुल्लर, मॉनिअर वुइल्यम्स, सर वुइल्यम् हंटर अथवा जर्मनींतील पौर्वात्य भाषांचे पंडित आमच्या परोक्ष शास्त्राचा अधिक्षेप करतांना कधींही आढळावयाचे नाहींत."

* * * *

व्हिक्टोरिया रस्त्यावरील ३९ नंबरच्या घरांत स्वामींचीं व्याख्यानें होत असतात. येथें जाण्यास सर्वांस परवानगी आहे. येथें जाण्यास पैसा लागत नसून प्राचीन पद्धतीप्रमाणें हें शिक्षणकार्य फुकट केलें जातें. स्वामी विवेकानंद हे बांध्यानें सुदृढ आहेत. इंग्रजी भाषेवर त्यांचें पूर्ण प्रभुत्व आहे.

---

नंबर ५.

## मदुरा येथें स्वामी विवेकानंदांशीं एक तास मुलाखत.

हिंदु, मद्रास, फेब्रुवारी १८९७.

**प्रश्न**—हें विश्व मिथ्या आहे या उपपत्तीचे चार अर्थ केले जातात. (१) अनंतत्वाच्या प्रमाणानें पाहतां विनाशी, नाम आणि रूप यांचें अस्तित्व अत्यंतात्यंत अल्पकालीन असतें. ( २ ) अनंतत्वाच्या प्रमाणानें दोन प्रलयांमधील अंतर अत्यंतात्यंत थोडें असतें. ( ३ ) बाह्यत: विश्व खरें भासत असलें तरी खऱ्या दृष्टीनें अखेरीस तें खोटें ठरतें. जसें, शिंपीच्या ठिकाणीं रुप्याचा भ्रम होतो अथवा रज्जूच्या ठिकाणीं सर्पभ्रम होतो, त्याचप्रमाणें मनाच्या विशिष्ट स्थितीपुरतेंच विश्व खरें भासतें; परंतु ही मानसिक स्थिति बदलल्यानंतर हा भ्रम नाहींसा होतो. ( ४ ) विश्वाला मुळांतच अस्तित्व नाहीं. त्याला अस्तित्व आहे असें ह्मणणें शशशृंगासारखें अथवा

वंध्यासुतासारखें आहे.

**प्रश्न**–अद्वैतसिद्धांतानें यांपैकीं कोणता अर्थ मान्य केला आहे?

**उत्तर**—अद्वैतवाद्यांतही निरनिराळे वर्ग आहेत; आणि ज्यानें त्यानें आपापल्यापरी यांपैकीं कोणतातरी अर्थ घेतला आहे. श्रीशंकराचार्यांनीं तिसरा अर्थ मान्य केला आहे. आपली सध्यांची मानसिक स्थिति शिल्लक आहे तोंपर्यंत विश्व खरें असून ही मानसिक स्थिति उच्चतरावस्थेस गेली ह्मणजे विश्व अदृश्य होतें, असें श्रीशंकराचार्यांचें मत आहे. रात्रींच्या अंधुकप्रकाशांत एखादें झाडाचें बुंधकेंहो तुह्मांस भुतासारखें दिसतें. हा भ्रम शिल्लक असेपर्यंत त्या भुताचें अस्तित्व आहे असेंच ह्मटलें पाहिजे; कारण, प्रत्यक्ष भुताच्या अस्तित्वानें जो कांहीं परिणाम तुमच्या चित्तावर व्हावयाचा तो त्या बुंधक्यामुळें त्या वेळीं होत असतोच. याकरितां त्या काळापुरतें त्याचें अस्तित्व खरेंच ह्मटलें पाहिजे. पण भ्रमनिरास होऊन तें बुंधकें आहे अशी तुमची खात्री झाल्यावर भूत आपोआपच नाहींसें होतें. भूत आणि झाडाचें बुंधकें या दोन्ही कल्पना एकसमयावच्छेदें तुमच्या चित्तांत राहूं शकणार नाहींत. एकीचें अस्तित्व असेपर्यंत दुसरी तेथें येऊं शकणार नाहीं.

**प्रश्न**—शंकराचार्यांच्या कित्येक ग्रंथांत चौथा अर्थही घेतला आहे ही गोष्ट खरी नाहीं काय?

**उत्तर**—नाहीं. आचार्यांचें मत ज्यांस बरोबर समजलें नाहीं अशा कित्येक ग्रंथकारांनीं आचार्यांच्या मताचा चुकीनें अतिरेक केला आहे. दुसऱ्या कित्येक अद्वैतवाद्यांनीं पहिला व दुसरा अर्थ घेतला आहे पण या दोन्ही अर्थांस आचार्यांची अनुमति नाहीं.

**प्रश्न**—या भ्रमाचें कारण काय?

**उत्तर**—झाडाच्या बुंधक्याला तुह्मी भूत समजतां याचें कारण काय? विश्व वस्तुतः एकरूपच आहे; पण तुह्मीं स्वतःच्या मनानें त्याजवर अनेक रूपांचा आरोप करीत असतां.

**प्रश्न**—वेद अनाद्यनंत आहेत या म्हणण्याचा खरा अर्थ काय? वेदांतील तत्त्वें अनाद्यनंत रूपाचीं आहेत कीं वेदच अनाद्यनंत आहेत असें समजावयाचें? जर त्यांतील तत्त्वें अनाद्यनंत आहेत असें म्हटलें तर त्याच दृष्टीनें न्याय, रसायनशास्त्र, भूमिति वगैरे शास्त्रेंही अनाद्यनंत म्हणावयास

काय हरकत आहे? कारण, या शास्त्रांतील सिद्धांतही चिरकालिक सत्यरूपाचे आहेत.

**उत्तर**—वेदांतील सिद्धांत सर्वकालिक सत्यरूपाचे असून त्यांत बदल होणें शक्य नाहीं असा समज एका काळीं होता. यानंतर हीं स्तोत्रेंही प्रत्यक्ष परमेश्वरापासूनच निर्माण झालीं असावीं, असा समज दृढ झाला. याहूनही पुढच्या काळीं बरींचशीं स्तोत्रें ईश्वरनिर्मित नसावीं असें त्यांच्या अर्थांवरून दिसून आलें. कारण, पुष्कळ अशुद्ध गोष्टी करण्याविषयीं कित्येक स्तोत्रांत मनुष्यजातीला उपदेश केला होता. पशुवध आणि दुसऱ्याही अनेक मूर्खपणाच्या कथांस वेदांत स्थळ मिळालें आहे हें आपणास ठाऊक आहेच. वेद अनाद्यनंत आहेत या म्हणण्याचा खरा अर्थ इतकाच कीं, त्यांतील तत्त्वें चिरकालीन सत्यरूपाचीं असून त्यांत कधींही बदल होणें शक्य नाहीं. न्याय, भूमिति, रसायनशास्त्र वगैरे शास्त्रेंही अशाच प्रकारचे चिरकालीन सत्य सिद्धांत सांगत असतात आणि या दृष्टीनें तीं शास्त्रेंही अनाद्यनंत आहे असेंही म्हणावयास हरकत नाहीं. तथापि अशा प्रकारचा एकही सिद्धांत श्रुतीच्या दृष्टींतून चुकला नाहीं हें मात्र लक्षांत ठेवणें अवश्य आहे. अशा प्रकारचा एखादा तरी सिद्धांत श्रुतींत नाहीं असें तुम्हीं मला दाखवून द्या.

**प्रश्न**—अद्वैत सिद्धांताप्रमाणें मुक्तीच्या कल्पनेचा काय अर्थ आहे? मुक्ती हीसुद्धां एक मानसीक स्थितिच आहे काय? बौद्धांचें निर्वाण आणि अद्वैतवाद्यांची मुक्ति यांत कांहीं फरक आहे काय?

**उत्तर**—मुक्तींत असलेल्या मानसिक स्थितीला आम्हीं उन्मनि असें ह्मणतों. ही स्थिति आपल्या सांप्रतच्या मानसिक स्थितीहून वेगळी आहे. मुक्तावस्थेंत कोणत्याच प्रकारची मानसिक स्थिति शिल्लक नसते असें ह्मणणें न्याय्य नाहीं. मानसिक अवस्था तीन प्रकारची असूं शकेल. कनिष्ट, मध्यम आणि उत्कट. प्रकाशांत ज्याप्रमाणें असेच तीन भेद असतात, त्याचप्रमाणें मनाच्या अवस्थेंतही ते आहेत. प्रकाशाचे स्पंद अत्यंत तीव्र झाले ह्मणजे दृष्टीला अंधेरी येते; यामुळें ते आपणास दिसूं शकत नाहींत. त्याच प्रमाणें अत्यंत कनिष्ट प्रकारचा प्रकाशही आपणांस दिसत नाहीं. बौद्धांच्या निर्वाणस्थितींतही अशाच प्रकारची मानसिक अवस्था असावी असें मला वाटतें.

आमची मुक्तीची व्याख्या ' अस्ति ' स्वरूपाची अथवा ' विधि ' स्वरूपाची असून बौद्धांची निर्वाणाची व्याख्या 'नास्ति ' स्वरूपाची अथवा निषेध रूपात्मक आहे.

**प्रश्न**–ब्रह्म केवलरूप असतां त्यानें जगद्रूप कां धारण केलें ?

**उत्तर**–हा प्रश्नच मुळीं असंभाव्य आहे. ' **अवाङ्मनसगोचरम्** ' असें ब्रह्माचें स्वरूप आहे. शब्द अथवा मन यांच्या आटोक्यांत तें येऊं शकतच नाहीं. देश, काल आणि निमित्त यांच्या बाहेर जें कांहीं असेल त्याची कल्पना मानवी मनास करतां येणें शक्य नाहीं. या उपाधित्रयाच्या सरहद्दीच्या आंत जें कांहीं असेल तेवढ्याच पुरता विचार करणें मानवी मनास शक्य आहे. अशी वस्तुस्थिति असतां या सरहद्दीपलीकडे काय आहे हें पाहूं जाणें म्हणजे व्यर्थ शीण करण्यासारखें आहे.

**प्रश्न**--पुराणांतर्गत गोष्टींतून पुष्कळ गुप्त तत्त्वें शोधून काढण्याचा यत्न अलीकडे कोठें कोठें होत असतो. पुराणांत ऐतिहासिक सत्य असलेंच पाहिजे असें नाहीं, असेंही अलीकडे कांहीं लोक ह्मणूं लागले आहेत. काल्पनिक स्त्रीपुरुषांच्या कथानकोच्या रूपानें मनुष्यजातीच्या उच्चतम ध्येयांचें निरूपण पुराणांत केलें आहे असें कांहीं लोक ह्मणत असतात. विष्णुपुराण, रामायण अथवा भारत इत्यादि पुराणांसंबंधीं अशाच प्रकारच्या कल्पना अलीकडे प्रसार पावूं लागल्या आहेत. पुराणांत कांहीं ऐतिहासिक सत्य आहे कीं त्यांनीं रूपकांच्या रूपानें सूक्ष्मेंद्रियशास्त्रांचे सिद्धांत सांगितले आहेत, किंवा मनुष्यजातीच्या उच्चतम ध्येयांचें निरूपण त्यांनीं केलें आहे, किंवा मिल्टन, होमर इत्यादिकांप्रमाणें तीं वीररसप्रधान काव्येंच आहेत.

**उत्तर**—प्रत्येक पुराणांत अंशत: थोडेंफार ऐतिहासिक सत्य आहे. मनुष्यजातीला उच्चतम सत्यस्वरूपाचें ज्ञान अनेक मार्गांनीं करून द्यावें हा पुराणांचा हेतु आहे. त्यांत कांहीं ऐतिहासिक सत्य नसलें तरी त्यांतील सत्य प्रमेयांच्या उद्घाटनामुळें त्यांस मोठा अधिकार प्राप्त झाला आहे, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. रामायणाचेंच उदाहरण घ्या. दानत कशी असावी यांचें जें स्पष्टीकरण रामायणांत आहे तें लक्षांत घेतलें·म्हणजे राम ही व्यक्ति प्रत्यक्ष अस्तित्वांत होती कीं नव्हती याचा विचार करण्याचीही आवश्यकता उरत नाहीं. ज्या मुख्य तत्त्वाचें उद्घाटन रामा-

यण अथवा महाभारत या ग्रंथांत केलें आहे, त्यांतील सत्यपणा राम अथवा कृष्ण या व्यक्तींच्या अस्तित्वावर अवलंबून नाहीं. या व्यक्ती केव्हांही अस्तित्वांतच नव्हत्या असेंही घटकाभर कबूल केलें तरी त्यांत सांगितलेलीं तत्त्वें अधिकारयुक्त वाणीनें सांगितलीं आहेत असें म्हणण्यास हरकत नाहीं. आमच्या तत्त्वज्ञानांतील प्रमेयांचें सत्यत्व कोणत्याही व्यक्तीवर अवलंबून नाहीं. भगवान् श्रीकृष्णांनींही अगदीं नवीन असें कांहींच सांगितलेलें नाहीं. त्याचप्रमाणें पूर्वी केव्हांही अस्तित्वांत नसलेलीं तत्त्वें रामायणांतही कथन केलेलीं नाहींत. ख्रिस्तावांचून ख्रिस्ती धर्माला बळकट पाया नाहीं अथवा महंमदावांचून मुसलमानी धर्म आणि बुद्धावांचून बौद्धधर्म चिरस्थायी स्वरूपाचे होऊं शकत नाहींत, हें विशेषेंकरून लक्षांत ठेवण्यासारखें आहे. हिंदुधर्माची गोष्ट मात्र याहून वेगळी आहे. हिंदुधर्माची उभारणी कोणत्याही व्यक्तीच्या अस्तित्वावर झालेली नाहीं. या दृष्टीनें पाहतां कोणत्याही पुराणाचें महत्व अजमावयाचें असेल तर त्यांतील व्यक्ति ऐतिहासिक होत्या कीं काल्पनिक होत्या याचा विचार करण्याचें कारण आपणास उरत नाहीं. मनुष्यजातीला संस्कृत करावें हा पुराणांचा उद्देश होता. ज्या ऋषींनीं तीं लिहिलीं त्यांनीं कांहीं ऐतिहासिक व्यक्ति घेऊन त्यांजवर अति उत्तम अथवा अत्यंत वाईट गुणांचा आरोप करून त्यांद्वारें मनुष्यजातीला त्यांनीं नीतीचे सिद्धांत सांगितले. व्यावहारिक नीतीचें स्वरूप अशा प्रकारें त्यांनीं व्यक्त करून दाखविलें. रामायणांत सांगितलेल्या रावणाला दहा तोंडें असलींच पाहिजेत ही कांहीं आवश्यकतेची गोष्ट नाहीं. दशमुखी रावण प्रत्यक्ष अस्तित्वांत होता कीं ती केवळ कवीची कल्पना आहे याचा विचारही न करतां रामायणांत सांगितलेल्या सत्यतत्वांचें ग्रहण करण्यास आपणास हरकत नाहीं. तुमची इच्छा असेल तर भगवान् श्रीकृष्णांचें शाब्दिक चित्र तुह्मीं आतां अधिक दर्शनीय रंगांत रंगवा. तुमच्या मनांतल्या कल्पनेंत जो कांहीं उदात्तपणाचा अंश असेल तितका या चित्रांत दिसेल. कृष्णाचें चित्र तुह्मीं बरें अथवा वाईट रंगविलें तरी पुराणांतील तत्त्वज्ञानाला त्यामुळें बाध येणार नाहीं.

**प्रश्न**—एखादा मनुष्य कितीही कुशल झाला तरी त्याला आपल्या पूर्वीच्या जन्मांतील गोष्टींचें स्मरण करतां येणें शक्य आहे काय? पूर्वीच्या जन्मांत ज्या मेंदूवर त्या जन्मांतील त्याच्या आठवणी कोरल्या गेल्या तो

मेंदु आतां अस्तित्वांत नाहीं. आतां चालू जन्मांत त्याला नवा मेंदु मिळाला आहे. अशी वस्तुस्थिति असतां जो मेंदु अस्तित्वांत नाहीं, त्याजवरील कल्पनाचित्र या जन्मींच्या मेंदूवर त्याला कसें घेतां येईल ?

**स्वामी**—कुशल मनुष्य ह्मणजे काय ?

**बातमीदार**—आपल्या प्रकृतींतील गुप्त सामर्थ्य ज्याच्या प्रत्ययास आलें आहे असा.

**स्वामी**—गुप्त सामर्थ्यांचा प्रत्यय तो कसा घेणार हेंच मला समजत नाहीं. तुमच्या मनांत काय ह्मणायाचें आहे हें माझ्या लक्षांत आलें. पण शब्दयोजना अधिक युक्त आणि अगदीं बरोबर केली पाहिजे. गुप्त शक्तीं-वरील पडदा निघून गेला असें पाहिजे तर ह्मणा. ज्याच्या गुप्त शक्तींवरील पडदा साफ निघून गेला आहे, अशा मनुष्याला पूर्वजन्मांतील सर्व गोष्टींचें स्मरण होणें शक्य आहे. पूर्वजन्मींच्या मृत्यूनंतर त्याच्या सूक्ष्म देहांत हल्लींच्या मेंदूचें बीज शिल्लक असतेंच.

**प्रश्न**—परधर्मीयांस हिंदुधर्मात घ्यावें अशा प्रकारची परवानगी हिंदुधर्मानें दिली आहे काय ? तसेंच एखाद्या चांडाळानें तत्त्वज्ञान सांगितलें तर एखा-द्या ब्राह्मणाला तें ऐकतां येईल काय ?

**उत्तर**—होय; हिंदुधर्मांत अशी परवानगी आहे. ब्राह्मणाला तत्त्वज्ञान सांगण्याचा अधिकार एखाद्या शूद्राला अथवा चांडाळालाही आहे.

☞ या ठिकाणीं स्वामींनीं आपल्या मताच्या पुष्टीसाठीं कांहीं संस्कृत श्लोक ह्मणून दाखविले.

देवळांत जाण्याची ठरलेली वेळ जवळ, आल्यामुळें आमचें संभाषण आटोपलें. हजर असलेल्या सर्व गृहस्थांचा निरोप घेऊन स्वामी देवालयांत निघून गेले.

---

नंबर ६.

## हिंदुस्थानांतील व बाह्य देशांतील कांहीं विषयांची चर्चा.

हिंदु, मद्रास, फेब्रुवारी १८९७.

चिंगलपुटच्या स्टेशनावर स्वामी विवेकानंद यांची व आमच्या बातमी-दाराची आगगाडींत गांठ पडून मद्रासपर्यंत त्या दोघांनीं बरोबर प्रवास केला. त्या वेळीं कांहीं विषयांची चर्चा झाली.

" स्वामीजी, आपण अमेरिकेस कोणत्या उद्देशानें गेलां होतां ?"

" हा प्रश्न इतका महत्वाचा आहे कीं त्याचें थोडक्यांत उत्तर देणें शक्य नाहीं. त्याचें अंशत: उत्तर मी आतां देतों. अमेरिकेस जाण्यापूर्वी साऱ्या हिंदुस्थानभर मी प्रवास केला होता आणि दुसरे देश पाहण्याची मला इच्छा होती. यासाठीं प्रथम जपानला जाऊन तेथून मी अमेरिकेस गेलों.

" जपानांत आपणास विशेष काय आढळून आलें ? त्या देशाची सांप्रत चांगली भरभराट होत आहे. ज्या मार्गानें जपाननें आपली प्रगति करून घेतली तोच मार्ग हिंदुस्थानाला हितावह होईल काय ?"

" हिंदुस्थानांतील तीस कोट प्रजा एकमताची होऊन तें एक राष्ट्र होईपर्यंत जपानच्या मार्गानें जाण्यांत अर्थ नाहीं. जपानी लोकांइतके देशाभिमानी आणि कलाकुशल लोक पृथ्वीच्या पाठीवर दुसरे कोणतेही नाहींत. याशिवाय जपानी कला आणि युरोपीय कला यांत असलेला एक भेदही विशेष लक्षांत ठेवण्यासारखा आहे. युरोपियांच्या कलाकुशलतेंत अस्वच्छपणा अतिशय असतो; पण जपानी कला म्हणजे स्वच्छतेची पुतळीच होय असें ह्मणावयास हरकत नाहीं. आपल्या साऱ्या आयुष्यांत एकवार तरी प्रत्येक हिंदी तरुणानें जपानची सफर करावी अशी माझी फार इच्छा आहे. जपानला जाणें फारसें अवघड नाहीं. हिंदुस्थानांतील प्रत्येक वस्तूबद्दल जपानी लोकांच्या मनांत मोठा आदर वसत असून हिंदुस्थान ही पुण्यभूमी आहे असा त्यांचा समज आहे. सिलोनांत असलेल्या बौद्धधर्माहून जपानांतील बौद्धधर्माचें रूप अगदीं वेगळें आहे. तेथें तो जवळ जवळ वेदान्ताच्याच स्वरूपाचा आहे. जपानांतील बौद्धधर्म विधायक स्वरूपाचा असून ईश्वराचें अस्तित्व त्यास मान्य आहे. उलटपक्षीं सिलोनांतील बौद्धधर्म सर्व दृष्टींनीं नास्तिक स्वरूपाचा आहे."

" जपानची एवढी मोठी भरभराट एकाएकीं कशानें झाली ?"

" त्या लोकांच्या ठिकाणीं आत्मश्रद्धा आणि देशाभिमान हीं फार जाज्वल्य आहेत. ज्या देशांतील लोक मातृभूमीच्या उद्धारासाठीं आपलें सर्वस्व अर्पण करण्यास तयार होतात, तेव्हां त्या देशाची भरभराट होते ह्यांत नवल नाहीं. हिंदुस्थानांत अशा प्रकारचीं माणसें जन्मास आलीं तर तो देशही प्रत्येक बाबींत मोठा होईल. कोणत्याही देशाचें मोठेपण त्यांतील

माणसांवर अवलंबून असतें. त्यांवांचून नुस्ता देश काय करणार? जपानच्या सामाजिक आणि राजकीय नीतीचें अवलंबन तुम्ही केलें तर तुमचा देशही मोठा होईल. आपल्या मातृभूमीसाठीं सर्वस्वावर पाणी सोडण्यास प्रत्येक जपानी मनुष्य तयार असतो. जपानच्या मोठेपणाचें कारण हेंच होय. तुमच्या ठिकाणीं अशा प्रकारचा स्वार्थत्याग नसल्यामुळें तुमचा देश मोठा होणें शक्य नाहीं. केवळ आपल्या आप्तेष्टांपुरताच तुमचा स्वार्थत्याग असतो."

"जपानची स्थिति हिंदुस्थानाला प्राप्त व्हावी अशी तुमची इच्छा आहे काय?"

"अर्थात् नाहीं. हिंदुस्थानानें आपली पूर्वपरंपरा चालू ठेवावी अशी आमची इच्छा आहे. हिंदुस्थान जपानसारखा अथवा दुसऱ्या कोणत्याही देशासारखा होणें शक्य तरी आहे काय? प्रत्येक देशाला एक एक प्रमुख अथवा आदिहेतु असतो. त्यांतील बाकीच्या सर्व गोष्टी आगंतुक स्वरूपाच्या असतात. धर्म हा भरतभूमीचा आदिहेतु आहे. सामाजिक सुधारणा वगैरे बाकीच्या साऱ्या गोष्टी केवळ आगंतुक रूपाच्या आहेत. यामुळें हिंदुस्थान जपानसारखा होऊं शकणार नाहीं. अंतःकरण खुलें झालें म्हणजे विचारांचा प्रवाह बाहेर पडतो. हिंदुस्थानाचें अंतःकरण खुलें झालें म्हणजे तेथून धर्म-प्रवाह बाहेर पडेल. हिंदुस्थान तें हिंदुस्थानच! सर्व प्रकारें एक दुसऱ्या-सारखा कधींहि होऊं शकणार नाहीं. कांहीं झालें तरी आपण हिंदूच राहूं; जपान्यांसारखे आपण होणार नाहीं. हिंदुस्थानचें नुस्तें वातावरणही शांति-दायक आहे. येथें आल्यापासून मी एकसारखा कामास जुंपलों आहें तथापि त्यांतही येथें मला विश्रांति मिळते. केवळ धार्मिक कामांत गुंतलेल्या मनु-ष्यालाच हिंदुस्थानांत खरी विश्रांति मिळते. येथें तुम्ही कांहीं सांसारिक कार्यांत पडलां असलां म्हणजे मृत्यु तुम्हांस ताबडतोब गांठतो. असल्या कार्यांत सदैव गुंतलेल्या लोकांना मधुमेहासारखे विकार व्हावयाचे."

"ही जपानची हकीगत झाली. आतां अमेरिकेंत आपणास प्रथम काय अनुभव आला?"

"अव्वलपासून अखेरपर्यंत माझा अनुभव फार संतोषकारक होता. मिशनरी आणि 'धार्मिक बाया' यांखेरीज बाकीचे अमेरिकन लोक सदय

अंत:करणाचे, उदार, सुस्वभावी आणि अथितिसत्कारप्रिय असल्याचें मला आढळून आलें."

"स्वामीजी, आपण धार्मिक बाया म्हणालां त्या कोण ?"

"एखादी स्त्री विवाहोत्सुक असली म्हणजे समुद्रकांठच्या एखाद्या फॅशनेबल् लोक जमण्याच्या जागीं ती जाते; आणि नवरा मिळविण्यासाठीं अनंत प्रकारच्या भल्याबुऱ्या खटपटी करते. या तिच्या प्रयत्नांस यश आलें नाहीं म्हणजे मग ती 'धार्मिक' बनते. अशा स्त्रीला अमेरिकेंत वृद्ध कुमारी असें ह्मणतात. या धार्मिक बाया निव्वळ धर्मवेड्या बनलेल्या असतात. त्यांजवर मिशनऱ्यांचें विलक्षण वजन बसलेलें असतें. अशा प्रकारच्या बाया आणि हे मिशनरी मिळून धर्माचा नुसता चिवडा करून टाकतात. अशा लोकांच्या सपाट्यांत जग सांपडलें तर खरोखर त्याला नरकाचें स्वरूप प्राप्त होईल. हीं माणसें वगळलीं तर बाकीचे अमेरिकन लोक खरोखरच फार चांगले आहेत. त्यांचें मजवर इतकें प्रेम बसलें होतें कीं मी जणूं काय त्यांच्यांतलाच एक आहें असें मला वाटूं लागलें."

"तेथें भरलेल्या महाधर्मपरिषदेचे एकंदर परिणाम काय होतील असें आपणास वाटतें?"

"माझ्या दृष्टीनें ख्रिस्ती धर्मांखेरीज इतर धर्मांचा निव्वळ तमाशा उभा करण्याकरितां ही महापरिषद् भरविली होती; पण अखेर परिणाम मात्र भलताच झाला. आम्हांसारख्या परधर्मियांचा वर पगडा होऊन ख्रिस्ती धर्माचा तमाशा मात्र जगाला दिसला. याकरितां ख्रिस्ती लोकांच्या दृष्टीनें ही महापरिषद् अपेशी झाली असेंच म्हटलें पाहिजे. या महापरिषदेची सारी मांडणी रोमन क्याथोलिक लोकांनीं केली होती. त्यांनासुद्धां आपल्या कृतीबद्दल आतां वाईट वाटत असलें पाहिजे. पॅरिसमध्यें अशाच प्रकारची परिषद् भरविण्याचा बूट निघाला, तेव्हां रोमन क्याथोलिक लोकांनींच त्याविरुद्ध खटपट चालविली; तथापि आम्हां हिंदुलोकांच्या दृष्टीनें पाहिलें म्हणजे शिकागो येथील धर्मपरिषद् अत्यंत यशस्वी झाली असें म्हणावयास हरकत नाहीं. सर्व जगावर उसळूं पाहणाऱ्या वेदान्ताच्या लाटेला या परिषदेनें प्रथम प्रोत्साहन दिलें. मिशनरी आणि 'धार्मिक बाया,' वजा करून बाकीच्या अमेरिकन लोकांसही या परिषदेनें फार आनंद वाटला."

" आपल्या धर्मकार्याचा जम इंग्लंडांत कितपत बसेल असें आपणास वाटतें ? "

" यासंबंधी एकंदर चिन्हें चांगलींच आशाजनक दिसतात. आणखी फार वर्षे लोटलीं नाहींत तोंच इंग्लंडांतील पुष्कळसे लोक वेदान्ती होतील असें मला वाटतें. अमेरिकेंत कोणत्याही गोष्टीचा गाजावाजा फार होतो; पण इंग्लंडांत अशी गोष्ट घडत नाहीं, हें लक्ष्यांत ठेवण्यासारखें आहे. नव्या करारांचें रहस्यही वेदान्ताच्या साहाय्यावांचून लक्षांत येणार नाहीं. कोणत्याहि धर्माचें तात्विक व बुद्धीस पटणारें असें स्वरूप करावयाचें असेल तर त्याला वेदान्ताचें साहाय्य पाहिजे. वेदांताच्या सहाय्यावांचून कोणताही धर्म आंधळा होतो; आणि त्याच्या साहाय्यानें कोणत्याही पंथाला खऱ्या विशुद्ध धर्माचें स्वरूप प्राप्त होतें. "

" इंग्रज लोकांच्या दानतींत आपणास विशेष असें काय आढळून आलें ? "

" कोणत्याही इंग्रजाला एखाद्या गोष्टीबद्दल खात्री पटली म्हणजे तो ताबडतोब ती प्रत्यक्ष आचरणांत आणतो. प्रत्यक्ष कार्य करण्याला लागणाऱ्या मानसिक शक्तीचा भरपूर सांठा त्याजपाशीं आहे. या बाबतींत इंग्रज स्त्रीपुरुषांवर जगांतील दुसरी कोणतीही जात कडी करूं शकणार नाहीं. यामुळेंच इंग्लंडांतल्या माझ्या कार्यासंबंधीं मला फार भरंवसा वाटतो. इंग्रज लोक थोडेसे मठ्ठ डोक्याचे आहेत, ही गोष्ट खरी; त्यांच्या डोक्यांत कोणत्याही नव्या गोष्टीचा प्रवेश लौकर व्हावयाचा नाहीं; पण एकवार तिचा प्रवेश त्यांच्या मेंदूंत झाला कीं कांहीं केल्या ती तेथून बाहेर पडावयाची नाहीं. माझ्याविरुद्ध बोलणारा अथवा माझी नालस्ती करणारा एकही मिशनरी अथवा दुसरा कोणी इंग्लंडांत मला आढळला नाहीं. इंग्लंडांतून आपल्याइकडे जे मिशनरी येतात त्यांत उच्च वर्गीय लोक बहुधा नसतात असें मला आढळून आलें. माझे इंग्लंडांतील पुष्कळसे स्नेही तर इंग्लंडचा राष्ट्रीय धर्म पाळणारे आहेत. त्यांच्याशीं कांहीं बाबतींत तुमचा मतभेद झाला तरी तेवढ्यामुळें तुमच्याशीं स्नेह करण्यास ते नाराज नसतात. याकरितां माझ्या देशबांधवांना एक इशारा मला द्यावासा वाटतो. येथले मिशनरी आमच्याविरुद्ध कांहीं बडबडत असले तरी त्यांजकडे अगदीं दुर्लक्ष्य करावें अशी माझी सूचना आहे. त्यांचा खरा दर्जा काय आहे हें

आतां मला कळलें आहे. असल्या लोकांच्या बडबडीची उपेक्षा करणें हेंच आपणास एकंदरींत श्रेयस्कर आहे."

"स्वामीजी, अमेरिकेंत आणि इंग्लंडांत सामाजिक सुधारणेचे प्रयत्न कोणत्या दिशेनें चालले आहेत हें आपण मला सांगाल काय?"

"होय; युरोपीय समाज उलथापालथा करावा या उद्देशानें ज्यांनीं कंबरा बांधिल्या आहेत, त्यांच्या लक्ष्यांत एक गोष्ट आतां येत चालली आहे. सर्व लोकांस समान हक्क असावेत हें त्यांचें मुख्य मत आहे. या मताला धार्मिक पाया असल्यावांचून त्याला स्थैर्य येणार नाहीं, ही गोष्ट या लोकांस आतां पटली आहे; आणि अशाप्रकारचा पाया फक्त वेदान्तांतच मिळूं शकतो. या लोकांतले पुष्कळसे पुढारी माझीं व्याख्यानें ऐकावयास येत असत. समाजरचना नव्या पद्धतीवर बनविण्यास वेदान्ताचा आधार अवश्य आहे असें खुद्द त्यांनींच मला सांगितलें."

"हिंदुस्थानांतील सामान्य जनतेबद्दल आपलें काय मत आहे?"

"आपण सारेच दारिद्र्यानें गांजलेले आहों; आणि आमच्या सामान्य जनतेंत ऐहिक परिस्थितीबद्दल अज्ञानाचा पूर्ण अंधार पसरला आहे. आमचें दारिद्र्य गुन्ह्यांला उत्तेजन देणारें नसल्यामुळें आमची सामान्य जनताही पुष्कळ नीतिमान् राहिली आहे. त्यांच्यांत उच्छृंखलपणाचा मागमूसही लागत नाहीं. इंग्लंडांत आणि अमेरिकेंत केवळ माझ्या पोषाखाच्या वैचित्र्यामुळें पुष्कळ वेळां सामान्य लोकांनीं मजवर हल्ले केले. अशी गोष्ट आपल्या देशांत घडणें शक्य नाहीं. युरोपांतील खालच्या वर्गाच्या लोकांपेक्षां आमचा खालचा वर्ग किती तरी अधिक सुसंस्कृत आहे."

"आपल्या देशांतील या लोकांची स्थिति सुधारण्यासाठीं काय करावें असें आपणास वाटतें?"

"आपण प्रथम त्यांस सांसारिक शिक्षण दिलें पाहिजे. आपल्या पूर्वजांनीं यासंबंधीं जो मार्ग स्वीकारला होता तोच पुन्हां अमलांत आणावा असें माझें मत आहे. सर्व उच्चतम साध्यांची कल्पना हळूहळू खालच्या वर्गापर्यंत पोहोंचविण्याचें कार्य आपले पूर्वज करीत होते. अशा रीतीनें त्यांची उन्नति होऊन ते उच्चवर्गीयांच्या बरोबरीचे होतील. धार्मिक शिक्षण देत असतां त्याच मार्गानें ऐहिक शिक्षणही त्यांस दिलें पाहिजे.

" स्वामीजी, हें कार्य अगदीं सहजासहजीं होण्यासारखें आहे असें आपणास वाटतें काय ? "

" अर्थात् तें हळूहळूच होईल; पण पुरेसे स्वार्थत्यागी तरुण मिळाले तर या कार्याला उद्यांच सुरुवात करतां येईल. ज्या मानानें या कार्याला स्वार्थ-त्याग आणि उत्साह यांचा पाठिंबा मिळेल त्या मानानेंच त्याला फलही येईल. "

" पण त्यांची सांप्रतची अवनतावस्था पूर्वकर्मानुरोधानेंच त्यांस प्राप्त झाली असली तर तींतून ते कसे बाहेर पडणार ? आणि तुह्मी तरी त्यांस कशी मदत करणार ? "

" मनुष्य कर्म करूं शकतो, यावरूनच तो खरा स्वतंत्र प्राणी आहे, हें निःसंशय सिद्ध होतें. आपल्या कर्मानेंच आपण अवनतीस जात असलों तर आपली उन्नति करून घेण्यास त्याच कर्मानें आपणास सामर्थ्य प्राप्त होईल. याशिवाय आमच्या सामान्य जनतेची सांप्रतची अवनतावस्था ही केवळ त्यांच्याच कर्माचें फळ नाहीं. याकरितां आतां त्यांना नवी परि-स्थिति निर्माण करून देणें आपणास भाग आहे. सर्व जातिभेद मोडून टाकावे असें माझें ह्मणणें नाहीं. जाति असणें हिताचें आहे, असें मला वाटतें. पण जात ह्मणजे काय, हें खरोखर लाखांत एखाद्याला सुद्धां सम-जत नसेल. ज्यांत जातिभेद नाहीं असा देश जगांत एकही नाहीं. हिंदु-स्थानांत अनेक जाती असतांही जेथें जातिभेद नाहीं अशा ठिकाणीं आपण पोहोंचूं शकतों. या एकाच तत्त्वास अनुसरून वर्णभेदाची रचना झाली आहे. सर्व मनुष्यजातीचें ब्राह्मण्य हें साध्य असल्यामुळें प्रत्येकाला शेवटीं ब्राह्मण बनविणें हा हिंदु वर्णभेदाचा हेतु आहे. कनिष्ट वर्गीयांस उच्च वर्गीयत्व देण्याचे यत्न हिंदुस्थानांत पूर्वी झाले असल्याचें इतिहासावरून दिसून येतें. अशा रीतीनें अनेक कनिष्ट वर्ग उच्चत्वास गेले आहेत. हळू हळू सर्व वर्ण आपआपला मार्ग क्रमीत ब्राह्मण्यास पोहोंचतील. उच्च वर्णीयांस त्यांच्या पदापासून खालीं न ओढतां खालच्या वर्णास वर नेणें हें आपलें कार्य आहे. हें कार्य खुद्द ब्राह्मणांनींच केलें पाहिजे. आपणास श्रेष्ठ समजून इतरां-पासून जे अलिप्त रहात असतात, त्यांना आपल्या मृत्यूची तयारी स्वतःच करावी लागते. या कार्यास ब्राह्मणवर्ग जितकी लौकर

सुरवात करील तितकें सर्वांसच बरें. आतां वेळ गमावण्यांत अर्थ नाहीं. युरोपांत अथवा अमेरिकेंत असलेल्या जातिभेदापेक्षां हिंदुस्थानांतील जातिभेद पुष्कळ चांगला आहे. जर हिंदुस्थानांत जातिभेद नसता तर तुमच्या साहित्यसंगीतादि कलांची आणि तुमच्या शास्त्रांची काय वाट झाली असती ? हिंदुस्थानांत जातिभेद नसता तर युरोपीय पंडितांस अभ्यास करण्यास आमची प्राचीन विद्याही राहिली नसती. हिंदुस्थानांत जातिभेद नसता तर मुसलमानांनीं आमची सारी संस्कृती धुळीस मिळविली असती. हिंदुसमाज कोणत्याही काळीं केवळ निश्चळ स्थितींत असल्याचें आपणास आढळून येतें काय ? त्याचें एकसारखें चालन होत आहे. परकीयांच्या अमलाखालीं कित्येक वेळां हें चालन फार मंद स्वरूपाचें असतें, आणि दुसऱ्या कित्येक वेळां तें अधिक सपाट्याचें असतें. हिंदुसमाजाला नांवें ठेवण्याची माझी मुळींच इच्छा नाहीं. त्यांची पूर्वीची स्थिति मी विसरलों नाहीं. अशाच प्रकारच्या परिस्थितींत दुसऱ्या राष्ट्रानें अधिक मोठें कार्य केलें नसतें अशी माझी खात्री आहे. आतां पूर्वींच्याहून अधिक कर्तबगारी दाखवा आणि अधिक चांगलें कार्य करा, इतकेंच त्यांस माझें सांगणें आहे."

"स्वामीजी, धार्मिक आचार आणि वर्ण यांच्या परस्परसंबंधाविषयीं आपलें काय मत आहे ?"

"जाती वरच्यावर बदलत असतात. त्याच प्रमाणें आचार व विधि हेंहि बदलत असतात. नित्य स्वरूपाचें ह्मटलें तर तत्त्व हेंच एक आहे. तत्त्व मात्र केव्हांही बदलत नाहीं. आपणास आपल्या धर्माचा अभ्यास करावयाचा असेल तर तो श्रुतीच्या द्वारेंच करावयास पाहिजे. श्रुतीशिवाय इतर सर्व ग्रंथांत बदल होणें शक्य आहे. किंबहुना असा बदल होणारच. फक्त वेदांचें प्रामाण्य मात्र सर्वकालीन आहे. इतर ग्रंथांचा अधिकार फक्त त्या त्या वेळेपुरता खरा असतो. उदाहरणार्थ एका युगांत एक स्मृति प्रमाण असली तर दुसऱ्या युगांत दुसरी स्मृति प्रमाण होते. महापुरुष वारंवार अवतरतात आणि पुढील मार्ग दाखवितात. यांपैकीं कित्येकांनीं कनिष्ठ वर्गाचा उद्धार केला तर मध्वाचार्यांसारख्या दुसऱ्या कित्येकांनीं स्त्रियांस वेदाध्ययनाचा अधिकार दिला. जातिभेद नाहींसा होण्यांत अर्थ

नाहीं. मात्र परिस्थितीप्रमाणें त्याला योग्य प्रकारची नवी घटना मिळाली पाहिजे. जातिभेद नष्ट व्हावा अशी इच्छा धरणें हा निव्वळ मूर्खपणा आहे. जुना जातिभेद अधिकाधिक सुसंस्कृत होत जावा यांतच हित आहे."

" हिंदूंना समाजसुधारणेची आवश्यकता नाहीं काय ? "

"आह्मांस समाजसुधारणेची आवश्यकता आहे. पूर्वकाळीं समाजसुधारणेसाठीं महापुरुष नव्या नव्या कल्पना योजीत असत आणि राजेलोक कायद्यांच्या द्वारें त्यांना पाठिंबा देत. पूर्वकाळीं हिंदुस्थानांत समाजसुधारणेचें कार्य अशाच प्रकारें चालत असे. सांप्रत काळीं अशा सुधारणा घडवून आणण्यास प्रथम पाठिंबा मिळविला पाहिजे. पूर्वकाळीं असा पाठिंबा राजेलोकांकडून मिळत असे. ते राजे आतां गेले, आणि त्यांची ती शक्ति आतां सामान्य जनतेंत येऊन राहिली आहे. याकरितां सामान्य जनता सुशिक्षित होईपर्यंत आपण वाट पाहिली पाहिजे. ती सुशिक्षित झाली म्हणजे आपल्या गरजा काय आहेत हें तिचें तिला समजूं लागेल आणि त्या भागविण्यासाठीं तिची तीच तोड काढील; मूठभर लोकांनीं इतर लक्षावधी लोकांवर जुलूम करणें अनर्थावह आहे. याकरितां ज्या सुधारणा केव्हांही व्यवहार्य होण्याचा संभव नाहीं त्यांच्यामागें लागून आपल्या मानसिक शक्तीचा अपव्यय करण्यापेक्षां आपण एकदम मुळापर्यंत खोल बुडी मारावी हें अधिक बरें. सामान्य जनतेला प्रथम सुशिक्षित करा म्हणजे तीच आपला पुढील मार्ग शोधून काढण्यास समर्थ होईल. हें साध्य होईपर्यंत तुमच्या सुधारणेच्या उच्चतम कल्पना केवळ कल्पनावस्थेंतच राहतील यांत संशय नाहीं. सामान्य जनतेनें स्वत:सच सुधारलें पाहिजे असा हा नवा मनु आहे. अशा रीतीनें सुधारणेचें गाडें चालू होण्यास अधिक वेळ लागेल हें उघड आहे. विशेषत: हिंदुस्थानांत तर अधिक काळ लागेल यांत नवल नाहीं. कारण, या सर्व गोष्टी सामान्य जनतेकरितां राजांनीं करावयाच्या अशी संवय तिला लागली आहे."

" युरोपांतील सामाजिक कायदे इकडे आणले तर हिंदुसमाजाचा फायदा होईल असें आपणास वाटतें काय ? "

सरसहा असें अनुकरण करणें इष्ट नाहीं. युरोपियांची कर्मप्रवणता आणि हिंदूंची धार्मिकता असा संयोग आपणास आपल्या समाजरचनेंत करतां

आला, तर तशा प्रकारची समाजरचना अगदीं नमुनेदार होईल असें मला वाटतें. उदाहरणार्थ, मोठमोठया साध्यांच्या नुसत्या गप्पा मारण्याचा मूर्खपणा करण्यापेक्षां इंग्रजलोकांचा आज्ञाधारकतेचा गुण तुह्मी उचलला तर अधिक बरें. त्याचप्रमाणें मत्सराचा पूर्ण अभाव, एकसारखें काम करीत राहण्याची उत्सुकता आणि अमर आत्मश्रद्धा हेही त्यांचे गुण तुह्मी अवश्य घ्या. आपल्या पुढाऱ्यांचा हुकुम इंग्रजलोक ताबडतोब अमलांत आणतात. कोणत्याही कार्यासाठीं त्यांनीं एखाद्याची निवड 'पुढारी' म्हणून केली कीं, कसल्याही प्रसंगांत ते त्याला पाठबळ देतात आणि त्याच्या आज्ञेंत असतात. आमच्या हिंदुस्थानांत प्रत्येकाला पुढारी व्हावयास पाहिजे. हुकूम करणारे सारे पण ते पाळणारा कोणीच नाहीं, अशी स्थिति येथें आहे. हुकूम करण्याची स्थिति प्राप्त व्हावी अशी इच्छा करणारानें प्रथम हुकूम पाळण्यास शिकलें पाहिजे. तसेंच आमच्यांत मत्सराचाही आतां अतिरेक झाला आहे. आम्हीं हिंदुलोक जों जों अधिक दुर्बल होत जातों तों तों अधिक मत्सरीही होतों. आज्ञाधारकता आणि मत्सराचा अभाव हे दोन्ही गुण हिंदुलोकांच्या आंगीं येईपर्यंत त्यांच्यांत घटनेचें सामर्थ्य येणार नाहीं. आणि असें सामर्थ्य प्राप्त होईपर्यंत आमची सध्यांची बाजारबुणग्यांची स्थिति अशीच कायम राहील. अशा स्थितींत कोणतेंही कर्तव्य आम्हांस करतां येणार नाहीं; आणि कोणतीही आशा फलद्रूप होणार नाहीं. बाह्यसृष्टीवर युरोपीय लोकांनीं जय कसा मिळविला हें हिंदुलोकांनीं त्यांजकडून शिकलें पाहिजे. त्याचप्रमाणें आम्हीं अंतर्गत अथवा मानसिक शक्तीवर कसा विजय मिळवितों, हें त्यांनीं आह्मांकडून शिकलें पाहिजे. अशा प्रकारचा परस्परविनिमय होऊन जी समाजरचना निर्माण होईल तिला हिंदु अथवा युरोपीय असें विशिष्ट नांव देण्याचें कारणच उरणार नाहीं. अंतर्गत व बाह्य अशा दोन्ही सृष्टींवर विजय मिळविलेली ही समाजरचना सर्व जगास आदर्शवत् होईल. मानवजातीचा एक भाग आम्हीं पूर्णत्वास आणला असून दुसरा भाग पाश्चात्यांनीं पूर्णत्वास आणला आहे. या दोन्ही भागांचें एकीकरण करणें हें आपलें साध्य होय. आमच्या धर्माचा आदिहेतु स्वातंत्र्य हा आहे. यांत शारीरिक, मानसिक आणि आध्यात्मिक अशा तिन्ही प्रकारच्या स्वातंत्र्याचा अंतर्भाव होतो."

" स्वामीजी, धार्मिक बाह्य विधि आणि धर्म यांचा परस्पर संबंध काय आहे ? "

"बाह्य विधि हे धर्माचे वस्तुपाठ होत. जगाची सांप्रत जी कांहीं स्थिति आहे, त्या स्थितींत या साऱ्या विधींची अत्यंत आवश्यकता आहे. जुने आचार व विधि परिस्थित्यनुरूप निरुपयोगी झाले असल्यामुळें त्यांच्या जागीं नव्यांची योजना आपणास केली पाहिजे. विचारवंत आचार्यांनीं या गोष्टी केल्या पाहिजेत. एका बाजूनें जुन्या विधींस फांटा दिला जात असतां त्या जागीं त्याच वेळीं नव्या विधींची योजनाही व्हावयास हवी."

" तर मग सर्व विधी मोडून टाकावे असेंच आपलें म्हणणें आहे ना ? "

" नाहीं; माझी योजना कोणत्याही प्रकारच्या निषेधक स्वरूपाची नसून विधायक रूपाची आहे. चालू असलेल्या विधींतच योग्य फेरफार करून त्यांतूनच नवे विधी निर्माण करावयास पाहिजेत. प्रत्येक विधीचें संशोधन करून त्याचा उद्धार करतां येईल असें मला निःसंशय वाटतें. जगांतील प्रत्येक अणूच्या मागें सर्व विश्वाचें सामर्थ्य असतें. हिंदुकुलाचा समग्र इतिहास आपण अवलोकन केला तर त्यांत मोडतोडीचे प्रयत्न झाले नसून नेहमीं विधायक स्वरूपाचेच यत्न होत गेल्याचें आढळून येतें. मोडतोडीचे यत्न फक्त बौद्धांनींच केले; पण हिंदुस्थानांतून त्यांची पूर्ण हाकालपट्टी झाली. श्रीशंकराचार्य, श्रीरामानुज, श्रीमध्व, श्रीचैतन्य इत्यादि अनेक सुधारक आम्हांमध्यें होऊन गेले. या साऱ्यांची सुधारणा विधायक रूपाची होती. आपापल्या परिस्थितीस अनुरूप अशी विधायक स्वरूपाची सुधारणा त्यांनीं घडवून आणली. त्यांनीं जुन्याचा नाश केला नाहीं. जुन्याचा नाश न करतां त्यांतूनच नवी सृष्टि त्यांनीं निर्माण केली. आमच्या प्राचीन सुधारकांचा हाच विशेष होय. आमच्या साऱ्या अर्वाचीन सुधारकांनीं पाश्चात्यांची मोडतोडीची पद्धत स्वीकारिली आहे. या पद्धतीनें पूर्वकाळींही कांहीं कार्य झालें नाहीं आणि पुढेंही होणार नाहीं. अलीकडच्या काळांत विधायक स्वरूपाची सुधारणा करणारा असा फक्त एकच सुधारक बनून गेला. तो सुधारक राजा राममोहन रॉय हा होय. वेदान्तानें जीं अत्युच्च साध्यें आम्हांपुढें ठेविलीं आहेत, तीं ज्या मार्गानें साध्य होतील त्याच मार्गानें, हिंदुकुल

आजपर्यंत पावलें टाकीत आलें आहे. हा मार्ग आक्रमण करीत असतां या कुलावर कधीं वाईट प्रसंग आले तर त्याला कधीं सुखाचे दिवसही दिसले. पण भल्याबुऱ्या प्रसंगांची पर्वा न करतां हें कुल एकसारखें याच मार्गानें आजपर्यंत चालत आलें आहे. वेदान्तानें सांगितलेलें साध्य मान्य न करणारा एखादा पंथ येथें ज्या ज्या वेळीं अस्तित्वांत आला त्या त्या वेळीं तो लवकरच नामशेष झाला.

" आपण येथला आपला पुढला मार्ग कांहीं आंखून ठेविला आहे काय ? "

" माझ्या कार्यपूर्तीसाठीं मद्रास आणि कलकत्ता या दोन शहरीं दोन मठ स्थापण्याचा माझा हेतु आहे. वेदान्तानें सांगितलेलीं साध्यें ब्राह्मणापासून तों अत्यंजापर्यंत सर्वांस सारखींच सुलभ करून द्यावीं हें माझें कार्य आहे."

हिंदुस्थानच्या राजकीय परिस्थितीसंबंधीं आमच्या बातमीदारानें स्वामीजींस कांहीं प्रश्न विचारले; पण स्वामीजी त्यांस उत्तर देणार इतक्यांत गाडी एग्मोरच्या स्टेशनांत आली. गाडींतून बाहेर पडतां पडतां आपणास ' हिंदुस्थानच्या अथवा युरोपच्या राजकीय भानगडींत पडण्याची मुळींच इच्छा नाहीं ' अशा अर्थाचे कांहीं शब्द स्वामीजी बोलले, व अशा रीतीनें ही मुलाखत संपली.

---

नंबर ७.

## पहिल्या हिंदुसंन्याशाचें पाश्चात्य देशांत धर्मप्रसाराचें कार्य व हिंदुस्थानच्या पुनरभ्युदयासाठीं प्रयत्न.

मद्रास टाइम्स, फेब्रुवारी १८९७.

जगभर ख्याति पावलेले स्वामी विवेकानंद येथें येणार या आशेनें येथील हिंदुजनता अत्यंत उत्कंठेनें गेले कित्येक आठवडे त्यांची वाट पहात आहे. सांप्रत प्रत्येकाच्या तोंडून त्यांचें नांव ऐकूं येतें. शाळेंत, कॉलेजांत, हायकोर्टांत, रस्त्यावर, समुद्रकांठीं अथवा बाजारांत तुम्ही कोठेंही गेलां तरी तुम्हांस ' स्वामी केव्हां येतील ? ' असा प्रश्न विचारणारे लोक शेंकडों भेटतील.

विश्वविद्यालयाच्या परिक्षेसाठीं बाहेर गांवाहून आलेले कित्येक विद्यार्थी स्वामींची वाट पहात अद्यापि येथें राहिले आहेत. लौकर निघून येण्याविषयीं आईबापांचीं निकडीचीं पत्रें येत असतांही व खाणावळीचा खर्च रोज वाढत असतांही त्याकडे लक्ष्य न देतां हे विद्यार्थी येथें राहिले आहेत. आणखी थोड्या दिवसांनीं स्वामी येथें येऊन पोहोंचतील. या इलाख्यांत इतर ठिकाणीं त्यांच्या निमित्त जे स्वागतसमारंभ झाले व येथेंही जी तयारी चालू आहे तिजवरून स्वामींचें स्वागत मोठया थाटानें होईल असें म्हणावयास हरकत नाहीं. न्यायमूर्ति सुब्रह्मण्य अय्यर यांच्यासारख्या कित्येक पुढारी सद्गृहस्थांनीं यांत पुढाकार घेतला आहे. जागोजागीं भव्य कमानी उभारण्यांत आल्या आहेत. स्वामीजींच्या आंगचे अद्वितीय गुण मद्रासेनेंच पहिल्यानें ओळखिले आणि त्यांस शिकागो येथें रवाना केलें. आतां भरतभूमीचा मान बाह्य देशीं वाढवून स्वामी परत येत आहेत. स्वामीजींच्या मोठेपणाबद्दल आतां कोणासही संशय उरलेला नाहीं. अशा स्थितींत स्वामीजींचें स्वागत करण्याचा मान मद्रासेस पुन: मिळत आहे. चार वर्षांपूर्वी स्वामी प्रथम येथें आले त्या वेळीं त्यांच्या गुणांची ओळख फारशी कोणास झाली नव्हती. एका लहानशा घरांत त्या वेळीं ते दोन महिने राहिले होते. त्या वेळींही ते धर्मशिक्षणाचें काम करीत होते. त्या वेळींही स्वामीजी ही एक विशेष व्यक्ति असून पुढेंमागें त्यांच्या गुणांचा प्रकाश पडून ते पुढारी म्हणविण्याच्या योग्यतेचे ठरतील असें कित्येक दूरदर्शी लोकांस वाटत होतें. या मंडळीला दुसरे कित्येक लोक वेडगळ म्हणून हांसतही होते; पण युरोपांत आणि अमेरिकेंत कीर्ति मिळवून स्वामी आतां येत असल्यामुळें त्यांच्या पूर्वीच्या चहात्यांस अत्यंत संतोष वाटत असेल यांत नवल नाहीं. धर्मप्रसार करणें हेंच स्वामीजींचें मुख्य कार्य आहे. हिंदुस्थान ही धर्मभूमि असून भविष्यत्कालीं तिचा मोठेपणा पुन्हां प्रस्थापित होईल अशी स्वामीजींची पक्की श्रद्धा आहे. वेदान्तधर्माचे उदात्त सिद्धांत पाश्चात्यांस अधिकाधिक ग्राह्य होत जातील अशी खात्री त्यांस वाटते. 'परस्परांस मदत करा आणि भांडूं नका', 'घेण्यासारखें असेल तें घ्या पण मोडतोड करूं नका', 'शांततेनें नांदा आणि भांडणें करूं नका' हीं स्वामीजींचीं मुख्य सूत्रें आहेत. स्वामीजींच्या मतांबद्दल परधर्मीयांचा त्यांशीं

कांहीं मतभेद असला तरी हिंदुसंस्कृतींत असलेला चांगला भाग पश्चात्यांच्या नजरेस आणून व त्यांचा भ्रमनिरास करून आपल्या मातृभूमीची त्यांनीं मोठी कामगिरी बजाविली आहे हें कोणासही नाकबूल करतां यावयाचें नाहीं. आपला धर्माचा आणि शांततेचा संदेश पाश्चात्यांस पोहोंचविण्याकरितां समुद्रोल्लंघन करण्याचें धाडस करणारे हेच पहिले संन्याशी होत.

पाश्चात्य देशांतील त्यांचें कार्य कितपत फलद्रूप झालें हें त्यांजकडून समजावून घेण्याच्या हेतूनें आमच्या बातमीदारानें त्यांची गांठ घेतली. स्वामींनीं आमच्या बातमीदाराचें प्रेमानें स्वागत करून त्यास आपल्याजवळ बसविलें. त्या वेळीं स्वामींनीं भगवा पोषाख धारण केला होता. त्यांच्या चेहऱ्यावर शांतीचें तेज झळकत होतें.

आमच्या बातमीदारानें त्यांस विचारिलें, " आपल्या पूर्वचरित्राबद्दल कांहीं माहिती आपण द्याल काय ?

" कलकत्ता येथें मी विद्यार्थिदशेंत असतांही माझ्या मनाचा कल धर्माकडे होता. त्या वेळींसुद्धां चिकित्साबुद्धि माझ्या ठिकाणीं जागृत होती. नुसत्या शब्दावडंबरानें त्या वेळींही माझें समाधान होत नव्हतें. अखेरीस श्रीरामकृष्ण परमहंसांशीं माझी भेट होऊन बराच काळ मी त्यांच्या संगतींत घालविला, आणि धर्माचा अभ्यास केला. वडिलांच्या मृत्यूनंतर हिंदुस्थानांत जागोजाग मी प्रवास केला व नंतर कलकत्ता येथें एक लहानसा मठ स्थापिला. या प्रवासांत मी एकदां मद्रासला आलों. या ठिकाणीं म्हैसूरचे महाराज व रामनदचे राजेसाहेब यांनीं मला मदत केली."

" हिंदुधर्मविषयक ज्ञान पाश्चात्यांस सांगण्याची कल्पना आपल्या मनांत कशी आली ? "

"मला नानाप्रकारचे अनुभव घ्यावयाचे होते. आमच्या राष्ट्राची सध्या जी अवनति झाली आहे तिचें कारण आमचा एकलकोंडेपणा होय असें मला वाटतें. बाह्यदेशीं काय चाललें आहे व आपणास काय कर्तव्य अवश्य आहे याची वास्तपुस्त आम्हीं कधींच केली नाहीं. अशा प्रकारें केवळ कूपमंडुकासारखे राहिल्यामुळें आम्ही आमच्या सांप्रतच्या स्थितीस येऊन पोहोंचलों आहों."

" पश्चिमेकडे आपण बराच प्रवास केला असावा असें वाटतें. "

" जर्मनी, फ्रान्स इत्यादि युरोपांतील अनेक देशांत मी फिरलों, पण माझें कार्य मुख्यतः इंग्लंड आणि अमेरिका या दोन देशांपुरतेंच होतें. येथून जे कित्येक लोक तिकडे गेले आहेत त्यांच्या शत्रुत्वामुळें प्रथम माझी परिस्थिति फार नाजुक झाली होती. जगांतील इतर राष्ट्रांच्या तुलनेनें आमचा हिंदुस्थान देश सर्वांत अधिक नीतिमान् असून या बाबतींत इतर राष्ट्रांशीं त्याची नुसती तुलना करणेंही पाप आहे असा माझा समज आहे. आरंभीं तेथें कित्येकांनीं माझें शत्रुत्व केलें; मी एक निव्वळ ढोंगी मनुष्य आहें, अशा कंड्या त्यांनीं पिकविल्या; माझ्या कित्येक बायका असून मला पोरांची एक सबंध पलटण आहे असेंही म्हणण्यास त्यांनीं कमी केलें नाहीं. धर्माच्या नांवाखालीं हे मिशनरी लोक कोणतींही अनन्वित कृत्यें करण्यास मागेंपुढें पहाणार नाहींत असा अनुभव मला आला. या मिशनऱ्यांस इंग्लंडांत मुळींच मान नाहीं. तेथें माझ्याशीं भांडण्यासाठीं कोणी आला नाहीं. मिस्टर लंड हे केवळ माझी नालस्ती करण्याच्या हेतूनें माझ्या पाठीमागें अमेरिकेस गेले होते; पण त्यांजकडे कोणी लक्ष्य दिलें नाहीं. त्या वेळीं अमेरिकेंत पुष्कळ लोक मला चाहात होते. मी इंग्लंडांत गेल्यानंतर हा भला गृहस्थ तेथेंही माझी पाठ पुरवील असें मला वाटत होतें. पण 'ट्रुथ्' पत्रानें त्याच्या तोंडास खीळ घातली. हिंदुस्थानांत जातिभेद तीव्र आहे असें आपण ह्मणतों, पण इंग्लंडांत सामाजिक दर्जाचा भेद त्याहूनही तीव्र आहे. इंग्लंडांतील धर्माधिकारी हे जन्मादारभ्यच कुलवान् असतात; पण, पुष्कळसे मिशनरी मात्र तसे नसतात. या धर्माधिकाऱ्यांनीं मजबद्दल चांगली सहानुकंपा दाखविली. धार्मिक वादविवादासंबंधीं 'इंग्लिश चर्च' पैकीं तीस धर्माधिकाऱ्यांचें व माझें सर्व बाबींसंबंधीं पूर्ण एकमत झालें. इंग्लंडांतील कित्येक धर्माधिकाऱ्यांशीं माझा मतभेद झाला तरी माझ्या पाठीमागें त्यांनीं माझी नालस्ती कधींही केली नाहीं हें पाहून मला फार आश्चर्य वाटलें आणि संतोषही झाला. सुसंस्कृतीचें बीज आनुवंशिक संस्कारानें प्राप्त होण्याचा हा फायदा आहे; आणि जातिभेदांतील चांगला भागही हाच."

" पश्चिम दिशेकडील आपल्या कार्याला कितपत यश आलें?"

" इंग्लंडापेक्षांही अमेरिकेंत मला पुष्कळ अधिक लोकांचें आनुकूल्य मिळालें. हलक्या दर्जाच्या पाद्री लोकांनीं केलेल्या माझ्या नालस्तीमुळें तर माझ्या कार्याला अधिकच यश आलें. माझ्याजवळ फारसा पैसा नव्हता. हिंदुस्थानांतील माझ्या मित्रांनीं जेमतेम वाटखर्चीपुरता पैसा मला दिला होता. हा पैसा लवकरच संपून गेला. यामुळें येथल्याप्रमाणेंच तेथेंही लोकांच्या औदार्यावरच मला अवलंबून रहावें लागलें. अमेरिकन लोक परक्याचें आदरातिथ्य फार चांगल्या प्रकारें करतात. अमेरिकन वस्तीपैकीं सुमारें तृतियांश वस्ती ख्रिस्ती आहे. बाकीच्या लोकांना बहुधा कोणताच धर्म नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. याचा अर्थ असा कीं ते आपणास कोणत्याही विशिष्ट पंथाचे ह्मणवीत नाहींत; तथापि या लोकांत मला खरे धार्मिक लोक पुष्कळ आढळले. इंग्लंडांत माझ्या कार्याचा पाया चांगलाच बसला आहे असें मला वाटतें. कदाचित् मी उद्यांच मेलों आणि यापुढें आणखी कांहीं संन्यासी मला पाठवितां आले नाहींत तरी इंग्लंडांत माझें कार्य सुरूच राहील. आपल्या चित्तांतील भावनांचा उद्रेक होऊं न देण्याचें शिक्षण इंग्रजांस लहानपणापासूनच मिळालेलें असतें. इंग्रजलोक स्वभावतःच जड डोक्याचे आहेत. अमेरिकन किंवा फ्रेंचलोकांप्रमाणें ते तरतरीत नाहींत. तथापि ते अत्यंत व्यवहारी आहेत. अमेरिकन राष्ट्र अद्यापि तारुण्याच्या भरांत असल्यामुळें त्यागाचा खरा अर्थ समजण्याची पात्रता त्याला नाहीं. उलट पक्षीं संपत्ति आणि चैन यांचा उपभोग आंग्लराष्ट्रानें कित्येक शतकें घेतला आहे. यामुळें तेथें त्यागाची तयारी अधिक प्रमाणावर आढळून येते. इंग्लंडांत माझें पहिलें व्याख्यान झालें तेव्हां वीस किंवा तीस लोक हजर होते. मध्यंतरीं मी अमेरिकेस गेलों तेव्हां माझें कार्य माझ्या पाठीमागें इंग्लंडांत चालू होतें. अमेरिकेंतून मी पुन्हां इंग्लंडांत आलों तेव्हां माझा श्रोतृगण हजारांपर्यंत वाढला होता. अमेरिकेंत तीन वर्षें मी घालविल्यामुळें तेथें मला याहून अधिक श्रोते मिळत असत. इंग्लंडांत फक्त एकच वर्ष मी होतों. इंग्लंडांत एक आणि अमेरिकेंत एक असे दोन संन्यासी तेथें काम करीत आहेत. अशाच रीतीनें इतर देशांतही संन्यासी पाठविण्याचा माझा विचार आहे. "

" इंग्रज लोक अत्यंत कर्मपरायण आहेत. कोणतीही नवी कल्पना त्यांच्या चित्तांत एक वेळ रूढ झाली कीं तिचा समूळ लोप कधींही होत

नाहीं. आपल्या लोकांनीं सध्यां वेद टाकून दिले आहेत आणि आपलें सारें तत्त्वज्ञान स्वयंपाकघरांत घुसून बसलें आहे. हिंदुलोकांचा सध्यांचा धर्म ह्मटला ह्मणजे 'शिवूं नका ' हाच होय. हा धर्म इंग्रजलोकांस कधींही मान्य होणार नाहीं. आमच्या पूर्वजांचे विचार आणि त्यांनीं सांगितलेलीं जीवनदायी तत्त्वें हीं प्रत्येक राष्ट्रास अभिमत होतील. ' तुम्हीं आपला वेदान्त बायबलांतही घुसवीत आहां ' असें इंग्लंडांतले कित्येक मोठमोठे धर्माधिकारीही मला ह्मणाले. सांप्रत हिंदुधर्माची फारच हीनावस्था झाली आहे. इंग्लंडांत जे कोणतेही तात्त्विक ग्रंथ सांप्रत लिहिले जात आहेत. त्यांत आमच्या वेदान्ताचा कांहीं तरी अंश अवश्य आढळून येतोच. हर्बर्ट स्पेन्सरच्या ग्रंथांतही हा अंश दिसतो. अद्वैत हें चालू काळाचें मोठें दर्शन होऊन बसलें आहे. अद्वैताची चर्चा सर्व जगभर चालू आहे; पण कांहीं नवीन तत्त्व शोधून काढावें अशा प्रकारची खटपट फक्त युरोपांत मात्र चालू आहे. हिंदूंसंबंधीं बोलतांना ते नेहमीं तुच्छतादर्शक भाषा वापरतात; पण त्याच वेळीं हिंदूंच्या तत्त्वज्ञानाचीं रहस्यें मात्र आपल्या हृदयांत सांठवीत असतात. प्रोफेसर मॅक्समुल्लर हे तर पक्के वेदान्ती बनले असून वेदान्तासंबंधीं त्यांनीं उत्कृष्ट कामगिरी बजाविली आहे. पुनर्जन्माची उपपत्ति त्यांस मान्य झाली आहे. "

" हिंदुस्थानाच्या पुनर्जीवनासाठीं काय करण्याचा आपला बेत आहे ? "

" सामान्य जनतेची उपेक्षा हेंच महत्तम राष्ट्रीय पातक आमच्या हातून घडलें असून आमच्या अवनतीच्या कारणांपैकीं हें एक कारण आहे, असा माझा समज आहे. हिंदुस्थानांतील सामान्य जनता पुन्हां एकवार चांगली सुशिक्षित होईपर्यंत आणि पोटभर खावयास मिळेपर्यंत तुह्मीं किती. ही राजकीय खटपटी केल्या, तरी त्या साऱ्या फुकट जातील असें मला वाटतें. वरिष्ठ वर्गीयांच्या शिक्षणाचा खर्च हीच सामान्य जनता देते. तुमचा धर्म जिवंत राखण्याचें कार्यही हीच सामान्य जनता करते आणि या उपकाराच्या बदल्यांत तुह्मां सुशिक्षितांकडून तिला लाथा मात्र मिळतात. आमचा खालचा वर्ग सांप्रत केवळ गुलामांच्या स्थितीस येऊन पोहोंचला आहे. हिंदुस्थान देश वर यावा असें आपणास वाटत असेल तर या खालच्या वर्गासाठीं आपण प्रथम खटपट केली पाहिजे. मद्रास येथें एक

आणि कलकत्ता येथें एक असे दोन मध्यवर्ती अथवा प्रमुख मठ माझ्या मनांत स्थापावयाचे आहेत. या ठिकाणीं तरुण प्रचारक तयार करण्याचा माझा विचार आहे. कलकत्त्यांतील मठ सुरू करण्यास लागणारा पैसा मला मिळाला आहे. माझ्या कार्यांकरितां लागणारा पैसा इंग्रज-लोक मला पुरवितील. सांप्रतच्या तरुण पिढीवरच माझा अधिक विश्वास आहे. याच पिढींत कर्तृत्वशाली तरुण मला मिळतील अशी माझी श्रद्धा आहे. सिंहासारख्या निधड्या छातीनें हीं माणसें आपलें कार्य निर्धास्तपणें पार पडतील. या कार्याचा सर्व नकाशा मी तयार करून ठेविला असून राहिलेलें आयुष्य याच कार्याला मी वाहिलें आहे. माझ्या हातून हें कार्य तडीस न गेलें तर माझ्याहून अधिक चांगला असा दुसरा कोणी-तरी पुढें येईल आणि तें पार पाडील. तोंपर्यंत धडपड करीत राहण्यांतच मला संतोष वाटेल. खालच्या वर्गांचे गेलेले हक्क त्यांस पुन्हां परत मिळवून देण्याचें मोठें कार्य तुम्हांस करावयाचें आहे. साऱ्या जगांत अत्यंत मोठा असा धर्म फक्त तुमचाच आहे. अशा स्थितींतही भलभलत्या गोष्टी तुह्मीं आप-ल्या खालच्या वर्गाच्या तोंडांत कोंबतां. जिवंत झरा तुमच्यापाशीं असतांना डबक्यांतलें पाणी तुम्हीं त्यांस पाजीत आहां. तुमचा मद्रासी ग्रॅज्युएट एखाद्या पंचम जातीच्या मनुष्याला स्पर्शही करणार नाहीं; पण आपल्या शिक्षणा-साठीं लागणारा पैसा मात्र त्याच्याकडून उकळण्यास तो कमी करीत नाहीं. ऐहिक आणि पारमार्थिक शिक्षण देण्याकरितां प्रचारक तयार करावे, या हेतूनें या दोन संस्था प्रथम चालू करण्याचा माझा विचार आहे. या मठांच्या शाखा हळूहळू जागोजाग निघतील, आणि अशा रीतीनें सारा देश आम्हीं पादाक्रांत करूं. या कार्यासाठीं आत्मश्रद्धा प्रथम पाहिजे. परमेश्वराच्या ठिकाणींही तुमचा विश्वास नसला तरी एक वेळ चालेल, पण आत्मविश्वास प्रथम पाहिजे; परंतु दिवसेंदिवस आमची आत्मश्रद्धा उतरत्या प्रमाणावर जात आहे, हीच काय ती मोठी अडचण आहे. हल्लींच्या सुधारकांविरुद्ध माझा आक्षेप ह्मटला ह्मणजे हाच. पुराणमतवादी लोकांत आत्मश्रद्धा अधिक प्रमाणावर आहे. त्यांची बुद्धि तरल नसली तरी अधिक खंबीर आहे यांत संशय नाहीं. उलटपक्षीं सुधारक लोक युरोपियांच्या ओंजळीनें पाणी पिऊन त्यांची हांजी हांजी करण्यांत गुंतलेले असतात. आमच्याकडील

खालच्या वर्गाचे लोक आणि युरोपांतील खालच्या वर्गाचे लोक यांची परस्पर तुलना केली तर आमचे लोक खरोखर मला देवासारखे दिसतात. जेथें दारिद्य हा गुन्हा समजला जात नाहीं, असा देश पृथ्वीच्या पाठीवर फक्त आमचाच. आमच्या इकडील खालचा वर्ग तनमनानें नि:संशय अधिक श्रीमंत आहे; पण त्यांचा द्वेष आह्मीं नित्य करीत गेल्यामुळें त्यांची आत्मश्रद्धा नाहींशी झाली आहे. जन्मादारभ्य आपण गुलामच आहों असें त्यांस वाटतें. त्यांना त्यांचे गेलेले हक्क द्या, आणि ते हक्क त्यांस बजाऊं द्या. अमेरिकन संस्कृतीचे उज्वल रूप हेंच आहे. एखादा आयरिश मनुष्य अमेरिकेंत प्रथम आला ह्मणजे तो सत्रा ठिकाणीं वांकलेला, भुकेनें अर्धमेला झालेला आणि हातांतील काठी टेंकीत टेंकीत चालणारा असा आढळतो. पण अमेरिकेंत येऊन थोडेसे महिने झाले नाहींत तोंच त्याचा नूर एकदम कसा पालटतो पहा. तो नि:शंकपणें छाती काढून चालूं लागतो. त्याच्या सर्व वर्तणुकींत धीटपणा आढळून येतो. असा फरक कशानें झाला? ज्या देशांतून तो आला त्या देशांत त्याची स्थिति गुलामासारखी होती; पण अमेरिकेंत आल्यानंतर बंधुभाव आणि बरोबरीचें नातें यांनीं त्याची सारी चर्या पालटून टाकली.

" जीवात्मा अमर, सर्वशक्तिमान् आणि अनंतरूप आहे असा पक्का विश्वास बाळगा. शिक्षणपद्धतीसंबंधीं माझी कल्पना ह्मटली ह्मणजे गुरुगृहवास ही होय. शिष्य सदोदित गुरूच्या सान्निध्यांत राहिला पाहिजे. गुरूच्या प्रत्यक्ष सहवासानें मिळणाऱ्या जिवंत शिक्षणावांचून शिष्याला खरें शिक्षण कधींही प्राप्त होणार नाहीं. तुमच्या विश्वविद्यालयांची काय स्थिति आहे पहा. आज पन्नास वर्षें तीं अस्तित्वांत असून त्यांनीं काय केलें? स्वबुद्धिपराक्रमानें उदयास आलेला असा एकही मनुष्य त्यांनीं निर्माण केला नाहीं. तुमचीं विश्वविद्यालयें ह्मणजे केवळ परीक्षक यंत्रें होऊन बसलीं आहेत. जनतेच्या सुखासाठीं आत्मत्याग करावा ही कल्पना आमच्या राष्ट्रांत अद्यापिही उद्भूत झालेली नाहीं. "

" मिसेस बेझंट आणि थिऑसफी यांजबद्दल आपलें काय मत आहे? "

" मिसेस बेझंट ही फार चांगली बाई आहे. लंडन येथील तिच्या थिऑसफीच्या आश्रमांत मी एक व्याख्यान दिलें. खुद्द तिच्याबद्दल मला

स्वत:ला अशी कांहीं माहिती नाहीं. आमच्या धर्मांबद्दलचें तिचें ज्ञान फारच तुटपुंजें आहे. कांहीं येथून कांहीं तेथून असे तुकडेताकडे तिनें जमा केलेले आहेत. धर्मांचा सांगोपांग अभ्यास करण्यास तिला कधीं फुरसतच मिळाली नाहीं. ती मनापासून काम करणारी स्त्री आहे, हें तिच्या शत्रूलाही कबूल करावें लागेल. तिचें वक्तृत्व पहिल्या प्रतीचें आहे अशी तिची ख्याति इंग्लंडांत आहे. ती संन्यासिनी आहे, पण महात्मे आणि कतुहूमी यांजबद्दल माझा मुळींच विश्वास नाहीं. थिऑसॉफिकल् सोसायटीशीं असलेला आपला संबंध सोडून आपणास जें बरोबर वाटतें त्याचा प्रसार स्वत:च्याच हिमतीवर तिनें केल्यास बरें. ”

सामाजिक सुधारणेबद्दल आमचें कांहीं संभाषण झालें. त्या वेळीं विधवाविवाहाबद्दल स्वामी ह्मणाले, “ कोणत्याही देशांत किती विधवांना नवरे मिळतात याचा हिशोब पाहून त्यावरून संस्कृतीचें माप ठरविणारा देश अद्यापि माझ्या पाहण्यांत आला नाहीं. ”

स्वामींना भेटण्यासाठीं तळमजल्यावर बरेच लोक जमले आहेत असें पाहून आमच्या बातमीदारानें स्वामींचे आभार मानून त्यांची रजा घेतली.

स्वामी विवेकानंद यांजबरोबर मिस्टर सेव्हियर व त्यांची पत्नी, टी. जी. हारिसन् या नांवाचे कोलंबो येथील बौद्धधर्मी गृहस्थ व मिस्टर जे. जे. गुडविन् अशी मंडळी आहे. मि० सेव्हियर व त्यांची पत्नी हीं उभयतां हिमालयांत कायमचा वास करण्याकरितां आलीं आहेत असें समजतें. स्वामींच्या ज्या पाश्चात्य शिष्यांची इच्छा हिंदुस्थानांत राहण्याची असेल, त्यांजकरितां हिमालयांत एक आश्रम बांधण्याचा त्यांचा मनोदय आहे. गेलीं वीस वर्षें सेव्हियर व त्यांची पत्नी हीं कोणताही विशिष्ट धर्म पाळीत नव्हतीं. प्रचलित धर्मांपैकीं कोणत्याही धर्मावर त्यांचा विश्वास नव्हता. पण स्वामींचीं कित्येक व्याख्यानें ऐकल्यानंतर आपल्या बुद्धीस व भावनांस पटणारा धर्म आपणास मिळाला असें तीं सध्यां म्हणत आहेत. स्विट्झर्लंड्, जर्मनी आणि इटाली या देशांत स्वामींबरोबर त्यांनीं प्रवास केला असून त्यांजबरोबरच तीं येथें आलीं आहेत. मि. गुड्विन् हे इंग्लंडांत वर्तमानपत्रकाराचा धंदा करीत होते. न्यूयॉर्क येथें त्यांची स्वामींशीं प्रथम भेट होऊन ते स्वामींचे शिष्य झाले. सांप्रत पत्रकाराच्या धंद्याला त्यांनीं

रजा दिली असून ते स्वामींच्या सान्निध्यांत राहतात व त्यांचीं व्याख्यानें लघुलिपींत टिपून घेतात. स्वामी समाधिस्थ होईपर्यंत त्यांजबरोबर रहाण्याचा त्यांचा संकल्प आहे. या दृष्टीनें ते त्यांचे पट्टशिष्य आहेत असें ह्मणण्यास हरकत नाहीं.

---

## नंबर ८.

## राष्ट्रीयपायावर हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन.

प्रबुद्ध भारत, सप्टेंबर १८९८.

" स्वामीजी, आपल्या कार्याची विशिष्ट दिशा कोणती ?

" अट्टाहास; अट्टाहासानें आपला धर्म लोकांस शिकवावयाचा हा माझ्या कार्याचा विशेष होय. हा अट्टाहास फक्त धर्माच्या बाबीपुरताच असावयाचा. हिंदुस्थानांत पुष्कळ पंथ आजपर्यंत आपापला धर्मप्रसार करीत आले आहेत; पण आपल्या मतांचा प्रसार साऱ्या जगभर करून हिंदुस्थानाची सीमा ओलांडण्याचा यत्न बुद्धानंतर आह्मींच प्रथम केला. "

" हिंदुस्थानासंबंधीं आपल्या कार्याची दिशा काय आहे ? "

" सर्व पंथांस आणि मतांस सामान्यत्वेंकरून कबूल असलेला पाया शोधून काढून त्याकडे सर्व राष्ट्राचें लक्ष्य वेधून घ्यावयाचें व त्या दृष्टीनें हिंदुधर्माचें पुनरुज्जीवन येथें करावयाचें हें माझें कार्य आहे. हिंदुस्थानांत सांप्रत मुख्य असे तीन पंथ आहेतः—१ पुराणमतवादी. २ मुसलमानी रियासतीच्या काळांतील सुधारणावादी. ३ सांप्रतचा सुधारणावादी. उत्तरेपासून दक्षिणेपर्यंत ज्या एका गोष्टीबद्दल सर्व हिंदूंचें एकमत आहे, ती गोष्ट म्हणजे गोमांस न खाणें ही होय.

" वेदांबद्दल सर्वांची सारखीच पूज्यबुद्धि नाहीं काय ? "

" छे, मुळींच नाहीं. हीच पूज्यबुद्धि आह्मांस पुन्हा जागृत करावयाची आहे. बुद्धानें केलेलें कार्य अद्यापीही आमच्या देशाच्या गळीं पक्कं उतरलें नाहीं. बुद्धाच्या उक्तीनें आमच्या देशाला गुंगी आली; त्याला नवें जीवन प्राप्त झालें नाहीं. "

Sow. T. R. Maluti Bai.



" सांप्रतच्या काळीं बौद्धधर्माचें महत्व आहे असें आपणांस कां वाटतें?"

" याचें उत्तर अगदीं उघड आणि रोखठोक आहे. कोणत्याही मतांत कांहीं विशेष आढळला तर भरतभूमि त्याचें अवश्य ग्रहण करते असा अनुभव आपणास अनेकवार आला आहे. फक्त त्या मताचें सार काढण्यास तिला वेळ लागतो ही गोष्ट मात्र खरी. बुद्धानें पशुहननाचा पूर्ण उच्छेद करून टाकला. या वेळीं 'गाई मारूं नका' असा उपदेश बुद्धानें केला. त्या काळापासून आम्हीं गोहत्या साफ बंद करून टाकली."

"आपण सांगितलेल्या तीन मतांपैकीं स्वतः आपण कोणत्या मताचे अहांत?"

"सर्वांशीं माझी सहानुकंपा आहे. आम्हीं पुराणमतवादी हिंदू आहों. तथापि 'शिवूं नका' या पंथाशीं मात्र आमचा कोणताही संबंध नाहीं, असें मी ठांसून सांगतों. हा पंथ हा खरा हिंदुधर्म नव्हे. त्याला आमच्या कोणत्याही ग्रंथाचा आधार नाहीं. आमच्या खऱ्या धर्मवृक्षावर वाढलेलें हें एक बांडगूळ आहे. हें बांडगूळ आमच्या राष्ट्राच्या सर्वांगसुंदर संस्कृतीच्या वाढीच्या आड येत आहे."

"तर मग राष्ट्रीय दृष्ट्या सर्वांगसुंदर अशी घटना हिंदुस्थानांत व्हावी अशी आपली इच्छा आहे असें वाटतें."

"अगदीं बरोबर; अशीच माझी इच्छा आहे. हिंदुस्थानाची अशी पिछेहाट व्हावी याला वास्तविक कांहीं कारण आहे काय? बुद्धींत इतर राष्ट्रांहून तें कमी प्रतीचें आहे काय? त्याचें हस्तकौशल्य तरी कमी प्रतीचें आहे काय? हिंदुस्थानांतील हस्तकौशल्य, तेथलें गणितादि शास्त्रांतील विज्ञान आणि तत्त्वज्ञान हीं पाहून वरील प्रश्नास 'होय' असें उत्तर आपण कधींतरी द्याल काय? कित्येक शतकें आमचा देश झोंपीं गेलेला आहे. त्याला जागें करावयाचें हेंच आपलें काम आहे. तो जागा झाला म्हणजे राष्ट्रांच्या मालिकेंत आपलें योग्य पद आपण होऊनच घेईल"

"पण हिंदुस्थानाचें राष्ट्रीय जीवित मुख्यतः अंतर्वर्तीस्वरूपाचें आहे. आमच्या देशाला कर्मप्रवणता आणून दिली तर चिंतन आणि तत्त्वज्ञान हा जो त्याचा मोठा निधि तो नष्ट होईल असें आपणास वाटत नाहीं काय?"

" मुळींच नाहीं. पूर्वेतिहासांत ज्या कांहीं गोष्टी घडून आल्या त्यांमुळें हिंदुस्थान देश अधिक चिंतनपर झाला असून पश्चिमेकडील देश अधिक कर्मप्रवण झाले. अशा रीतीनें आजपर्यंत जगाचे हे दोन्ही भाग परस्पर-विरुद्ध मार्गानें गेले आहेत. पण, आतां हे दोन्ही मार्ग एकजीव व्हावे अशी वेळ आली आहे. श्रीरामकृष्णपरमहंस हे पूर्ण चिंतनमग्न असत; तथापि बाह्य दृष्टीनें पाहतांही त्यांच्याइतकी कर्मप्रवणता दुसऱ्या कोठेंही आढळून यावयाची नाहीं. मानवी जीविताचें हेंच रहस्य आहे. तुमचें जीवित समुद्रासारखें खोल आणि आकाशासारखें विस्तृतही असलें पाहिजे."

" बाह्य परिस्थिति अत्यंत प्रतिकूल आणि सर्व प्रकारें वाढ खुंटविणारी असली म्हणजे त्या ठिकाणीं मनुष्याचें विचारमय जीवन फारच उत्तम रीतीनें वाढीस लागतें, हा खरोखरच मोठा चमत्कार आहे. तथापि विचारांची उत्तम वाढ होण्यास लौकिक जीवित कष्टमय असलेंच पाहिजे असें नाहीं. अशा प्रकारच्या जीविताच्या फार वर्षांच्या सहवासानें आम्हांस तें आवश्यक वाटूं लागलें आहे. आपलें बाह्य जीवितही सुखमय करून त्याबरोबरच अध्यात्मविद्येची वाढ करणें आपणास अधिक श्रेयस्कर आहे. अशा रीतीनें जगाला आह्मी धडा घालून दिला तर हें जग खरोखर सुधारेल. बाह्यजग आणि आपण वस्तुतः एकच नाहीं काय ? "

" स्वामी महाराज, आतां आपण जें कांहीं बोललां, त्यावरून मला आणखी एका प्रश्नाची आठवण झाली. हिंदुधर्माचें जें पुनरुज्जीवन सांप्रत होत आहे त्यांत श्रीरामकृष्णांची कर्तबगारी कोणत्या दिशेनें झाली आहे ?"

"या प्रश्नाचें निश्चित्त उत्तर देणें माझ्या शक्तीबाहेरचें आहे. तुह्मी अमक्या-तमक्या मनुष्याच्या मताप्रमाणें चाला असा उपदेश मी कधींही कोणास केला नाहीं. या महात्म्यानें जो उत्साह माझ्या अंगीं भरून दिला, तदनुरूप माझ्या जीविताची दिशा मी आंखली आहे. श्रीरामकृष्णांबद्दल इतरांस काय वाटतें हें ज्याचें त्यानें ठरवावें. अध्यात्मज्ञानाचा प्रसार जगांत होण्याचा मार्ग एकच असतो असें नाहीं. एखादा मार्ग फार मोठा असला तरी सर्व प्रसार केवळ त्या एकाच मार्गानें झाले पाहिजेत, असा निर्बंध नाहीं. प्रत्येक पिढीला निरनिराळा मार्गदर्शक असावा. आपण सारेच परमेश्वरस्वरूप

आहोंत. यामुळें स्वतंत्रपणें आपला मार्ग शोधून काढण्याची पात्रता आपणा सर्वांच्या आंगीं आहे."

"स्वामी महाराज, मी आपला मोठा आभारी आहें. आतां मला एकच प्रश्न आपणास विचारावयाचा आहे. हिंदुस्थानासंबंधीं आपल्या कार्याची दिशा काय आहे याचा विचार आपण केला. आतां त्याचा प्रसार साऱ्या जगभर करावयास आपण कोणता मार्ग स्वीकारणार हें सांगाल काय?"

"आमच्या मार्गाचें वर्णन अगदीं थोडक्यांत करतां येईल. राष्ट्रीय जीवितहेतूचें पुनरुज्जीवन करणें हा आमचा मार्ग होय. त्यागाचा धडा बुद्धानें शिकविला; आणि हा धडा गिरवून सहाशें वर्षांच्या अवधींत हिंदुस्थान देश जगांत अग्रगण्य होऊन बसला. त्याग आणि परसेवा हीं भरतभूमीचीं राष्ट्रीय ध्येयें आहेत. या ध्येयांची स्पष्ट ओळख साऱ्या जनतेस करून दिली म्हणजे बाकीच्या गोष्टी आपोआप घडून येतील. अध्यात्मज्ञानाबद्दल येथें कोणास नव्यानें उपदेश करावयास पाहिजे असें नाहीं. अध्यात्मज्ञानाच्या योग्यतेची ओळख येथें सर्वांस पूर्वींच पटून गेली आहे. मुक्तीचाही मार्ग तोच आहे."

---

नंबर ९.

## हिंदु स्त्रियांची पूर्वीची, सध्यांची आणि भावी स्थिति.

प्रबुद्ध भारत, डिसेंबर १८९८.

प्रबुद्ध भारताच्या संपादकांच्या सांगण्यावरून स्वामी विवेकानंद यांची गांठ घेण्याकरितां कित्येक दिवस मी खटपट करीत होतों. हिंदु स्त्रियांच्या सांप्रतच्या आणि भावी परिस्थितीबद्दल स्वामीजींचें काय मत आहे, हें जाणण्याची मला इच्छा होती. अखेरीस एका रविवारीं हिमालय पर्वताच्या एका सुंदर खोऱ्यांत स्वामीजी मला भेटले.

माझें काम मी त्यांस सांगितल्यावर ते मला फिरावयास बरोबर घेऊन गेले. हिमालयाच्या ज्या भागांतून आम्हीं चाललों होतों तेथील सृष्टीचे देखावे अत्यंत रमणीय होते.

वृक्षराजींतून सूर्य मधूनमधून डोकावत असल्यामुळें वृक्षांच्या दाट छायेंत त्याचे कौडसे इकडेतिकडे दिसत होते. आजूबाजूस कांहीं खेडीं पसरलीं होतीं. खेड्यांतून मुलें इकडेतिकडे बागडतांना दिसत होतीं. आमच्या वाटेंत कांहीं शेतें लागलीं. त्यांत उगवलेल्या धान्याचीं ताटें सुवर्णयष्टींप्रमाणें चमकत होतीं. मधूनमधून गगनचुंबित वृक्ष दिसत होते आणि दुसऱ्या बाजूस शेतकऱ्यांच्या मुली धान्य कापीत असतांना आढळत होत्या. कित्येक ठिकाणीं फळांनीं ओथंबलेलीं झाडें आपला पक्व फलभार हलका करतांना आढळत होतीं. अशा रीतीनें कांहीं वेळ चालल्या-नंतर आह्मी एका मैदानांत आलों. येथून हिमनगराजाचीं बर्फाच्छादित शिखरें आकाशास भिडलेलीं दिसत होतीं.

इतक्यांत स्वामीजी बोलूं लागले, "स्त्रियांबद्दलच्या आर्यांच्या कल्पना आणि हिब्रू, आरबी, आसीरियन वगैरे लोकांच्या कल्पना आरंभापासूनच परस्पर-विरुद्ध आहेत. भक्तिमार्गांत स्त्रियांचा संसर्ग भयावह आहे अशी कल्पना आसीरियन्, आरबी वगैरे लोकांत प्रचलित आहे. धर्मविषयक कोणताही संस्कार ते स्त्रियांस करूं देत नाहींत. खाण्याकरितां एखादें पाखरूं मारण्या-चाही अधिकार स्त्रियांस त्यांनीं ठेविला नाहीं. उलटपक्षीं गृहिणीवांचून कोण-तेंही धार्मिक कार्य गृहस्थास करतां येत नाहीं असा आर्यांचा निर्बंध आहे."

स्वामींचे हे उद्गार ऐकून थोडासा चपापून मी ह्मटलें, "पण स्वामी महा-राज, हिंदुधर्म हा आर्यांचाच धर्म नव्हे काय ?"

स्वामींनीं शांतपणें उत्तर दिलें, "अर्वाचीन हिंदुधर्म हा पुष्कळ अंशीं पौराणिक धर्म आहे. बुद्धाच्या कालानंतर जुन्या धर्माचें जें कांहीं स्वरूप बनलें तेंच सांप्रत रूढ आहे. गृहमखाकरितां गृहिणीची आवश्यकता असली तरी शाळग्रामशिलेला तिनें स्पर्श केलेला खपत नाहीं ही, गोष्ट स्वामी दयानंद सरस्वतींनीं सिद्ध केली आहे. गृहदेवता ह्मणून शालिग्रामशिला पौराणिक कालांतच आमच्या घरांत स्थापन झाली."

"तर मग बौद्धधर्माच्या अमलाखालींच स्त्रियांच्या कमीपणास आम-च्यांत सुरवात झाली असें आपलें मत आहे काय ?"

" ज्या ठिकाणीं स्त्रीपुरुषांच्या हक्कांत न्यूनाधिक्य आढळून येतें, त्या ठिकाणीं तें न्यूनाधिक्य बुद्धकालानंतरच सुरू झालें यांत संशय नाहीं. तथापि स्त्रीपुरुषांच्या समान हक्काबद्दल युरोपीय लोक जी सरसहा टीका करितात, तिचा प्रवेश आपल्या येथें होऊं देतां कामा नये. या सरसास टीकेमुळें स्त्रियांच्या हक्कांबद्दल आमच्या मनांत एकदम भलत्याच कल्पनांचा प्रवेश होतो. कित्येक शतकांच्या परिस्थितीमुळें स्त्रियांना पुरुषांच्या संरक्षणाची जरूर आहे ही गोष्ट आमच्या मनांत पक्की बिंबली गेली. यामुळें आमच्यांत ज्या कांहीं चाली रूढ झाल्या आहेत, त्यांचें कारण ही परिस्थिति आहे. आम्ही स्त्रियांस हलकें मानतों हें या रूढीचें कारण नव्हे. "

" स्वामी महाराज, आमच्या समाजांत स्त्रियांचा सध्यां जो कांहीं दर्जा आहे तो अगदीं योग्य आहे असें आपणास वाटतें काय ? "

" मुळींच नाहीं; पण या बाबतींत त्यांना शिक्षण देण्यापलीकडे अधिक कोणतीही ढवळाढवळ करण्याचा अधिकार आपणास नाहीं. स्त्रियांच्या ज्या कांहीं अडचणी असतील त्या त्यांनीं आपण होऊनच दूर केल्या पाहिजेत. असें करण्याची पात्रता त्यांच्या आंगीं आणून देणें, इतकेंच आपलें कर्तव्य आहे. यापलीकडे कोणी कांहीं करूं शकणार नाहीं आणि तसें करणें इष्टही नाहीं. जगांतील इतर स्त्रिया जर आपल्या अडचणी आपणच दूर करीत आहेत, तर हिंदु स्त्रियांच्या आंगींही तेवढी कर्तबगारी अवश्य असलीच पाहिजे. "

" बौद्धकालानंतर ज्या अनिष्ट रूढी प्रचारांत आल्या त्या कां ? "

" पूर्वीच्या धर्माची अवनतावस्था हेंच या अनिष्ट रूढींचें कारण होय. कोणतीही चळवळ यशस्वी होण्यास तिच्यांत एखादा भाग लोकोत्तर स्वरूपाचा असावा लागतो. यामुळेंच तिचा विजय होत असतो. पण ही चळवळ पुढें अवनतदशेस येऊं लागली म्हणजे तींतील लोकोत्तरपणाबद्दलचा अभिमान हाच तिला पुढें मारक होऊं लागतो. भगवान् बुद्ध हे लोकोत्तर पुरुष होते. संघटनेचें सामर्थ्य त्यांच्या ठिकाणीं होतें. या संघटनेनेंच आपल्या धर्माचा प्रसार त्यांनीं साऱ्या जगभर केला; पण त्यांचा धर्म शुद्ध त्यागाचा होता, यामुळें त्यागी पुरुषाच्या नुसत्या वस्त्रांनाही जगांत मान मिळूं लागला. मंदिरें बांधून उपासना करण्याची पद्धत त्यांनींच प्रथम सुरू केली.

सार्वजनिक धार्मिक उत्सव त्यांनींच प्रथम सुरू केले. या उत्सवांत मुख्य भाग अर्थातच पुरुषांकडे असे. यामुळें स्त्रियांस आपोआपच कमीपणा येऊं लागला. पुरुषांच्या साहाय्यावांचून स्त्रियांस कोणताही धार्मिक विधि करतां येऊं नये अशी स्थिति आपोआपच प्राप्त होऊं लागली. यामुळें धर्माचा पाया अधिक बळकट झाला ही गोष्ट खरी, तथापि त्याचे अधिक दूरवरचे परिणाम मात्र अनिष्ट झाले, हें विसरतां कामा नये. ”

“ पण वेदांनींही संन्यास अथवा त्याग मान्य केला नाहीं काय ? ”

“ होय; वेदांनींही संन्यास अवश्य मान्य केला आहे; पण या बाबींत त्यांनीं स्त्री आणि पुरुष असा भेद मात्र केलेला नाहीं. राजा जनकाच्या सभेंत याज्ञवल्क्याचीं प्रश्नोत्तरें कोणापाशीं झालीं, हें तुम्हांस ठाऊक असेलच. त्याला प्रश्न करणारी एक स्त्री होती. तिचें नांव वाचक्नवी. ती ब्रह्मवादिनी होती. ती स्त्री होती याबद्दल त्या सभेंत कोणीही आक्षेप घेतलेला नाहीं. गुरुगृहीं स्त्री आणि पुरुष विद्यार्थी समभावानें नांदविले जात होते हें तुह्मांस ठाऊक असेलच. पूर्वकाळीं स्त्रीपुरुषांस समान हक्क होते याबद्दल पुरावा तो कोणता पाहिजे ? तुह्मीं कालिदासाचें शाकुंतल वाचलें असेलच. आतां टेनिसनच्या ‘ प्रिन्सेस ’ काव्यांत आह्मांस अधिक शिकण्यासारखें तें काय आहे ?”

“ स्वामी महाराज, प्राचीन काळच्या उज्ज्वलतेचें स्वरूप स्पष्ट करून दाखविण्याची आपली हातोटी खरोखरच मोठी विस्मयकारक आहे. ”

“याचें कारण, मी जगाच्या दोन्ही बाजू पाहिल्या आहेत हेंच असूं शकेल. ज्या मानववंशानें सीतेसारखें स्त्रीरत्न उत्पन्न केलें, त्या मानववंशाच्या मनांत स्त्रीबद्दल अत्यंत आदर असला पाहिजे हें उघड आहे. सीता प्रत्यक्ष अस्तित्वांत नव्हती असेंही कदाचित् कोणी ह्मणेल; पण सीतेची मनोमय प्रतिकृति तरी ज्या मानववंशाच्या मेंदूंत उत्पन्न झाली, त्याच्या मनांत स्त्रियांबद्दल किती आदर वसत असावा याची कल्पना करतां येईल. अशा प्रतीचा आदर जगांत कुठेंही सांपडणार नाहीं. कायद्यानें जीं बंधनें पाश्चात्य स्त्रियांच्या मानेवर जखडून टाकिलीं आहेत, त्यांची ओळखही आमच्या स्त्रियांस नाहीं. आमच्यांतही पुष्कळ उणीवा आहेत ही गोष्ट खरी, पण तशा त्यांच्यांतही आहेत. प्रेमाला प्रत्यक्ष स्वरूप आणावयाचें यासाठीं साऱ्या मानवजातीचे प्रयत्न साऱ्या जगभर सुरू आहेत आणि देशोदेशींच्या चालीरीति या प्रयत्नाच्याच

द्योतक आहेत. व्यावहारिक सद्गुणांबद्दल बोलावयाचें ह्मटलें तर आमच्या हिंदूंच्या चालीरिती दुसऱ्या कोणाहूनही वरिष्ठ प्रतीच्या आहेत, असें स्पष्ट ह्मणावयास मला मुळींच शंका वाटत नाहीं."

" स्वामीजी, अशा स्थितींत आमच्या स्त्रियांना खरोखरच कांहीं अडचणी असूं शकतील काय ? "

" अर्थात्; त्यांच्याही अडचणी पुष्कळ आणि कठीण स्वरूपाच्या आहेत. तथापि शिक्षणानें दूर न होण्याजोग्या अशा मात्र त्या नाहींत. खरें शिक्षण ह्मणजे खरोखर जादूची कांडी आहे; पण खरें शिक्षण ह्मणजे काय, याची कल्पना अद्यापि आपणास झाली नाहीं. "

" आपण त्याची व्याख्या कशी कराल ?"

थोडेंसें हंसून स्वामी म्हणाले, " मी कशाचीच निश्चित व्याख्या करीत नाहीं. तथापि, त्याचें वर्णन करावयाचें म्हटलें तर शिक्षण म्हणजे अंतर्गत मनोभूमिकेची वाढ असें करतां येईल. शिक्षण म्हणजे नुसता शब्दांचा संग्रह नव्हे. भोंवतालच्या परिस्थितीस अनुरूप असा मार्ग शोधून काढून त्यानें चालावयाचें हा मनोधर्म शिक्षणानें उत्पन्न केला पाहिजे. अशा रीतीनें मोठ्या निर्धारी स्त्रिया आम्ही आमच्यांत उत्पन्न केल्या पाहिजेत. संगमिता, लीला, अहल्याबाई, मिराबाई इत्यादि स्त्रियांची आठवण जिवंत राखणाऱ्या स्त्रिया आपण उत्पन्न केल्या पाहिजेत. पवित्र, स्वार्थत्यागी आणि निर्धारी अशा स्त्रिया आमच्यांत उत्पन्न झाल्या ह्मणजे त्यांच्या उदरीं वीर पुरुष जन्म घेतील. परमेश्वराच्या पाददर्शनानें पवित्र व निर्धारी बनलेल्या स्त्रियांच्या पोटीं हिणकस मुलें कशीं निपजतील ? "

" तर मग शिक्षणांत धर्माचाही अंतर्भाव झाला पाहिजे असें आपलें म्हणणें दिसतें. "

स्वामी गंभीरपणें म्हणाले, " धर्म हा शिक्षणाचा गाभाच होय असें मला वाटतें. धर्माबद्दल माझें अथवा दुसऱ्या कोणाचें प्रचलित असलेलें मत हाच काय तो खरा धर्म असा मात्र माझ्या म्हणण्याचा आशय नाहीं. शिष्याच्या मनोवृत्तीस अनुकूल असाच आरंभ करून त्याच्या कलानें हळूहळू त्याच्या मनांत गुरूनें धर्माचें बीजारोपण करून द्यावें. असें कर-

तांना कोणतेंही विशिष्ट मत गुरूनें शिष्याच्या मर्जीविरुद्ध त्याच्या गळीं बांधूं नये."

"पण ब्रह्मचर्याचें स्तोम धर्मानें इतकें माजविलें आहे कीं त्यापुढें मातृत्व आणि गृहिणीपद हीं फिक्कीं पडतात. यामुळें स्त्रियांच्या विशिष्ट हक्कांवर प्रत्यक्ष घाला पडत नाहीं काय ?"

"ब्रह्मचर्याचें महत्व स्त्रियांसंबंधीं जितकें आहे तितकेंच तें पुरुषांसंबंधीं आहे, हें आपण लक्षांत ठेविलें पाहिजे. याशिवाय या बाबतींत तुमच्या चित्तांत बरीच धरसोड झाली असावी असें तुमच्या प्रश्नावरून दिसतें. प्रत्येक मानवी जीवात्म्याला हिंदुधर्मानें एकच प्रमुख कर्तव्य सांगितलें आहे. क्षणभंगुर अशा मायावी जीविताच्या मागें असलेलें चिरस्थायी तत्त्व अनुभवावयाचें, हेंच तें कर्तव्य होय. हें कर्तव्य पार पाडण्याकरितां अमुकच विशिष्ट मार्ग स्वीकारला पाहिजे असा जुलुम कोणीही केलेला नाहीं. तुम्ही लग्न करा अथवा करूं नका, तुम्ही सन्मार्गानें चाला अथवा वाममार्गानें जा, तुम्ही शिकून मोठे विद्वान व्हा अथवा अज्ञानतिमिरांत बुडून जा, कसेंही करून तुम्ही अखेर मारली म्हणजे तुम्ही कोणत्या मार्गानें गेलां हा प्रश्न तुह्मांस कोणीही विचारीत नाहीं. साध्याकडे नेणारा कोणताही मार्ग विहितच आहे. बौद्धधर्म आणि सनातनधर्म यांतील फरक हाच होय. आपलें साध्य सिद्ध करण्याला बौद्धधर्मानें फक्त एकच मार्ग ठेविला आहे. आपल्या अंगीं सिद्धि असल्याची घमेंड बाळगणाऱ्या एक तरुण योग्याची गोष्ट महाभारतांत सांगितली आहे, ती तुह्मांस स्मरत असेलच. या तरुण योग्यानें केवळ दृष्टिक्षेपानें एका बगळीला भस्मसात् केलें होतें. हा योगी गांवांत गेला असतां तेथें त्याला एका पतिव्रतेचें दर्शन झालें. नंतर तो धर्मव्याध नांवाच्या एका खाटकाकडे गेला. केवळ प्राप्त झालेलें कर्तव्य उतम रीतीनें पार पाडल्यामुळें धर्मव्याधास व त्या पतिव्रतेस ज्ञानप्राप्ति झाली होती असें त्या योग्याला आढळून आलें."

"स्वामीजी, आमच्या देशांतील स्त्रियांना आपण विशिष्ट संदेश कोणता सांगाल ?"

"पुरुषांबद्दल माझें जें ह्मणणें आहे तेंच स्त्रियांनाही लागू आहे. हिंदुधर्माच्या आणि राष्ट्राच्या उन्नतीबद्दल साशंक होऊं नका. निराशावादी होऊं

नका. निर्धारानें वागण्यास शिका. या बाबींत कोणाचीही लाज बाळगूं नका. तसेंच आपणास लोकांकडून कांहीं शिकावयाचें असलें तरी लोकांस देण्यासारखेंही आपणाजवळ पुष्कळ आहे हें ध्यानांत ठेवा. ”

## नंबर १०.
## परधर्मीयांचा हिंदुधर्मांत प्रवेश.

प्रबुद्धभारत, एप्रिल १८९९.

प्रबुद्ध भारताच्या संपादकांच्या हुकुमावरून मी स्वामी विवेकानंद यांची भेट घेण्यास गेलों. परधर्मीयांस हिंदुधर्मांत घेतां येईल कीं नाहीं, यासंबंधीं स्वामीजींचें मत मला घ्यावयाचें होतें. गंगानदीच्या तीरीं एका बोटी ठेवण्याच्या जागीं त्यांची गांठ पडली. या वेळीं रात्र झाली होती. आह्मी रामकृष्णमठाच्या घांटावर बसलों होतों. या ठिकाणीं स्वामीजींचें व माझें संभाषण झालें.

रात्रीची वेळ असल्यामुळें व ती जागा रहदारीपासून एका बाजूस असल्यामुळें सर्वत्र शांतता पसरली होती. व आकाशांत तारे चमकत होते आणि समोर गंगानदीचें विस्तीर्ण पात्र दिसत होतें. एका बाजूस रामकृष्णमठाचा पिछाडीचा भाग होता.

“स्वामीजी, एकवार हिंदुधर्माचा त्याग करून ज्यांनीं दुसरा धर्म स्वीकारला आहे, त्यांना हिंदुधर्मांत परत घेण्याबद्दल आपलें मत काय आहे, हें आपणास मला विचारावयाचें आहे. त्यांस परत घ्यावें असें आपलें मत आहे काय ? ”

“ होय, त्यांस अवश्य परत घ्यावें; आणि त्यांस परत घेण्यास कांहीं हरकत नाहीं असें मला वाटतें.”

स्वामीजी थोडा वेळ स्तब्ध बसले होते. त्यांच्या चित्तांत कांहीं विचार चालला असावा असें दिसलें. थोड्या वेळानें ते पुन: बोलूं लागले. “ याशिवाय अशा लोकांस हिंदुधर्मांत परत न घेतलें तर हिंदूंची संख्या कमी होते हेंही लक्ष्यांत घेतलें पाहिजे. मुसलमान लोक हिंदुस्थानांत प्रथम आले, त्या वेळीं हिंदूंची संख्या साठ कोटी होती असें फेरिस्तानें कोठेंसें ह्मटल्याचें मला आठवतें. फेरिस्ता हा अत्यंत जुना मुसलमान इतिहासकार

आहे. सांप्रत हिंदूंची संख्या सुमारें वीस कोटी आहे. आणि आपल्या धर्मा-तून बाहेर जाणारा प्रत्येक मनुष्य आपणास मुकतो, एवढेंच नव्हे तर उलट आपल्या शत्रूंच्या संख्येंत भर घालतो.

"याशिवाय सांप्रत मुसलमानी किंवा ख्रिस्ती धर्माचा स्वीकार केलेले लोक हे पूर्वीच्या मुसलमान किंवा ख्रिस्ती झालेल्या हिंदुलोकांचेच वंशज आहेत. यापूर्वीच्या लोकांनीं केवळ तरवारीच्या भयामुळें परधर्माचा स्वीकार केला होता, हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. यामुळें सांप्रतच्या मुसलमानी अथवा ख्रिस्ती लोकांवर कोणत्याही प्रकारच्या अडचणी लादणें न्यायाचें होणार नाहीं. आतां जे जन्मदारभ्यच परधर्मी असतील, त्यांजविषयीं विचार केला तर पूर्वकाळीं हजारों परधर्मी लोक हिंदुधर्मांत घेतले जात असत आणि ही परंपरा अद्यापिही चालू आहे असें आपणास आढळून येईल."

"हिंदुस्थानांतील मूळच्या परधर्मी लोकांचा प्रवेश आर्यवर्णांत झाला. एवढेंच नव्हे तर पुष्कळशा बाह्यदेशियांचाही प्रवेश आपल्या धर्मांत झाला आहे. मुसलमानांची स्वारी होण्यापूर्वी अनेक परदेशीयांचा प्रवेश आमच्या धर्मांत झाला. पुराणांत अनेक जातींच्या उत्पत्तीसंबंधीं जीं विशेष वर्णनें आढळतात, तीं यामुळेंच होत असें माझें मत आहे. निरनिराळ्या परकीयांचा प्रवेश हिंदुधर्मांत होऊन त्यांच्या निरनिराळया जाती बनल्या असाव्या असें माझें मत आहे.

"पूर्वीचे हिंदु असून परधर्माचा स्वीकार केलेले जे लोक हिंदुधर्मांत परत येऊं इच्छित असतील, त्यांच्यासाठीं कांहीं विशेष विधीची योजना असली तर बरें असें मला वाटतें; पण जे लोक केवळ तरवारीमुळें आप-णास पारखे झाले आहेत अथवा जे अगोदरच परकीय आहेत, त्यांजसाठीं कांहीं प्रायश्चित्तविधीही नसावा असें मला वाटतें."

मीं विचारलें, "स्वामीजी, पण या लोकांची जात कोणती ह्मणावी ? यांना कोणती तरी एक जात दिली पाहिजे. कारण, तसें न केल्यास आम्हां हिंदूंशीं ते एकरूप होणार नाहींत. आमच्या विशिष्ट समाजरचनेंत त्यांची पायरी तरी कोणती लावावी ?"

"पूर्वी हिंदु असून परधर्मी बनलेले जे कोणी असतील ते अर्थातच आपल्या पूर्वीच्या जातीचे समजले जातील; आणि नवीन येणारे

लोक आपली नवीच जात बनवितील. वैष्णवधर्मांत असा प्रकार पूर्वी घडून आला असल्याचें तुह्मांस ठाऊक असेलच. निरनिराळ्या जातींचे व धर्मांचे लोक वैष्णवधर्मांत आले, तेव्हां त्यांनीं आपली एक स्वतंत्र जातच बनविली. श्रीरामानुजांच्या कालापासून तों थेट श्रीचैतन्यापर्यंत सर्व वैष्णव महापुरुषांनीं हाच मार्ग स्वीकारला होता. ”

“ आणि यांच्या विवाहाची योजना काय करावयाची ? ”

“ त्यांचीं लग्नें आतांप्रमाणेंच पुढेंही परस्परांत होतील. ”

“ तसेंच नांवांसंबंधींही एक अडचण आहे. हिंदूंतून परधर्मांत गेलेल्या ज्या लोकांनीं परकी नांवें घेतलीं आहेत, त्यांचा नामकरणविधि पुन्हां करावा लागेल असें मला वाटतें. त्यांना त्यांच्या जातीस शोभेशीं नांवें ठेवावीं असें आपणास वाटतें काय ?”

“ अर्थात्; नुसत्या नांवांतसुद्धां पुष्कळ महत्व आहे. ” इतकें बोलून स्वामीजी स्तब्ध राहिले. यासंबंधीं अधिक चर्चा करण्याची त्यांची इच्छा दिसली नाहीं.

“ स्वामीमहाराज, आपल्या हिंदुधर्मांत अनेक पंथ आहेत. यांपैकींच त्यांनीं एखादा पंथ स्वीकारावा कीं, आपला एखादा नवाच पंथ काढावा याबद्दल आपलें काय मत आहे ? ”

या माझ्या प्रश्नामुळें स्वामींची मुद्रा थोडी उग्र दिसूं लागली. ते म्हणाले, “असा प्रश्न तुम्ही विचारतां तरी कसा ? प्रत्येकाला आपापल्या मार्गानें जाण्याची पूर्ण मुभा असली पाहिजे. कारण तसें न झालें, तर हिंदुधर्माच्या मूळ हेतूवरच पाणी पडल्यासारखें होतें. प्रत्येकाला आपला ‘ इष्ट मार्ग स्वीकारण्याची पूर्ण मोकळीक’ हा आमच्या धर्माचा मुख्य पाया आहे.”

स्वामींचे हे विचार मला फार महत्वाचे वाटले. या बाबींचा विचार करण्यांत स्वामींनीं जितकीं वर्षें खर्च केलीं तितकीं दुसऱ्या कोणीही केलीं नसतील असें मला वाटतें. हिंदुधर्माच्या अनेक शाखांची उभारणी कोणत्या सामान्य पायावर झाली आहे, याचा अभ्यास सशास्त्ररीत्या स्वामींनीं केला आहे. ‘ इष्ट मार्गाची मोकळीक ’ हा हिंदुधर्माचा पाया इतका विस्तृत आहे कीं त्यांत जगांतील कोणाही मनुष्याचा समावेश होऊं शकेल.

यानंतर दुसऱ्या अनेक विषयांवर आमचें संभाषण झालें, आणि मोठ्या प्रेमानें स्वामींचा निरोप घेऊन मी तेथून निघालों. स्वामीजी मठांत परत गेले आणि मी गंगेच्या तीरानें कलकत्त्यांतील आपल्या घरीं परत आलों.

## प्रश्न आणि उत्तरें.

( हार्वर्ड युनिव्हर्सिटीच्या ग्रॅज्युएट फिलॉसॉफिकल सोसायटींत २५ मार्च १८९६ रोजीं दिलेल्या व्याख्यानाच्या वेळीं झालेलीं. )

**प्रश्न**—तत्त्वज्ञानासंबंधीं हिंदुस्थानांत सध्यां कोणत्या प्रकारची चळवळ सुरू आहे, हें जाणण्याची मला जिज्ञासा आहे. या प्रश्नाची तेथें कितपतशी चर्चा होते?

**उत्तर**—हिंदुस्थानांतील लोकांपैकीं बराच मोठा भाग व्यवहारदृष्टीनें द्वैतवादी असून कांहीं थोडे लोक मात्र अद्वैतवादी आहेत, हें मी पूर्वी सांगितलेंच आहे. वादाचा मुख्य विषय ह्मटला ह्मणजे माया आणि जीव हा होय. मी या देशांत ( अमेरिकेंत ) आलों त्या वेळीं येथील मजुरांना सुद्धां चालू राजकीय विषयांची बरीच माहिती असल्याचें मला आढळून आलें; पण एखाद्या विशिष्ट पंथाचीं मतें काय आहेत इत्यादि धर्मविषयक प्रश्न मी त्यांस विचारले तेव्हां त्यांबद्दल त्यांस कांहीं माहिती नाहीं असें मला दिसून आलें. ते ह्मणाले, "अह्मांस कांहीं ठाऊक नाहीं. आह्मीं फक्त चर्च (देवळां) मध्यें जात असतों. हिंदुस्थानांत एखाद्या शेतकऱ्याला "तुमच्यावर राज्य कोणाचें आहे?" असा प्रश्न तुह्मी केला तर तो म्हणेल "मला ठाऊक नाहीं. मी कर देत असतों." पण धर्माच्या बाबतींत तुम्हीं त्याला कांहीं प्रश्न केला तर त्याचें ताबडतोब उत्तर देऊन माया, जीव इत्यादि विषयांबद्दल बरीच सविस्तर माहिती तो तुम्हांस देईल. त्याला लिहितांवाचतां येत नसतें; पण या विषयाचें ज्ञान त्यानें बैरागी, हरिदास इत्यादि लोकांपासून पैदा केलेलें असतें. असल्या विषयांची चर्चा करण्याची आवडही त्याला फार असते. दिवसाचें कामधाम आटोपून शिळोप्याच्या वेळीं तो या विषयांची चर्चा करीत असतो.

**प्रश्न**–पुराणमतवादी हिंदु हा कशा प्रकारचा असतो ?

**उत्तर**--कांहीं जातिनिर्बंध पाळणें व खाणेंपिणें आणि विवाह वगैरे बाबतींत चालू देशाचाराप्रमाणें वागणें इतकाच अर्थ सध्यां पुराणमताचा झाला आहे. एवढ्या गोष्टी केल्या म्हणजे धर्मासंबंधीं कोणत्याही मताचा स्वीकार त्याला करतां येतो. हिंदुस्थानांत तुम्हांप्रमाणें संघटित धर्मपद्धति केव्हांही अस्तित्वांत नव्हती. यामुळें पुराणमत ह्मणजे अमुक विशिष्ट मत असें सांगणारे पुरुष अथवा मंडळीही तेथें निर्माण झाली नाहीं. सामान्य दृष्टीनें पाहतां वेदांवर ज्यांचा विश्वास आहे, अशा लोकांना आम्ही पुराणमतवादी ह्मणतों. पण, प्रत्यक्ष व्यवहार पाहिला ह्मणजे हे जुन्याचे अभिमानी लोक वस्तुत: वेदांचे अभिमानी नसून पुराणांचे अभिमानी असल्याचें आढळून येईल.

**प्रश्न**—तुमच्या हिंदुतत्त्वज्ञानाचा परिणाम ग्रीक तत्त्वज्ञानावर कितपत झाला ?

**उत्तर**—अलेक्झांड्रियाच्या द्वारें ग्रीक तत्त्वज्ञानावर आमच्या तत्त्वज्ञानाचा परिणाम झाला असण्याचा पुष्कळच संभव आहे. सांख्यदर्शनाचा पगडा पायथागोरासच्या मनावर झाला असावा असें मानण्यास जागा आहे. कसेंही झालें तरी श्रुतींतील तत्त्वज्ञान बुद्धिगम्य मार्गाशीं सुसंगत करण्याचा प्रथम यत्न सांख्यदर्शनानेंच केला आहे, असें मला वाटतें. भगवान् कपिलांच्या नांवाचा उल्लेख **'ऋषिम् कपिलं प्रसूतं यस्त्वमग्रे'** असा श्रुतींतही आढळून येतो.

**प्रश्न**—पाश्चात्यांचीं आधिभौतिक शास्त्रें आणि तुमचीं दर्शनें यांत विरोध कोठें आहे ?

**उत्तर**—यांत विरोध मुळींच नाहीं. या दोन्ही पद्धतींत पूर्ण एकतानता आहे. आकाश, प्राण, आणि उत्क्रांति यांजबद्दलच्या आमच्या उपपत्ती तुमच्या अर्वाचीन तत्त्वज्ञानाशीं तंतोतंत जुळतात. तुमच्या उत्क्रांतीच्या कल्पना आमच्या योगग्रंथांत आणि सांख्यदर्शनांतही आढळून येतात. उदाहरणार्थ एका जातीच्या प्राण्याची उत्क्रांति होत होत तो दुसऱ्या जातीचा प्राणी बनतो असें भगवान् पतंजली यांनीं ' **जात्यन्त परिणामः प्रकृत्या पुरात्** ' या सूत्रानें सांगितलें आहे. फक्त ही उत्क्रांति कोणत्या रीतीनें घडून येते या उपपत्तींत मात्र अर्वाचीन मताशीं त्यांचा मतभेद आहे. त्यांच्या मतें जी

उत्क्रांति घडून येते, तिचें स्वरूप आध्यात्मिक असतें. '**निमित्तमप्रयोजकं प्रकृतीनाम् वरणभेदस्तु ततः क्षेत्रिकवत्** ' असें भगवान् पतंजली ह्मणतात. शेताला जवळच्या कालव्यांतून पाणी आणावयाचें असलें ह्मणजे मध्यंतरींचा अडथळाच शेतकरी दूर करतो. तो अडथळा दूर झाला ह्मणजे पाणी आपोआप येतें. त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्य वस्तुत: अनंतरूप असतोच; फक्त सभोंवतालच्या परिस्थितीमुळें त्याचें हें स्वरूप झांकलेलें असतें. पण ही परिस्थिति नाहींशी झाली म्हणजे त्याचें मूळचें अनंतरूप आपोआप प्रकट होतें. पशूच्या ठिकाणीं मनुष्यत्व असतेंच, पण विशिष्ट देहबंधनामुळें तें अप्रकट स्थितींत असतें; पण चांगली परिस्थिति प्राप्त होण्याबरोबर तोच पशु मनुष्यरूपानें प्रकट होतो. त्याच प्रमाणें ही परिस्थिति आणखी वदलली म्हणजे त्याच मनुष्याचें मूळचें अनंतरूप प्रकट होतें. अशा रीतीनें अर्वाचीन तत्त्वज्ञानाशीं वस्तुत: आमच्या तत्त्वज्ञानाचा कोणत्याही प्रकारचा विरोध नाहीं हें उघड दिसून येईल. बाह्यजगाचें ज्ञान आपणास कसें होतें याबद्दलचा सांख्यसिद्धांत आणि अर्वाचीन इंद्रियविज्ञानशास्त्राचा सिद्धांत यांत फारसा फरक नाहीं.

**प्रश्न**—पण तुमची पद्धत वेगळी आहे.

**उत्तर**—होय. मनाच्या शक्तींचें केंद्रीकरण करणें, हा एकच ज्ञानार्जनाचा मार्ग आहे, असा आमचा सिद्धांत आहे. आधिभौतिक शास्त्रांचें ज्ञान प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर मनाच्या शक्तीचें केंद्रीकरण बाह्य वस्तूंवर केलें पाहिजे; आणि आध्यात्मिक ज्ञान हवें असलें तर त्याच शक्ती अंतर्वर्ती केल्या पाहिजेत. शक्तीच्या या केंद्रीकरणास आम्ही योग असें म्हणतों.

**प्रश्न**—अशा प्रकारच्या केंद्रीभवनांत या सिद्धांताच्या सर्व बाजू व्यक्त होतात काय?

**उत्तर**—योग्यांनीं यासंबंधीं अनेक गोष्टी सांगितल्या आहेत. आध्यात्मिक अथवा आधिभौतिक ज्ञान केंद्रीकृत मनाला व्यक्त होतें व त्या स्थितींत विश्वांतील कोणतेंही सत्य लपून रहात नाहीं, असें योग्यांचें म्हणणें आहे.

**प्रश्न**—विश्वरचनाशास्त्राबद्दल अद्वैतवाद्यांचें काय मत आहे ?

**उत्तर**—विश्वरचनाशास्त्र अथवा अशाच प्रकारचीं दुसरीं शास्त्रें ही सर्व माया आहे व सर्व जग हा नुसता देखावा आहे असें अद्वैतवादी ह्मणतील. त्यांच्या मतें विश्वाला वस्तुतः अस्तित्व नाहीं. आह्मीं बद्ध आहों तोंपर्यंत हा सारा देखावा आम्हांस दिसतो इतकेंच. असा देखावा दिसत असतां कित्येक गोष्टी कांहीं विशेष अनुक्रमानें जात येत असतात. यापलीकडे कायदा अथवा अनुक्रम यास अस्तित्व नाहीं. यापलीकडे जें कांहीं आहे तें स्वातंत्र्य.

**प्रश्न**—अद्वैताचा द्वैताशीं पूर्ण विरोध आहे काय ?

**उत्तर**—उपनिषदांची रचना पद्धतवार रीतीनें झाली नसल्यामुळें ज्या तत्त्ववेत्त्यांस कोणताही विशिष्ट वाद पुढें आणावयाचा होता, त्यांस तसें करण्यास फार सोपें गेलें. कोणताही वाद पुढें करण्यास उपनिषदांचा पाया अवश्य पाहिजे. असें असतांही उपनिषद्ग्रंथांत सर्व मतांस आधार सांपडत असल्याचें आढळून येतें. द्वैत आणि अद्वैत हीं दोन मतें केवळ परस्परविरोधी नाहींत असें आमचें उत्तर आहे. सनातनधर्माच्या तीन पायऱ्यांपैकीं द्वैत मत ही एक पायरी मात्र आहे. ही पहिली पायरी आहे. यानंतर विशिष्टाद्वैत मत ही दुसरी पायरी आहे. शेवटीं विश्व व आपण एकरूपच आहों असा अनुभव ज्ञानमार्गावर आरूढ होणारास शेवटीं येतो. याकरितां हीं मतें परस्परांशीं विसंवादी नसून परस्परांचीं पोषक आहेत असें आढळून येईल.

**प्रश्न**—माया अथवा अज्ञान हीं कां असावीं ?

**उत्तर**—कां ? निमित्तमर्यादेच्या पलीकडे गेल्यावर हा प्रश्न विचारण्याचा अधिकार तुम्हांस उरत नाहीं. फक्त मायेच्या हद्दींतच हा प्रश्न विचारणें शक्य आहे. याकरितां न्याय्य रीतीनें तुम्ही तो विचारला तरच आम्ही याचें उत्तर देऊं. त्यापूर्वी त्याचें उत्तर देण्यास आम्हांस अधिकार नाहीं.

**प्रश्न**—व्यक्त परमेश्वर हा मायाकृतच आहे काय ?

**उत्तर**—होय; मायेच्या पडद्यांतून दिसणारें अव्यक्ताचें जें व्यक्तरूप तेंच परमेश्वर. तेंच अव्यक्तरूप सृष्टीच्या मर्यादेंत आलें म्हणजे त्याला जीवात्मा असें नांव प्राप्त होतें, आणि सृष्टीचें जो नियमन करतो तो ईश्वर ह्मणविला जातो. एखादा मनुष्य येथून सूर्यावर जावयास निघाला तर

सूर्यबिंब प्रथम त्याला लहान दिसेल. पण तो जसजसा त्याच्या जवळ जवळ जाईल, तसतसें तें अधिक अधिक मोठें होत जाईल. प्रत्येक वेळीं जणूं काय आपण निराळाच सूर्य पाहात आहों, असा भास त्याला होईल; तथापि सर्व काळ त्याला एकाच सूर्याचें दर्शन होत होतें, याबद्दल शंका घेण्याचें कारण नाहीं. अशाच रीतीनें दृश्य जगांतील साऱ्या वस्तु या साऱ्या एकाच अव्यक्ताचे देखावे आहेत, आणि या दृष्टीनें या वस्तु खऱ्या आहेत. या वस्तु सर्वथा खोट्या आहेत असें नाहीं; पण हें अव्यक्ताचें कनिष्ट प्रतीचें रूप आहे इतकेंच म्हणतां येईल.

**प्रश्न**—ब्रह्मानुभव होण्यास विशेष मार्ग कोणता?

**उत्तर**—त्याला दोन मार्ग आहेत असें आमचें मत आहे. एक प्रत्यक्ष आणि एक परोक्ष. सर्व विश्व ज्या मार्गानें चाललें आहे तो भक्तीचा अथवा प्रेमाचा मार्ग; हा प्रत्यक्ष मार्ग आहे. आपणांतील प्रेमाचें बीज वाढवून त्याचा विस्तार अनंतरूपाचा केला तर आपली वाढ विश्वव्यापी प्रेमापर्यंत होईल. दुसरा मार्ग 'नेति' 'नेति' हा होय. विश्वांतील ज्या ज्या वस्तु आपणास बाह्यवर्ती करीत असतात, त्या सर्वांपासून आपलें मन परावृत्त करणें हा दुसरा मार्ग होय. या दुसऱ्या मार्गानें मनाचा जणूं काय लोप होऊन सत्यरूप स्वयमेव प्रकट होतें. या स्थितीला आम्ही समाधि असें म्हणतों. हीच विचारातीत स्थिति होय.

**प्रश्न**—याचा अर्थ स्वतःस नाहींसें करणें असा होईल, नाहीं काय ?

**उत्तर**—नाहीं; अशा स्थितींत जग नाहींसें होऊन फक्त मी मात्र उरतों.

**प्रश्न**--हिंदुस्थानांतील भक्तिमार्ग हा पाश्चात्यांकडून गेला आहे असें जर्मनींतील कांहीं पंडितांचें मत आहे. याबद्दल आपणांस काय वाटतें ?

**उत्तर**—यांत मला मुळींच तथ्य दिसत नाहीं. केवळ पुराव्यावांचून हें मत त्यांनीं पसरविलें आहे. पाश्चात्यांची भक्ति आणि हिंदुस्थानांतील भक्तिमार्ग हे परस्परांपासून अगदीं भिन्न आहेत. आमच्या भक्तिमार्गांत भीतीच्या विचाराचा कोठें लवलेश नाहीं. परमेश्वरावर निष्काम प्रेम करा असें आमचा भक्तिमार्ग सांगतो. परमेश्वर आपलें कांहीं नुकसान करील या भीतीनें त्याची भक्ति करावयाची नसून केवळ प्रेमानें ती करावयाची आहे. याशिवाय हा मार्ग पाश्चात्यांकडून आम्हांकडे आला असें मानण्यास कांहींच

कारण नाहीं. अत्यंत प्राचीन अशा उपनिषद्ग्रंथांतही भक्तीचा उल्लेख सांपडतो. ख्रिस्ती बायबलाहून आमचे उपनिषद्ग्रंथ फार प्राचीन काळचे आहेत. संहितांतही बीजरूपानें भक्तिमार्गाचा उल्लेख आहे. भक्ति हा शब्द पाश्चात्यांचा नव्हे.

**प्रश्न**—ख्रिस्तीधर्माबद्दल हिंदुलोकांची काय कल्पना आहे ?

**उत्तर**—तो धर्म चांगला आहे असें आमचें मत आहे. आमचा वेदान्तधर्म कोणालाही दूर करीत नाहीं. त्याच्या ठिकाणीं दुसऱ्या कोणत्याही धर्माला अवकाश आहे. यासंबंधीं आह्मा हिंदुलोकांच्या कांहीं विशेष कल्पना आहेत. मला एक मूल आहे अशी कल्पना करा. या मुलाला कोणत्याही विशिष्ट धर्माचें शिक्षण मी देत नाहीं. मी त्याला फक्त प्राणायाम शिकवितों व थोडासा संयमाचा अभ्यास शिकवून कांहीं प्रार्थना करण्याचेंही शिकवतों. पण ती प्रार्थना तुमच्या प्रार्थनेसारखी मात्र नसते, हें लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आमच्या प्रार्थनेच्या पद्धतीचा नमुना असा–" या विश्वाचा कर्ता जो परमेश्वर त्याचें मी ध्यान करतों. तो माझ्या मनाला प्रकाश देवो. यानंतर त्या मुलाला इतर सामान्य शिक्षण मिळतें आणि अशा प्रकारच्या क्रमांतच निरनिराळ्या तत्त्ववेत्त्यांचीं मतेंही त्याच्या कानांवरून जात असतात. त्याच्या मानसिक अवस्थेला बरोबर जुळेल अशा एखाद्या मताचा स्वीकार तो करतो. असें मत प्रतिपादणारा मनुष्य त्याचा गुरु होतो व तो शिष्य बनतो. अशा प्रकारच्या गुरूपासून त्या विशिष्ट मताचा स्वीकार तो करतो. एकाचें मत सर्वथा दुसऱ्याच्या उपयोगीं पडत नाहीं, असा आमचा मूळ सिद्धांत आहे. प्रत्येकाला स्वतंत्र मार्ग असणें इष्ट आहे, असें आमचें मत आहे. माझ्या मुलाला एक मत पसंत पडलें तर मुलीला दुसरेंच अवश्य वाटेल आणि मी स्वतः तिसऱ्या निराळ्याच मताचा स्वीकार करीन! अशा रीतीनें प्रत्येकाचा इष्ट मार्ग भिन्न असून जो तो आपापल्या मार्गानें जात असतो. मला गुरूनें कोणता मार्ग सांगितला आहे हें फक्त गुरूला किंवा मलाच ठाऊक असतें. तो सार्वजनिक चर्चेचा विषय होऊं शकत नाहीं. कारण तो दुसऱ्या कोणाच्या उपयोगीं पडेल असा भरंवसा नाहीं. प्रत्येकानें आपापला मार्ग स्वतंत्रपणें शोधून काढला पाहिजे. याकरितां तत्त्वज्ञानाचे सामान्य सिद्धांत आणि त्यांवरून निघणारे सामान्य

मार्ग इतक्यांचा निर्देश मात्र सार्वजनिक रीतीनें करणें शक्य आहे. एखाद्याला हटमार्गाचाच उपयोग होण्यासारखा असला तर त्याचा गुरु त्याला एका पायावर उभें राहावयास सांगेल. दुसऱ्या एखाद्याला असें करणें हास्यास्पद वाटेल. एखाद्याला द्वैतमार्गाचा उपयोग होण्यासारखा असेल, तर दुसऱ्याला अद्वैतसिद्धांतच कामीं येईल. आमच्या समाजाचे जातिनिर्बंध जोंपर्यंत त्यांतील कोणीहि मनुष्य पाळीत असेल, तोंपर्यंत त्यानें ख्रिस्ताची, बुद्धाची अथवा महंमदाची भक्ति केली तरी त्याच्या आड कोणी येणार नाहीं. जो मार्ग त्याला इष्ट वाटत असेल त्या मार्गानें त्यानें खुशाल जावें.

**प्रश्न**—सर्व हिंदूंचा जातिभेदावर विश्वास आहे काय ?

**उत्तर**—त्यांचा विश्वास असो अगर नसो; जातिनिर्बंध त्यांना पाळावेच लागतात. कोणा एकाचा तसा विश्वास नसला तरी जातीच्या हुकमापुढें मान वांकविणें त्याला भाग असतें.

**प्रश्न**--प्राणायाम आणि मन:संयम हीं सर्व लोक करतात काय ?

**उत्तर**--होय; कांहींजण हे नियम केवळ अंशत: मात्र पाळतात. आमचीं देवळें आणि तुमचीं चर्चें या दोहोंत पुष्कळ भेद आहे. आमचीं सारीं देवळें उद्यां नाहींशीं झालीं तरी त्याचें कोणास कांहीं वाटणार नाहीं. त्यामुळें आमच्या धर्मांत कांहीं उणीव येणार नाहीं. पुत्रप्राप्तीसाठीं, स्वर्गप्राप्तीसाठीं अथवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या उद्देशानें एखादा मनुष्य एखादें मोठें देऊळ बांधतो आणि तेथल्या पूजेअर्चेसाठीं भिक्षुकांची नेमणूक करितो. या देवळांत दुसऱ्या कोणी पाऊल ठेवलें नाहीं तरी कांहीं हरकत नाहीं. प्रत्येकाचें देवघर त्याच्या घरींच असतें. देवघराची खोली ह्मणून प्रत्येक घरांत एक स्वतंत्र जागाच असते. मुलाची मुंज झाल्यानंतर स्नान करून पूजा करणें हें त्याचें पहिलें कर्तव्य आहे. या वेळींच त्याला प्राणायाम, ध्यान, जप, इत्यादि कर्में करावीं लागतात. यावेळीं शरीर ताठ करून त्याला बसावें लागतें. शरीर सुस्थितींत ठेवण्याचें सामर्थ्य मनाला आहे असें आमचें मत आहे. अशा रीतीनें एकाचा पूजाविधि समाप्त झाला ह्मणजे त्याच्या जागीं घरांतील दुसरा एखादा पुरुष येऊन बसतो व आपल्या इष्ट मार्गानें पूजा अर्चा करतो. कित्येक वेळां या एकाच खोलींत तीन

अथवा चार इसमही आपापलीं संध्यावंदनादि कार्ये करीत असतात. असें असतांही जो तो आपापल्या इष्ट मार्गानें हीं कामें करीत असतो. याप्रमाणें हा पूजाविधि दिवसांतून निदान दोन वेळां करावा लागतो.

**प्रश्न**--ब्रह्माशीं एकरूप होणें अशी जी स्थिति आपण नुकतीच सांगितली, ही स्थिति केवळ कल्पनामय आहे, कीं ती खरोखरच प्राप्त होऊं शकते ?

**उत्तर**—ती स्थिति प्रत्यक्ष प्राप्त होऊं शकते आणि तिचा प्रत्यक्ष अनुभव आपणास होतो असें आमचें निश्चित मत आहे. ही स्थिति केवळ बोलण्यापुरतीच असेल तर तिच्यांत कांहींच अर्थ नाहीं. आत्म्याबद्दल प्रथम ऐकून घ्यावें, नंतर बुद्धिगम्य मार्गानें वादविवाद करून त्याचा निश्चय करावा आणि अखेरीस ध्यानानें त्यावर आरूढ व्हावें असें श्रुतींनीं सांगितलें आहे. केवळ अंधपणें कोणत्याही मार्गाचें अनुसरण करूं नका, असें श्रुतींचें सांगणें आहे. याकरितां कोणतेंही तत्त्व कर्णपथावर आलें, तर बुद्धीनें त्याची सत्यासत्यता कसून पाहून नंतर जाणूनबुजून त्याचा स्वीकार करा. इतकें झाल्यानंतर त्या तत्त्वाचा अनुभव होण्याकरितां त्याचें ध्यान करणें इष्ट आहे. हाच खरा धर्ममार्ग. एखाद्या मतावर नुसता विश्वास ठेवणें हा धर्म नव्हे. विचारातीत स्थिति प्राप्त करून घेणें हाच धर्म होय, असें आमचें ह्मणणें आहे.

**प्रश्न**--तुह्मी ह्मणतां ती विचारातीत स्थिति प्राप्त झाली तर तिचें वर्णन करतां येईल काय ?

**उत्तर**--नाहीं. पण ती स्थिति प्राप्त झाली आहे कीं नाहीं, हें भावी परिणामावरून ठरवितां येईल. एखादा वेडा झोंपी गेला तर तो जागा झाला ह्मणजे पूर्वीप्रमाणेंच वेडा असतो. पण ध्यानमार्गानें एखादा मनुष्य विचारातीत स्थितींत जाऊन परत आला ह्मणजे तो मोठा तत्त्ववेत्ता, मोठा साधु पुरुष असा बनतो. झोंप आणि विचारातीत स्थिति यांतील अंतर अशा रीतीनें प्रत्ययास येतें.

**प्रश्न**—प्राचीन काळीं हिंदुस्थानांत मोहिनीविद्येचा बराच प्रचार होता यांत संशय नाहीं. या मोहिनीविद्येचीं मूलतत्त्वें काय आहेत याचा अभ्यास केलेले कांहीं लोक आपणास माहीत आहेत काय ? या बाबतींत त्यांनीं

सध्या कोणते नवीन शोध केले आहेत? अर्थातच सांप्रत काळीं असे लोक पूर्वीपेक्षां कमी असतील.

**उत्तर**—पाश्चात्य देशांत ज्याला तुह्मी मोहिनीविद्या अथवा वशीकरण-विद्या ह्मणतां तो खऱ्या विद्येचा एक भाग मात्र आहे. आह्मी हिंदुलोक याला भ्रमनिरासविद्या असें ह्मणतों. वास्तविक पाहतां जगद्रूपी भ्रमांत आपण सारेच वावरत आहों. या भ्रमाचा निरास करणें आणि यांतून बाहेर पडणें हेंच आपणास कर्तव्य आहे. ज्या ठिकाणीं सूर्याचा, चंद्राचा अथवा ताऱ्यांचा प्रकाशही फिक्का पडतो, ज्या ठिकाणीं विद्युत्तेजही लुप्त-प्राय होतें आणि ज्या प्रकाशामुळें सर्वांस प्रकाश प्राप्त होतो, त्या ठिकाणीं आपणास जावयाचें आहे. ज्या विद्येनें हें ठिकाण प्राप्त होतें, तिला मोहिनी-विद्या ह्मणण्यापेक्षां भ्रमनिरासविद्या ह्मणणेंच अधिक युक्त होईल. हें जग सत्यवस्तु आहे असें शिकविणारा प्रत्येक धर्म एक प्रकारचा भ्रम उत्पन्न करण्यास कारणीभूत होतो असें आमचें म्हणणें आहे. या जगद्भ्रमांत न सांपडण्याची खबरदारी एक अद्वैतवादी मात्र घेत असतो. कोणत्याही प्रकारच्या द्वैतामुळें भ्रम उत्पन्न होतो ही गोष्ट कमी अधिक प्रमाणानें एका अद्वैतवाद्यास मात्र माहीत असते. श्रुतींनाही झुगारून द्या, व्यक्त परमे-श्वरालाही टाका, विश्वसुद्धां विसरा, फार काय पण आपला देह आणि आपलें मन हींसुद्धां नष्ट होऊं द्या आणि पूर्णपणें या साऱ्या भ्रमांच्या बाहेर या असें अद्वैती ह्मणतो. ‘**यतो वाचो निवर्तंते अप्राप्य मनसासह**’ अशा ठिकाणीं पोहोंचणें हाच भ्रमनिरास होय. ‘**न पुण्यं न पापं न सौख्यं न दुःखं न मंत्रो न तीर्थं न वेदा न यज्ञाः। अहं भोजनं नैव भोज्यं न भोक्ता चिदानंदरूपः शिवोहं शिवोहम्**’। हाच भ्रमनिरास. सध्यां आपण सारेच भ्रमांत पडलेले आहों. यामुळें भ्रमाची ओळख आपणास नवी करणें नको. आमच्या सूक्ष्मेंद्रियशास्त्राची ओळख पाश्चात्यांस नुकतीच कोठें होऊं लागली आहे; पण तीही फार पुसट पुसट आहे असें मला मोठ्या दुःखानें ह्मणावें लागतें.

**प्रश्न**—सूक्ष्म देहाला तुह्मी काय ह्मणतां?

**उत्तर**—आह्मीं त्याला लिंगशरीर असें ह्मणतों. सांप्रतचा स्थूल देह मृत झाला ह्मणजे नवा देह कसा प्राप्त होतो? शक्ति आणि जड

वस्तु हीं परस्परांहून भिन्न राहूं शकत नाहीं, यामुळें या जड देहाचा सूक्ष्म भाग अंशतः शिल्लक राहतो. या सूक्ष्म देहाच्या द्वारें सूक्ष्मेंद्रियें दुसरें शरीर निर्माण करतात. प्रत्येक प्राणी अशा रीतीनें आपापलें शरीर निर्माण करीत असतो. शरीर बनविण्याची क्रिया मन करतें. मी साधु पुरुष झालों ह्मणजे माझा मेंदु सत्पुरुषाच्या मेंदूसारखा होतो. चालू आयुष्यक्रमांतच हा देह टाकून देवाचें शरीर प्राप्त करून घेतां येतें असें योगी ह्मणतात.

योगी पुष्कळ चमत्कार करून दाखवितात. खंडीभर उपपत्ति पाठ करण्यापेक्षां एक रतिभरही अभ्यास अधिक श्रेयस्कर आहे. याकरितां एखाद्या उपपत्तीचा अनुभव मला आला नसला अथवा एखादी चमत्कारिक घटना मी प्रत्यक्ष पाहिली नसली तरी ती गोष्ट साफ खोटी आहे असें ह्मणण्याचा मला मुळींच अधिकार नाहीं. तुमच्या स्वप्नींही आले नसतील असे चमत्कार अभ्यासानें साध्य होतात असें योगग्रंथांत ह्मटलें आहे. नियमित काळ थोडासा अभ्यास करूनही लहानसहान चमत्कार तुमच्या अनुभवास येतात. असे लहानसहान अनुभव आपणास प्राप्त झाले ह्मणजे योग हें खरें शास्त्र असून त्यांत ढोंगधत्तुरा कांहीं नाहीं अशी आपली खात्री होते. अनेक चमत्कार घडल्याचीं वर्णनें जीं अनेक ठिकाणीं आपल्या वाचनांत येतात, त्या सर्वांची सशास्त्र मीमांसा योगी स्पष्ट करतात. चमत्कारांचीं वर्णनें सर्व देशांच्या ग्रंथांत आढळून येतात. असें कां व्हावें, हा एक मोठा प्रश्न आहे. हे सर्व चमत्कार खोटे असून त्यांची शास्त्रीय उपपत्ति शोधण्याचें कारण आपणास नाहीं असें जो कोणी ह्मणतो तो खरोखर बुद्धिमार्गानें जाणारा मनुष्यच नव्हे. हे सारे चमत्कार खोटे आहेत असें स्पष्टपणें सिद्ध केल्यावांचून ते खोटे आहेत, असें ह्मणण्याचा अधिकार तुम्हांस नाहीं. असे चमत्कार केव्हांही खरोखर घडले नाहींत असें स्पष्टपणें तुम्ही प्रथम सिद्ध केलें पाहिजे; पण तुम्हीं तसें केलेलें नाहीं. उलटपक्षीं या गोष्टी सृष्टिबाह्य ह्मणजे हे चमत्कार नव्हेत असें योगी ह्मणतात; कारण आजमितीसही या गोष्टी करून दाखविण्याचें सामर्थ्य आपणास आहे असें ते निश्चितपणें सांगतात. चमत्कार करणारे लोक हिंदुस्थानांत आजही हयात आहेत; पण हे चमत्कार ह्मणजे वास्तविक चमत्कार नव्हेतच, या गोष्टी कशा कराव्या हें सांगणारे पुष्कळ ग्रंथही उपलब्ध आहेत. अशा

चमत्कारिक गोष्टी करण्याचें सामर्थ्य योग्यांच्या आंगीं असतांही त्याचा उपयोग कवळ सूक्ष्मेंद्रियशास्त्राच्या रचनेकडेच त्यांनीं केला, याबद्दल त्यांस धन्यवाद देणें अवश्य आहे.

**प्रश्न**––योगी काय चमत्कार करूं शकतात याचे कांहीं प्रत्यक्ष दाखले तुह्मांस सांगतां येतील काय ?

**उत्तर**—आपल्या शास्त्रावर केवळ अंधविश्वास ठेवावा असें योग्यांचें मुळींच ह्मणणें नाहीं. दुसऱ्या कोणत्याही शास्त्रासंबंधीं तुमच्या मनांत जितकी विश्वासबुद्धि असते, तितकीच योगशास्त्राबद्दल असावी इतकेंच त्यांचें ह्मणणें आहे. इतर शास्त्रांचा अभ्यास करतांना ज्याप्रमाणें तुह्मी प्रत्यक्ष क्रिया करून अनुभव घेतां, त्याचप्रमाणें या शास्त्राचाही अभ्यास करण्यास तितकाच परिश्रम करा. योग्यांचें साध्य अत्यंत उच्च दर्जाचें आहे. मनाच्या शक्तीनें काय करतां येईल, याचे अल्पसे मासले मी प्रत्यक्ष पाहिले आहेत. यासाठीं मोठमोठया गोष्टीही योगानें साध्य होणार नाहींत, असें ह्मणण्याचा अधिकार मला नाहीं. सर्वज्ञता आणि सर्वशक्तिमत्व साध्य करून त्यांच्याद्वारें अखंड शांति आणि अखंड आनंद यांचा लाभ करून घेणें हें योग्याचें अखेरचें साध्य आहे. एके वेळीं एका योग्याला नाग चावला होता. कांहीं वेळानें तो मूर्छित पडला. सायंकाळच्या सुमारास तो पुन्हां शुद्धीवर आला; तेव्हां काय घडलें असें कोणी त्याला विचारलें त्यावर त्यानें उत्तर दिलें, भगवंताकडून नागरूपानें एक दूत मला भेटावयास आला होता. क्रोध, द्वेष, असूया इत्यादि सारे विकार या योग्याच्या हृदयांतून नाहींसे झाले होते. कोणत्याही कारणानें तो कोणाचाही प्रतीकार करीत नसे. तो अखंड प्रेमरसांत बुडून गेला असल्यामुळें त्याला सर्वशक्तिमत्व प्राप्त झालें होतें. हाच खरा योगी. खरा योगी मुद्दाम आपण होऊन चमत्कार करीत नाहीं. त्याच्या रोजच्या आयुष्यक्रमांत ते केवळ यदृच्छेनें घडत असतात. चमत्कार करून दाखविणें हें त्याचें साध्यच नव्हे. योग्यावांचून इतर सृष्टि बद्धस्थितींत आहे असें योगी ह्मणतात. मनुष्यमात्राचें अन्नावांचून चालावयाचें नाहीं. त्याला बायकापोरें हवींत, त्याला पैसा हवा, त्याला राष्ट्रभक्त ह्मणवून घेण्यास पाहिजे अथवा त्याला कीर्तीची हांव असते. अशा प्रकारच्या कोणत्या ना कोणत्या गोष्टींचा तो दास बनलेला असतो. जो कोणी

अशा प्रकारच्या कोणत्याही पाशांत बद्ध झालेला नसतो तोच खरा पुरुष आणि तोच खरा योगी. अखंड रूपांत जे सदा निमग्न असतात त्यांनींच स्वर्ग जिंकला असें समजावें. ईश्वर सर्वांस सारखा आणि एकरूप आहे. अशा परमेश्वराच्या ठिकाणीं योगी एकरूप झालेले असतात.

**प्रश्न**—योगी जातिभेदाला कांहीं महत्त्व देतात काय ?

**उत्तर**—नाहीं; असंस्कृत मनास शिक्षण देणारी एक शाळा, इतकाच जातिभेदाचा उपयोग आहे.

**प्रश्न**—हिंदुस्थानांतील उष्ण हवामान आणि विचारातीत स्थिति अथवा समाधि यांत कांहीं परस्पर संबंध नाहीं काय ?

**उत्तर**—यांत कांहीं संबंध असेल असें मला वाटत नाहीं. समुद्राच्या सपाटीपासून पंधरा हजार फूट उंचीवर असलेल्या हिमालयाच्या गिरिकुहरांत या तत्त्वज्ञानाचा जन्म झाला. या ठिकाणीं थंडी मी ह्मणत असते.

**प्रश्न**—अत्यंत थंड अशा हवेंत या विद्येंत यश मिळविणें शक्य आहे काय ?

**उत्तर**—होय; अगदीं शक्य आहे. जगांत कोणतीही गोष्ट करणें शक्य असेल तर ती ही विद्या साध्य करणें हीच होय. आपणापैकीं प्रत्येक जण जन्मतःच वेदान्ती आहे, असें आह्मी ह्मणतों. सर्व जगाशीं असलेली तुमची समरसता तुह्मीं प्रत्येक क्षणीं व्यक्त करीत असतां. ज्या क्षणीं तुमच्या हृदयांत जगाकरितां एखादा तरी तरंग निर्माण होतो, त्या क्षणीं तुह्मी जगाशीं एकरूप होत असतां; त्या वेळीं तुह्मी जगाशीं समरसता पावत असतां. फरक इतकाच कीं हें काय घडत असतें, याचें ज्ञान तुह्मांस होत नाहीं. सामान्यतः तुह्मीं नेहमींच नीतिमार्गानें जात असतां. तुमच्या मनाचा कल स्वाभाविकपणेंच नीतीनें चालण्याचा असतो. पण हें कां घडतें, याचें कारण मात्र तुह्मांस उमगत नाहीं. असें कां घडतें या कारणाचा शोध ज्या शास्त्रानें लाविला त्या शास्त्राला वेदान्त असें ह्मणतात. कार्यकारणभाव जाणून घेऊन नीतीनें चाला असें वेदान्ताचें तुह्मास सांगणें आहे. जगांतील सर्व धर्मांचें सार पाहिलें तर तें हेंच आहे.

**प्रश्न**—जो तो आपापल्या पुरता, अशा प्रकारची वागणूक आह्मां पाश्चात्य लोकांत अधिक प्रमाणावर नजरेस येते. समाजाची घडी बिघडविणारें असें

एखादें तत्त्व आमच्यांत शिरलें आहे असें आपणास वाटतें काय ? पौर्वात्य लोक आह्मांपेक्षां अधिक दयार्द्र आहेत असें आपलें मत आहे काय ?

**उत्तर**—पाश्चात्य लोक अधिक कठीण हृदयाचे असून पौर्वात्य लोक सर्व प्राण्यांबद्दल अधिक दया बाळगणारे आहेत असें मला वाटतें; पण तुमची संस्कृति अधिक अर्वाचीन आहे इतकेंच या फरकाचें कारण आहे. कोणत्याही वस्तूबद्दल दयार्द्रबुद्धि उपजण्यास बराच काळ लोटावा लागतो. तुह्मी अधिक सामर्थ्यवान् आहां, पण सामर्थ्याच्या वाढीबरोबरच अंतःकरणाची संस्कृति तुम्हांस प्राप्त झाली नाहीं. विशेषतः मनःसंयमाचा अभ्यास तुह्मी फारच थोडा केला आहे. तुम्हांस अधिक दयार्द्र आणि अधिक चांगलें बनण्यास आणखी काळ लोटावा लागेल. हिंदुस्थानांतील लोकांच्या रक्ताच्या प्रत्येक थेंबागणिक दयार्द्रबुद्धि अभिसरण पावत असते. एखाद्या खेड्यांत जाऊन तेथील लोकांस मी राजकारणाच्या गोष्टी शिकवूं लागलों तर त्या विषयाबद्दल त्यांस फारसा उमज पडणार नाहीं; पण त्याऐवजीं मी त्यांस वेदान्त पढवूं लागलों तर ते ताबडतोब मला आपलासा समजतील. आजमितीसही हिंदुस्थानांत वैराग्याचें अस्तित्व तुम्हांस सर्वत्र आढळून येईल. वास्तविक पाहतां आह्मी आज फार अवनतदशेंत आहों; पण अशा स्थितींतही आपल्या राज्यासनाचा त्याग करून दिगंबर होत्साते इतस्ततः फिरणारे राजे तुम्हांस आज तेथें आढळतील. एखाद्या यःकश्चित खेड्यांत तुम्हीं गेलां तर तेथील धनगराची मुलगीही लोंकर कांततां कांततां तुह्मांस ह्मणेल, “ मला द्वैताच्या गोष्टी सांगूं नका. माझी चातीसुद्धां **‘सोऽहं’ ‘सोऽहं’** ह्मणत आहे. ‘ तुह्मीं दगडाच्या पायां कां पडतां,’ असा प्रश्न एखाद्या खेडवळाला तुह्मी केला तर तो तुह्मांस ताबडतोब उत्तर देईल कीं, ‘ धर्माचा प्रत्यक्ष अनुभव होणें हाच खरा धर्म. केवळ मतावर विश्वास ठेवणें हा खरा धर्म नव्हे. जग खोटें आहे असा अनुभव मला आला ह्मणजे सत्याची व माझी प्रत्यक्ष भेट होऊन मी खरा वेदान्ती होईन. तोंपर्यंत अज्ञानी लोक आणि मी यांत कांहीं फरक नाहीं. याकरितां हा अखेरचा अनुभव प्राप्त करून घेण्यासाठीं मूर्तींचा आणि देवळांचा मी आश्रय करतों. अखेर साधणाऱ्या मार्गांतील या पायऱ्या आहेत. अखेर काय आहे हें मी ऐकलें आहे. पण आतां त्याचा मला प्रत्यक्ष अनुभव

हवा आहे." '**वाग्वैखरी शब्दझरी शास्त्रव्याख्यानकौशलम् । वैदुष्यम् विदुषाम् यद्वद्भुक्तये न तु मुक्तये ॥**' प्रत्यक्ष अनुभव हाच मुक्तीला कारण असून केवळ शब्दपांडित्य मुक्तीकडे नेत नाहीं.

**प्रश्न**--मुक्तस्थितींतील लोक जातिनिबंधांकडे लक्ष्य देतात काय ?

**उत्तर**--छे, छे ! मुळींच नाहीं. जातिभेद असूं नये असेंच त्यांचें मत आहे. जे प्रत्यक्ष जातिभेद पाळतात तेसुद्धां त्यांतील उणीवा जाणतात. जातिभेद ही पूर्ण स्वरूपाची समाजव्यवस्था नाहीं हें त्यांसही समजतें; पण याहून दुसरी एखादी अधिक चांगली सोय लागली ह्मणजे जातिभेद आह्मी टाकून देऊं असें त्यांचें ह्मणणें आहे. जातिभेद सोडा असें ह्मणणारांस त्यांचा एकच प्रश्न आहे. त्याच्या बदल्यांत तुह्मीं त्यांस काय देणार, असें ते विचारतात. जेथें कोणत्याही प्रकारचा जातिभेद नाहीं असा एकतरी देश तुमच्या पाहण्यांत आला आहे काय ? खुद्द तुमच्या देशांतही ( अमेरिकेंत ) जातिसंस्था निर्माण करण्याची धडपड एकसारखी चालू आहे. एखादा मनुष्य लक्षाधीश झाला ह्मणजे आपण वरच्या वर्गांत चढलों असें तो समजतो. खालचा वर्ग आणि वरचा वर्ग ही बुद्धि त्याच्या चित्तांत जागृत असते. तुह्मांपैकीं प्रत्येक जण आपापल्या परीनें अशा प्रकारच्या जाति निर्माण करण्याची धडपड करीत आहे. तुमच्या जातींची उच्चनीचता पैशाच्या मापानें मोजली जाते. यामुळें कायम स्वरूपाचे जातिभेद तुम्हांस निर्माण करतां येत नाहींत. अशा प्रकारची कायम स्वरूपाची जातिभेद संस्था फक्त आह्मी हिंदूंनींच निर्माण केली आहे. इतर राष्ट्रें ती निर्माण करण्याची खटपट करीत आहेत, पण त्यांत त्यांस यश येत नाहीं. आमच्यांतही अनेक उणीवा आणि अनेक भोळेपणाच्या गोष्टी आहेत. त्यांत तुमच्याकडील उणीवांची भर घालून पूर्वीची स्थिति सुधारेल असें तुम्हांस वाटतें काय ? तीस कोटी लोकांस आज चतकोर भाकर तरी मिळत आहे याचें कारण आमची जातिभेदाची संस्था हेंच होय. ही समाजरचना सर्वांगपूर्ण आहे असें नाहीं. तींतही पुष्कळ उणीवा आहेत यांत संशय नाहीं. पण ही संस्था आमच्या देशांत निर्माण झाली नसती, तर संस्कृत ग्रंथही तुह्मांस वाचावयास मिळाले नसते. या संस्थेनें आमच्या समाजाभोंवतीं मोठा मजबूत कोट उभारला आहे. अनेक प्रकारच्या लाटा कित्येक वेळां

येऊन या कोटावर आदळल्या आहेत, पण या कोटाचा भंग करून आंत शिरणें त्यांना शक्य झालें नाहीं. ज्या कारणासाठीं ही संस्था निर्माण झाली तीं कारणें अद्यापिही नाहींशीं झालीं नसल्यामुळें ही संस्था टिकून राहिली आहे. सात आठशें वर्षांपूर्वी या जातिभेदाचें जें स्वरूप होतें तें आज नाहीं. प्रत्येक आघाताबरोबर त्याचें स्वरूप अधिकाधिक पक्कें होत गेलें आहे. बाह्य देशीं जाऊन तेथील लोकांस ज्यानें कधींही जिंकलें नाहीं असा देश फक्त हिंदुस्थान हाच आहे. या गोष्टींतलें मर्म तुमच्या ध्यानांत आलें आहे काय ? आपल्या वंशजांपैकीं कोणीही बाह्य देशीं जाऊन परकी भूमि पादाक्रांत करूं नये अशी इच्छा अशोक राजानें मोठ्या निश्चयानें प्रकट केली होती. आह्मांस शहाणें करण्याच्या इच्छेनें शिक्षक पाठविण्याची तुमची इच्छा असेल तर त्यांनीं खुशाल येऊन आह्मांस मदत करावी; पण आमचे वाभाडे मात्र काढूं नयेत. हिंदूंवर प्रभुत्व गाजविण्यासाठीं या लोकांनीं काय ह्मणून यावें ? हिंदुलोकांनीं एखाद्या तरी राष्ट्रास कधीं तरी दुखविलें आहे काय ? त्यांच्या हातून दुसऱ्यांचें जें कांहीं बरें झालें तेवढेंच त्यांनीं केलें. त्यांनीं जगाला भौतिकशास्त्रें शिकविलीं, तत्त्वज्ञानाचें दान केलें, धर्म दिला आणि पृथ्वीवर रानटी लोकांस त्यांनीं संस्कृतीच्या मार्गांत आणून सोडलें. हिंदुस्थानांत प्रवास करणाऱ्या शेंकडों पाश्चात्य लोकांनीं लिहिलेले ग्रंथ पहा आणि त्यांतील गोष्टी वाचा. हिंदुलोकांनीं जगाचें असें कोणतें नुकसान केलें आहे कीं त्याचा हा मोबदला त्यांस मिळत आहे !

**प्रश्न**—मानवी संस्कृतीबद्दल वेदान्ताच्या काय कल्पना आहेत ?

**उत्तर**--तुह्मीं तत्त्ववेत्ते आहां. एखादा मनुष्य भिकारी असला आणि दुसऱ्या एखाद्याजवळ जर पोतेंभर सोन्याचीं नाणीं असलीं तरी मनुष्यप्राणी या दृष्टीनें त्या दोघांत कांहीं फरक आहे असें तुह्मांस खचीत वाटणार नाहीं. ही सारी यंत्रकला आणि हीं शास्त्रें यांची वास्तविक किंमत काय आहे ? ज्ञानाचा प्रसार करणें हा एकच उद्देश या कलांचा आणि शास्त्रांचा आहे. आपणांत कशाची तरी उणीव आहे असा भास प्रत्येक क्षणीं आपल्या चित्तांत जाणवत असतो. हा भास कां उत्पन्न होतो आणि तो नष्ट कसा करावा या प्रश्नाचें उत्तर तुह्मीं अद्याप दिलेलें नाहीं किंबहुना हे प्रश्न तुह्मीं अधिक तीव्र मात्र केले आहेत. चढाओढ दिवसेंदिवस अधिक तीव्र

होत चालली आहे. आपणाभोंवतीं दिसणाऱ्या या निसर्गाची तरी खरी किंमत काय आहे ? एखाद्या मनुष्यानें तारेच्या द्वारें विद्युत्प्रवाह इकडून तिकडे पोहोंचविला ह्मणजे त्याचीं स्मारकें उभारण्यास तुह्मी कां धडपडतां ? या गोष्टी निसर्ग अथवा प्रकृति रोज लक्षावधि वेळ करीत नाहींं काय ? ज्या गोष्टी आपण नवीन निर्माण केल्या असें तुह्मांस वाटतें, त्यांचें अस्तित्व प्रकृतीच्या राज्यांत अगोदरच सिद्ध असतें. मग या वस्तु मिळविण्याची धडपड तुह्मी कां करतां ? स्वतःची वाढ करण्यापलीकडे या धडपडीचा दुसरा कांहीं हेतु आहे काय ? विश्व हा एक मोठा तालीमखाना असून जीवात्मा त्यांत कसरत करीत आहे. ही कसरत पूर्ण झाली ह्मणजे आपण परमेश्वर बनतों. याकरितां परमेश्वर बनण्याच्या आपल्या या कार्यांत कोणत्या वस्तूचा किती उपयोग होतो, हें पाहूनच त्या वस्तूचें महत्त्व ठरविलें पाहिजे. प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं असणारें ईश्वरत्व व्यक्तदशेस आणणें याचें नांव संस्कृति.

**प्रश्न**—बौद्ध धर्मीयांत कांहीं जातिनिर्बंध आहेत काय ?

**उत्तर**—बौद्धलोकांनीं जातिनिर्बंध फारसे पाळले नाहींत. आजमितीस हिंदुस्थानांत बौद्धलोक फारच थोडे आहेत. भगवान् बुद्ध स्वतः समाजसुधारणा करणारे होते. तथापि बौद्धधर्मी देशांतही जातिभेद निर्माण करण्याचा यत्न अनेकवार झाला असल्याचें मला आढळून आलें. या यत्नांत त्यांस यश आलें नाहीं ही गोष्ट वेगळी.

भगवान् बुद्ध हे स्वतः संन्याशी होते. त्यांनीं स्वतःचा एक नवाच पंथ निर्माण केला. अशा प्रकारचे नवे नवे पंथ आजही निर्माण होत आहेत. बौद्धधर्माचें जें कांहीं स्वरूप आज दिसतें, तें मात्र भगवान् बुद्धानें निर्माण केलेलें नाहीं. समाजसुधारणा करणें हा बौद्धधर्माचा विशेष होता. ब्राह्मण आणि क्षत्रिय या दोन वर्णांनीं विद्यादानाचें कार्य केलें आहे. उपनिषद् ग्रंथ क्षत्रियांनीं निर्माण केले असून ब्राह्मणें वगैरे ग्रंथ ब्राह्मणांनीं निर्माण केलेले आहेत. हिंदुस्थानांतील बहुतेक अवतारी पुरुष क्षत्रियवर्णाचे होते. त्यांनीं विश्वव्यापी सनातनधर्माचा उपदेश केला. उलट पक्षीं बहुतेक ब्राह्मण अवतारी पुरुष अधिक कोत्या मार्गानें जाणारे होते. राम, कृष्ण आणि बुद्ध हे अवतार क्षत्रिय वर्गांत उत्पन्न झाले.

**प्रश्न**—पंथ, क्रियाकर्म आणि धार्मिक ग्रंथ हे मुक्तीच्या मार्गांत मदत करतात काय ?

**उत्तर**—मनुष्याला सम्यग्ज्ञान झालें ह्मणजे या साऱ्यांचा तो त्याग करतो. अखेरचें साध्य सिद्ध करण्याच्या मार्गांत क्रिया, कर्में आणि ग्रंथ इत्यादि साधनें जोंपर्यंत मदत करीत आहेत, तोंपर्यंत तीं ठीक आहेत. पण, हा कार्यभाग तीं करीनाशीं झालीं ह्मणजे त्यांत बदल करणें अवश्य आहे. जो कोणी ज्ञाता झाला असेल त्यानेंही अज्ञजनसमूहाच्या स्थितीकडे लक्ष्य देऊन त्यांचा बुद्धिभेद होऊं नये ह्मणून त्यांचा पुढाकार घेतला पाहिजे आणि योग्य मार्गानें त्यांस ज्ञानदान केलें पाहिजे.

**प्रश्न**—नीतिशास्त्र आणि व्यक्ति यांच्या परस्परसंबंधाबद्दल वेदान्ताचें काय मत आहे ?

**उत्तर**—जीवात्मा हा वस्तुतः केवलरूप आहे. आज जें व्यक्तित्व त्याच्या ठिकाणीं दिसत आहे, तें केवळ मायेमुळें आहे. तें खरें स्वरूप नसून केवळ दृश्यमात्र आहे. वस्तुतः सर्वविश्व एकरूप असतां मायेमुळें तें अनेकधा भासत आहे. मायेच्या राज्यांतही विविधता आहे. तथापि विविधतेंतही एकत्वाकडे जाण्याचा कल एकसारखा दिसत असतो. सर्व राष्ट्रांच्या नीतिग्रंथांतही हें तत्त्व तुह्मांस आढळून येईल. आपलें एकत्व शोधण्याचा यत्न प्रत्येक जीवात्मा करीत असतो. आणि ज्या मार्गानें हें साध्य सिद्ध होण्याकरितां तो धडपडत असतो, त्या मार्गाला आपण नीतिमार्ग ह्मणतों. याकरितां सदोदित नीतितत्त्वांचा अवलंब करणें आपणास अवश्य आहे.

**प्रश्न**—नीतिग्रंथांचा कल मुख्यत्वेंकरून व्यक्तीव्यक्तींतील संबंध निश्चित करण्याकडे नाहीं काय ?

**उत्तर**—होय; तो संबंध तेवढ्यापुरताच आहे. केवलरूपाचा मायेशीं कोणताही संबंध येत नाहीं.

**प्रश्न**—व्यक्ति केवलरूप आहे असें आपण ह्मणतां. आतां व्यक्ति ज्ञानवान् आहे काय, असा प्रश्न मला विचारावयाचा आहे.

**उत्तर**—व्यक्तदशेस येणें हेंच व्यक्तित्वाचें लक्षण आहे आणि त्या व्यक्तदशेंत प्रकाश प्राप्त होणें याला आपण ज्ञान असें ह्मणतों. केवलरूप हें

ज्ञानाच्या पलीकडचें रूप असल्यामुळें त्याच्या प्रकाशासंबंधीं बोलतांना ज्ञान हा शब्द वापरणें अयुक्त होईल.

**प्रश्न**—त्या प्रकाशांत ज्ञानाचा अंतर्भाव होतो काय ?

**उत्तर**—होय; एका अर्थी तो होतो असें ह्मणण्यास हरकत नाहीं. ज्याप्रमाणें सोन्याच्या एका तुकड्याचें रूपांतर अनेक प्रकारच्या नाण्यांत करतां येतें, त्याचप्रमाणें हें समजावें. ज्या स्थितींत केवलरूप अनेक प्रकारच्या विशिष्ट रूपांत विभागलें जाईल, ती विचारातीत स्थिति होय. त्या स्थितींत विचारक्षम आणि विचाराक्षम या दोन्ही स्थितींचा अंतर्भाव होईल. ज्ञान या शब्दानें आपण जितकें कांहीं ओळखतों तें सारें विचारातीत स्थितींतील मनुष्याला प्राप्त होतें. ‘ मला ज्ञान आहे ’ ही जाणीव अशा मनुष्याला उत्पन्न करून घ्यावयाची असली तर त्याला विचारक्षम स्थितींत ह्मणजे एक पायरी खालीं उतरावें लागतें. ज्ञानाची स्थिति ह्मणजे विचारक्षम स्थिति ही विचारातीत स्थितीहून एका पायरीनें खालीं आहे. विचारक्षम स्थिति ही मायेच्या हद्दींतील स्थिति असून विचारातीत स्थिति ही त्या हद्दीपलीकडील स्थिति आहे.

---

## नंबर २.

( बोस्टन् येथील ट्वेन्टियथ सेंच्युरी क्लबमध्यें. )

**प्रश्न**—वेदान्ताचा कांहीं प्रभाव महंमदी धर्मावर पडला होता काय ?

**उत्तर**—धर्माच्या बाबतींत पूर्ण स्वातंत्र्य असणें हें जें वेदान्तधर्माचें मुख्य मर्म त्याचा पगडा महंमदी धर्मावरही बसला आहे. इतर देशांतील महंमदी धर्माच्या स्वरूपाहून हिंदुस्थानांतील महंमदी धर्माचें स्वरूप अगदीं वेगळें आहे. बाहेर देशांतील महंमदानुयायी हिंदुस्थानांत येऊन स्वधर्मबांधवांस जेव्हां उपदेश करतात, तेव्हांच हिंदुस्थानांतील मुसलमान इतर धर्मियांशीं तंटाभांडण करण्यास उद्युक्त होतात.

**प्रश्न**—वेदान्ताचें जातिभेदाला आनुकूल्य आहे काय ?

**उत्तर**—वेदान्तधर्म आणि जातिभेदसंस्था हीं परस्परांस विरुद्ध आहेत. जातिभेदसंस्था ही केवळ सामाजिक बाब आहे. आमच्यांतील सर्व महापुरुषांनीं हिचें उच्चाटन करण्याचा यत्न केला आहे. बुद्धाच्या काला-

पासून तों आजतागायत अनेक पंथांनीं जातिभेदावर हल्ला केला आहे. पण त्याचा परिणाम मात्र जातिभेदाची चिकाटी अधिक होण्यांत झाला आहे. जातिभेदाची उत्पत्ति हिंदुस्थानांतील राजकीय संस्थां-पासून झाली आहे. तुमच्याकडे निरनिराळ्या धंदेवाल्यांचे जसे गिल्ड ( Guild ) अथवा संघ असतात, तसेच आमच्या इकडे जातिभेद निर्माण झाले आहेत. युरोपांतील व्यापाऱ्यांशीं चाललेल्या चढाओढीमुळें जातिभेदांचें जितकें उच्चाटन झालें आहे तितकें तें कोणत्याही प्रकारच्या उपदेशानें झालेलें नाहीं.

**प्रश्न**—श्रुतिग्रंथांचा विशेष काय ?

**उत्तर**—ते केवळ तत्त्वज्ञानाचें प्रतिपादन करतात, हा त्यांचा एक विशेष होय. सम्यग्ज्ञानासाठीं श्रुतींच्याही पलीकडे गेलें पाहिजे असें खुद्द श्रुतीच वारंवार सांगत आहेत. केवळ बाल्यावस्थेंतील मनाच्या समजुतीं-साठीं श्रुती लिहिल्या गेल्या आहेत आणि मन सुसंस्कृत झाल्यावर तुह्मी श्रुतींच्याही पलीकडे गेलें पाहिजे असें खुद्द श्रुतीच सांगतात.

**प्रश्न**—जीवात्मा हा अनंत कालचा सत्यपदार्थ आहे असें तुमचें मत आहे काय ?

**उत्तर**—मनुष्याच्या अंतर्गत भागांत जी विचारपरंपरा सुरू आहे, तिचें जें समवायी रूप तो जीवात्मा. या विचारपरंपरेंत प्रत्येक क्षणीं बदल होत असतो. याकरितां जीवात्मा हा अनंत कालचा सत्यपदार्थ आहे असें ह्मणणें योग्य नाहीं. विश्वाच्या एकंदर दृश्याभासापुरतें मात्र त्याचें सत्यत्व खरें आहे. विचार आणि स्मृति यांचें जें एकरूप तेंच जीवात्म्याचें स्वरूप. अशा स्थितींत त्याला सदैव सत्यरूप कसें ह्मणवेल ?

**प्रश्न**--हिंदुस्थानांतून बौद्धधर्म नष्ट कां झाला ?

**उत्तर**--हिंदुस्थानांतून बौद्धधर्म वास्तविक नष्ट झालेला नाहीं. बौद्ध-धर्माचें रूप मुख्यतः सामाजिक होतें. बुद्धकालापूर्वी यज्ञासाठीं आणि इतर कारणामुळें पशुहत्या फार मोठ्या प्रमाणावर होत असे. दारु आणि मांस यांचा उपयोग लोक मोठ्या प्रमाणांत करीत असत. बुद्धाच्या अनुशासना-मुळें दारु आणि मांस या दोहोंचाही बराचसा त्याग लोकांनीं केला आहे.

## नंबर ३.

( ब्रुक्लिन येथील ब्रुक्लिन एथिकल सोसायटीमध्यें. )

**प्रश्न**—जगांत दुःख आणि दुष्टपणा यांचें साम्राज्य असल्याचा अनुभव प्रत्यहीं येतो. अशा स्थितींत जगाच्या आनन्ददायी रूपाबद्दलचे जे आपले विचार आहेत, त्यांचा मेळ या वस्तुस्थितीशीं आपण कसा घालतां ?

**उत्तर**—जगांत दुष्टपणाचें अस्तित्व आहे असें कोणी प्रथम निर्विवाद सिद्ध करून दिलें, तरच या प्रश्नाचें उत्तर मला देतां येईल. जगांत दुःख आहे हें म्हणणेंच वेदान्तधर्माला कबूल नाहीं. सुखावांचून शुद्ध दुःखाचें अस्तित्व हेंच खऱ्या स्वरूपाचें दुःख आहे. ऐहिक दुःखामुळें मनुष्याचें मन मवाळ होत असेल, आणि त्याच्या ठिकाणीं औदार्यबुद्धि निपजत असेल, तर दुःख हें शत्रूसारखें लेखतां येणार नाहीं. त्याला दुःख हें नांव देणें वाजवी होणार नाहीं; कारण, त्याच्या अस्तित्वामुळें मनुष्य अनंतसुखाच्या मार्गाकडे जाऊं लागतो. याकरितां अशा प्रकारचीं दुःखें कदाचित् परमकल्याणरूपही असूं शकतील. कोणत्याही गोष्टीचा परिणाम अखेरच्या साध्याच्या मार्गावर काय होतो हें पाहिल्यावांचून ती बरी आहे कीं वाईट आहे, हें आपणास निश्चितपणें ठरवितां येणें शक्य नाहीं.

सैतानाची पूजा करणें हा हिंदुधर्माचा एक मार्ग नाहीं. सारी मानवजाती ही उच्चदशेच्या मार्गावर आरूढ झालेली आहे. यांतील सर्वांची स्थिति सारखीच असते असें नाहीं. यांतील प्रत्येकाची पायरी वेगवेगळी आहे. यामुळेंच यांतील कित्येक व्यक्ती दुसऱ्याहून अधिक श्रेष्ठ आणि अधिक पवित्र असतात. परिस्थिति कोणतीही असली तरी तींतही स्वतःची वाढ करण्याची संधी प्रत्येकाला मिळत असते. आपली जी कांहीं परिस्थिति आहे ती समूळ नष्ट करणें आपणास शक्य नाहीं. आपल्या ठिकाणीं जी जिवंत शक्ति वावरत आहे, ती नष्ट करणें आपणास शक्य नाहीं. तथापि तिच्या गतीची दिशा निरनिराळ्या प्रकारें बदलण्याची मुभा आपणा सर्वांस आहे.

**प्रश्न**—विश्वांतील वस्तुजात सत्यरूप आहे, ही केवळ आपल्या मनाचीच कल्पना नाहीं काय ?

**उत्तर**—बाह्य जग हें वस्तुरूप असून आपल्या मनाच्या हद्दीबाहेरही त्याला अस्तित्व आहे असें माझें मत आहे. जीवाच्या उत्क्रांतीच्या काय-

ह्यास अनुसरून सर्व जीव एकसारखे पुढें मागें सरत आहेत. जडवस्तूच्या उत्क्रांतीच्या कायद्याहून या कायद्याचें स्वरूप भिन्न आहे. जीवाची उत्क्रांति होत असावी असें जड वस्तूच्या उत्क्रांतीवरून निदर्शनास येतें. पण जीवाची उत्क्रांति कशी होते हें मात्र जडवस्तूच्या उत्क्रांतीवरून समजत नाहीं. आपल्या सांप्रतच्या परिस्थितींत आपण व्यक्तिविशिष्ट प्राणी आहोंत असें ह्मणणें चुकीचें आहे. याहून अधिक उच्च स्थिति प्राप्त करून घेतल्यानंतर मात्र आपणास विशिष्ट प्रकारचें व्यक्तिविशिष्टत्व प्राप्त होईल. आपल्या ठिकाणीं जें ईश्वरत्व आहे तें आपल्याद्वारें पूर्णपणें व्यक्त होत नाहीं. आपण उच्चतर स्थितींत गेल्यावर हें ईश्वरत्व प्रकट होण्याजोगें विशिष्टरूप आपणास प्राप्त होईल.

**प्रश्न**—एका आंधळ्या मुलासंबंधीं ख्रिस्ताला एक मोठें कोडें विचारण्यांत आलें होतें. त्या मुलाचें अंधत्व हा त्याच्या स्वतःच्याच पापाचा परिणाम होता कीं आईबापांच्या पापामुळें त्यास अंधत्व प्राप्त झालें होतें ?

**उत्तर**—या ठिकाणीं पापपुण्याच्या एकंदर स्वरूपाचा विचार आपणास कर्तव्य नाहीं. तथापि पूर्वजन्मार्जित पापामुळेंच त्या मुलास या जन्मीं अंधत्व प्राप्त झालें होतें, याबद्दल माझी पूर्ण खात्री आहे. पूर्वजन्म कबूल केल्यावांचून अशा प्रकारच्या प्रश्नांचीं समाधानकारक उत्तरें देणें शक्यच नाहीं, असें माझें मत आहे.

**प्रश्न**—मरणानंतर आपले आत्मे सुखाच्या स्थितींत प्रवेश करतात काय ?

**उत्तर**—मरण ह्मणजे फक्त परिस्थितीचा बदल. काल आणि स्थल या भावना तुमच्या ठिकाणीं आहेत. तुमच्या बाहेर या भावनांस स्वतंत्र अस्तित्व नाहीं. आपण आपला आयुष्यक्रम जों जों अधिक पवित्र आणि उच्चतर करीत जाऊं तों तों आपण परमेश्वराच्या अधिक सन्निध जाऊं. परमेश्वर हा अनंत आनंदाचा मध्यबिंदु आहे. याकरितां त्याच्या सन्निध जाण्याची खटपट करणें हेंच आपलें कर्तव्य आहे, इतकें समजलें ह्मणजे पुरे.

नंबर ४.

**प्रश्न**—जीवात्मा पुन्हां जन्म घेतो ही उपपत्ति हिंदूंनीं कशी काढली ?

**उत्तर**--शक्तीचें केंद्रीकरण होऊन ती गुप्तरूपानें राहते अशा प्रकारची जी आधिभौतिक शास्त्रज्ञांची उपपत्ति आहे, त्याच स्वरूपाची हिंदूंची ही उपपत्ति आहे. आमच्या देशांत हिचा प्रथम जन्म झाला. कोणतीही वस्तु उत्पन्न होते असें आमच्या तत्त्वज्ञांनीं केव्हांही मानलें नाहीं. कारण, 'उत्पन्न होणें' या शब्दांत केवळ अभावापासून कांहीं तरी भावरूप उत्पत्ति होते असा ध्वनि निघतो. ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे. सर्वथा नवीन असें कांहींच उत्पन्न होत नाहीं. ज्याप्रमाणें कालाला आरंभ नाहीं, त्याचप्रमाणें उत्पत्तीलाही आरंभ नाहीं. परमेश्वर आणि सृष्टि ह्या दोन रेषा अनादि आणि अनंतरूपाच्या आहेत. तसेंच त्या समांतरही नाहींत. सृष्टि पूर्वी होती, सध्यां आहे आणि पुढेंही असणार अशी आमची सृष्टीबद्दलची उपपत्ती आहे. आपण ज्याला शासन असें ह्मणतों, त्या क्रियेचें खरें स्वरूप केवळ प्रतिक्रियारूप आहे. आपण जी क्रिया केलेली असते तीमुळें शासनाच्या रूपानें प्रतिक्रिया उत्पन्न झालेली असते. हिंदुस्थानापासून कोणता एखादा धडा पाश्चात्यांस शिकावयाचा असेल, तर तो परमतसहिष्णुता हाच होय. सर्व धर्मांचीं मूलतत्त्वें एकच असल्यामुळें सर्वच धर्म चांगले आहेत असें आमचें मत आहे.

**प्रश्न**—हिंदुस्थानांतील स्त्रिया हल्लींहून अधिक उच्चस्थितींत कां नाहींत

**उत्तर**—रानटी लोकांच्या स्वाऱ्या निरनिराळ्या काळीं हिंदुस्थानावर झाल्या, हेंच या स्थितीचें मुख्य कारण होय. तसेंच अंशतः खुद्द हिंदी लोकही या स्थितीबद्दल जबाबदार आहेत.

**प्रश्न**—हिंदुधर्मांतील होम, हवन आणि इतर आचार यांचा प्रवेश तुह्मी या देशांत ( अमेरिकेंत ) करणार काय ?

**उत्तर**—माझें काम फक्त तत्त्वज्ञान सांगण्याचें आहे.

**प्रश्न**—नरक, अग्नि इत्यादि वस्तूंचें अस्तित्व आहे, या समजुतीमुळें मनुष्याच्या मनांत एक प्रकारची भीति असते. ही त्याची भीति काढून टाकली तर त्याला ताब्यांत ठेवणें अशक्य होईल असें आपणास वाटत नाहीं काय ?

**उत्तर**—नाहीं; उलट पक्षीं भीतीपेक्षां प्रेम आणि आशा यांच्या द्वारें मनुष्यस्वभावांत अधिक सुधारणा करतां येईल असें मला वाटतें.

---

## नंबर ५.

**प्रश्न**—आपण गुरु कोणाला ह्मणावें ?

**उत्तर**—जो तुमचें भूत आणि भविष्य कथन करील, तो तुमचा गुरु होय.

**प्रश्न**—आमच्या ठिकाणीं भक्ति कशी उत्पन्न होईल ?

**उत्तर**—तुमच्या ठिकाणीं भक्तीचें वास्तव्य मूळचेंच आहे. कामिनी-कांचनाच्या लोभामुळें त्यावर फक्त पडदा पडला आहे. हा पडदा दूर झाला म्हणजे भक्ति आपोआप प्रकट होईल.

**प्रश्न**—आपण स्वावलंबी व्हावें असें जें वारंवार सांगण्यांत येतें त्याचा खरा अर्थ काय ?

**उत्तर**—या ठिकाणीं 'स्व' या शब्दाचा अर्थ आपलें जें अनंतरूप तें असा आहे; तथापि आपलें जें स्वरूप अनंत नाहीं, त्याचाही अवलंब केल्यानें हळूहळू आपण योग्य साध्याकडे जाऊं. आपलें वैय्यक्तिक आत्मरूप हेंसुद्धां वास्तविक अनंतरूपच आहे. आपण वैय्यक्तिक आहों असा भ्रम त्याला झाला आहे, इतकेंच.

**प्रश्न**—एकात्मता हें जर एकच खरें रूप आहे, तर ज्या द्वैताचा अनुभव प्रत्येक क्षणीं सर्वांस येत असतो, त्याची उत्पत्ति कशी झाली ?

**उत्तर**—केवल ज्ञान हें द्वैतरूपाचें नाहीं. ज्ञानाचें प्रत्यक्ष रूप हेंच द्वैत आहे. ज्ञान स्वतः निराळें असतें तर तें ज्ञात्यापासून वेगळें राहिलें असतें.

**प्रश्न**—आपल्या दानतींत एकतानता कशी आणतां येईल ?

**उत्तर**—ज्यांनीं आपली वाढ अशाप्रकारें करून घेतली आहे, अशा पुरुषांच्या संगतींत राहून.

**प्रश्न**—श्रुतींबद्दल आपली वर्तणूक कशा प्रकारची असावी ?

**उत्तर**—श्रुतींचे जे भाग आपल्या विवेकबुद्धीशीं सुसंगत आहेत, त्यांचें ग्रहण अवश्य करावें; आणि पुराणादि ग्रंथांतील मतें जोंपर्यंत श्रुतींशीं

विरोध करीत नाहींत, तोंपर्यंतच त्यांचें ग्रहण करावें. धर्मविषयक अनेक मतांची उत्पत्ति वेदकालानंतरची आहे. जगांत जितके धर्म आज उपलब्ध आहेत, त्या साऱ्यांची उत्पत्ति वेदापासूनच झाली आहे.

**प्रश्न**--चार युगांच्या रूपानें जे कालाचे विभाग करण्यांत आले आहेत, ते ज्योतिषशास्त्रास अनुसरून आहेत किंवा केवळ दडपशाईनें कांहीं तरी भाग पाडले आहेत ?

**उत्तर**--या विभागांचा नामनिर्देश श्रुतींत नाहीं. या कालगणनेची उत्पत्ति पौराणिक कालीं झालेली आहे; आणि पुराव्यावांचून पुराणांनीं ती घेतली आहे.

**प्रश्न**--विचार आणि शब्द यांतील संबंध आवश्यक स्वरूपाचा आणि अभेद्य आहे, कीं तो केवळ यदृच्छेनें घडणारा आणि परस्परांच्या सोयीमुळें उत्पन्न झाला आहे ?

**उत्तर**--हा प्रश्न अत्यंत वादग्रस्त आहे. विचार आणि शब्द यांत अभेद्य संबंध असावा असें दिसतें; तथापि आज अनेक भाषा ज्या अर्थी प्रत्यक्ष अस्तित्वांत आहेत, त्या अर्थी हा संबंध अगदींच अभेद्य नसावा असें वाटतें. यांत कांहीं गुप्त संबंध असेल, पण त्याचें स्वरूप अद्यापि इतकें अस्पष्ट आहे कीं तें जाणण्याचीं साधनें अद्यापि आपणास उपलब्ध झालेलीं नाहींत.

**प्रश्न**—देशांतल्या देशांत आपणास जें कांहीं कार्य करावयाचें आहे तें कोणत्या मुख्य तत्त्वांच्या आधारानें करावें ?

**उत्तर**—सर्व लोकांस प्रथम शरीर सुदृढ करण्यास आणि व्यवहारी बनण्यास शिकविलें पाहिजे. सिंहासारख्या निधड्या छातीचे असे दहाबारा लोकसुद्धां सारें जग जिंकूं शकतील. लक्षावधि मेंढरांच्यानें तें काम होणार नाहीं. दुसरें असें कीं एखादें आपलपोटेपणाचें ध्येय कितीही मोठें असलें तरी त्याच्या मागें धावूं नये, हाही धडा आपल्या लोकांस शिकविला पाहिजे.

यानंतर स्वामींजींनीं हिंदुदेवतांच्या ध्यानांत कशी अवनति झाली आहे याचेंही विवेचन केलें. भक्तिमार्ग आणि ज्ञानमार्ग यांतील भेद त्यांनीं दाखविला. ज्ञानमार्ग हा विशेषेंकरून आर्यांचा मार्ग होता; आणि या कारणासाठीं योग्य अधिकारी असल्याशिवाय इतरांस त्यांनीं ज्ञानमार्गाचा

उपदेश केला नाहीं. भक्तिमार्ग हा दक्षिणेंतील अनार्यवंशाचा मार्ग होता. या मार्गानें अधिकारी आणि अनधिकारी असा भेद केला नाहीं.

**प्रश्न**--हिंदुस्थानाच्या पुनरज्जीवनाच्या कार्यांत रामकृष्ण मिशन कोणतें काम करणार आहे ?

**उत्तर**—उत्तम दानतीचीं अशीं कांहीं माणसें या मठांतून बाहेर पडून धर्मतत्त्वांचा प्रसार साऱ्या जगभर करतील. यानंतर इतर मार्गांनींही पुनरुज्जीवनाचें कार्य सुरू होईल. ब्राह्मण, क्षत्रिय आणि वैश्य अशी तीन वर्णांची उत्पत्ति होण्यांत या कार्याची अखेर होईल. शूद्र वर्ण अस्तित्वांतून जाऊन त्यांचीं कामें यंत्रद्वारा होतील. हिंदुस्थानाला सांप्रत क्षत्रिय वर्णाची मोठी उणीव आहे.

**प्रश्न**—पुनर्जन्माच्या वेळीं मानवयोनींतून खालच्या एखाद्या योनींत परत जाणें शक्य आहे काय ?

**उत्तर**--होय; पुनर्जन्म कर्मांवर अवलंबून आहे. पशुस्वभावास अनुरूप अशाच प्रकारचा कर्मसंचय एखाद्यानें केला तर तो पशुयोनींत ओढला जावा यांत नवल नाहीं.

**प्रश्न**—आपल्या जडदेहांत कुंडलिनीचें अस्तित्व खरोखरच आहे काय ?

**उत्तर**—योगी लोक ज्यांना कमलें असें ह्मणतात, त्यांचें अस्तित्व मानवदेहांत खरोखर नसून यौगिक शक्तीमुळें तीं त्यांत उत्पन्न होतात, असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत.

**प्रश्न**—प्रतिमापूजनानें मुक्ति मिळणें शक्य आहे काय ?

**उत्तर**—केवळ प्रतिमापूजनांत मुक्ति देण्याचें सामर्थ्य नाहीं; तथापि तें परंपरेचें कारण होऊं शकेल. मुक्तीच्या मार्गांत मूर्तिपूजा मदत करूं शकेल. अद्वैतसिद्धांताच्या अनुभवानेंच मनुष्य पूर्णत्व पावूं शकतो; तथापि या मार्गाला लागण्याची पूर्वतयारी ह्मणून मूर्तिपूजा पुष्कळांस अवश्य असल्यामुळें तिचा त्याग करूं नये.

**प्रश्न**—आपल्या वागणुकीचें अत्युच्च ध्येय काय असावें ?

**उत्तर**—संन्यास.

**प्रश्न**—हिंदुस्थानाच्या अवनतीचें कोणतें बीज बौद्धधर्मानें पेरलें ?

**उत्तर**—प्रत्येक स्त्रीपुरुषाला संन्यासी अथवा संन्यासिनी बनविण्याचा यत्न बौद्धांनीं केला. प्रत्येक मनुष्य खरोखर त्यागी होईल अशी आशा करणें फुकट आहे. त्यांच्या या कृत्यामुळें बौद्ध भिक्षुक आणि भिक्षुकिणी हळूहळू वाममार्गाकडे प्रवृत्त होऊं लागल्या. त्याचप्रमाणें तिबेटी आणि इतर जंगली लोकांच्याही कित्येक चालीरीती धर्माच्या पांघरुणाखालीं त्यांच्यांत शिरूं लागल्या. तिबेट वगैरे भागांत बौद्धलोक धर्माचा उपदेश करण्यास जात असत. तेथें वस्ती केल्यानंतर तेथल्या मूळ लोकांच्या कांहीं घाणेरड्या चाली त्यांनीं उचलल्या; आणि हिंदुस्थानांत ते परत आले, तेव्हां त्या चालींचा प्रवेश त्यांनीं येथेंही करून दिला.

**प्रश्न**—माया अनाद्यनंत आहे काय ?

**उत्तर**—विश्वाच्या दृष्टीनें पाहतां माया अनादि आणि अनंत आहे; पण व्यक्तीच्या दृष्टीनें ती अनंत नाहीं.

**प्रश्न**—ब्रह्म आणि माया यांचा अनुभव एकाच वेळीं करून घेणें शक्य नाहीं. अशा स्थितींत यांपैकीं खरें कोणतें अथवा यांचा जन्यजनकभाव कसा आहे हें कसें ठरवितां येईल ?

**उत्तर**—हें फक्त आत्मानुभवानंतरच ठरवितां येईल. ज्याला ब्रह्मानुभव झाला असेल, त्याच्या दृष्टीनें माया नष्ट होईल. हा रज्जुसर्पन्याय आहे. दोरीच्या अस्तित्वाची खात्री झाली म्हणजे सर्पाच्या भ्रांतीचें निरसन त्याच क्षणीं होतें.

**प्रश्न**—माया म्हणजे काय ?

**उत्तर**—जें कांहीं अस्तित्वांत आहे तें वस्तुतः एकच आहे. त्याला जड अथवा चैतन्यरूप यांपैकीं कोणतेंही नांव दिलें तरी त्याचें रूप द्विधा होत नाहीं. अशा प्रकारच्या अस्तित्वाचें जड आणि सचेतन असें द्विधारूप एकाच वेळीं प्रतीतीस येणें अत्यंत कठिण किंबहुना अशक्य आहे. याचेंच नांव माया अथवा अज्ञान.

**प्रश्न**—मुक्ति म्हणजे काय ?

**उत्तर**—मुक्ति म्हणजे पूर्ण स्वातंत्र्य. सत् अथवा असत् यांपैकीं कोणत्याही कर्माचें बंधन नसणें म्हणजे मुक्ति. सांखळदंड सोन्याचा झाला तरी तो सांखळदंडच. लोखंडाच्या सांखळदंडाइतकाच तोही जाच करूं शकेल.

पायांत कांटा मोडला म्हणजे दुसरा कांटा आणून तो बाहेर काढावा आणि नंतर ते दोन्ही कांटे टाकून द्यावे, असें श्रीरामकृष्ण म्हणत असत. अशाच रीतीनें सत्कर्मांच्या योगानें असत्कर्मप्रवृत्तीचा उच्छेद करावा; पण हें कार्य झाल्यानंतर सत्कर्मप्रवृत्तीही जिंकली पाहिजे.

**प्रश्न**—परमेश्वराच्या कृपेशिवाय मुक्ति मिळणें शक्य आहे काय ?

**उत्तर**—परमेश्वराचा मुक्तीशीं कांहींच संबंध नाहीं. मुक्तीचें अस्तित्व तुमच्या ठिकाणीं मूळचेंच आहे.

**प्रश्न**—देहादि जड भागांतून जीवात्म्याची उत्पत्ति झालेली नाहीं असें ह्मणण्यास पुरावा काय ?

**उत्तर**—देह आणि मन इत्यादिकांपासून अहंकाराची उत्पत्ति झाली आहे. खरा जीवात्मा यांहून वेगळा आहे, ही गोष्ट अनुभवानेंच सिद्ध होणारी आहे.

**प्रश्न**—खरा ज्ञानी कोण आणि खरा भक्त कोण ?

**उत्तर**—ज्याच्या अंतःकरणांत नितांत प्रेम वास करीत आहे आणि बाह्य वस्तूंसंबंधीं ज्याची प्रत्यक्ष अद्वैतबुद्धि झाली आहे, तो खरा ज्ञानी होय; आणि विश्वात्म्याशीं जीवात्म्याची एकरूपता असल्याचा अनुभव ज्याला झाला आहे, आणि अशा रीतीनें ज्याला खऱ्या ज्ञानाचा लाभ झाला आहे व जो प्रत्येक वस्तूवर प्रेम करतो, तो खरा भक्त होय. भक्ति अथवा ज्ञान यांपैकीं कोणतीही एकच बाजू उचलून जो दुसरीचा निषेध करतो तो भक्त नव्हे आणि ज्ञानीही नव्हे. तो चोर असून लोकांस फसविण्याचा धंदा करतो, असें समजावें.

**प्रश्न**—मनुष्यानें ईश्वराची सेवा कां करावी ?

**उत्तर**—ईश्वराचें अस्तित्व तुह्मीं एकवार कबूल केलें कीं, त्याची सेवा करण्यास अनंत कारणें तुह्मांस आढळतील. परमेश्वराचें स्मरण हीच त्याची खरी सेवा आहे, असें धर्मग्रंथ सांगतात. ईश्वराला अस्तित्व आहे अशी तुमची खरोखर भावना असेल तर, तुमच्या आयुष्यक्रमांत तुह्मांस त्याचें स्मरण पदोपदीं झाल्यावांचून राहाणार नाहीं.

**प्रश्न**—अद्वैतवाद आणि मायावाद हे भिन्न आहेत काय ?

**उत्तर**—नाहीं; ते एकच आहेत. मायावादावांचून दुसऱ्या कोणत्याही प्रकारें अद्वैतवादाची सिद्धि होणेंच शक्य नाहीं.

**प्रश्न**—परमेश्वर अनंतरूप असतां अवताररूपानें तो सान्त होतो हें कसें ?

**उत्तर**—परमेश्वर अनंत आहे ही गोष्ट खरी; पण अनंत या शब्दानें तुमच्या अंतःकरणांत जो बोध होतो, त्या अर्थानें तो अनंत नाहीं. आत्यंतिक विस्ताराची जी जड कल्पना तुमच्या चित्तांत आहे, त्याच कल्पनेच्या अर्थानें तुम्हीं अनंत या शब्दाची योजना करीत असतां. जड विश्वाचा प्रचंड विस्तार आणि परमेश्वराचें अनंतत्व हीं दोन्ही परस्परांपासून वेगळीं आहेत; पण हीं एकच आहेत असा भ्रम तुमच्या चित्तांत असल्यामुळें या दोहोंच्या अर्थांचा घोटाळा तुह्मी करतां. परमेश्वर मानवरूपानें अवतरूं शकत नाहीं, त्या वेळीं अनंत विस्ताराचा एखादा जड पदार्थ लहानशा मर्यादेंत सामावूं शकत नाहीं, असा तुमच्या ह्मणण्याचा भावार्थ असतो. परमेश्वराच्या अनंतत्वाचा संबंध जडत्वाशीं बिलकुल नसतो. यामुळें तो मनुष्यरूपानें अवतरला तरी त्याच्या अनंतत्वास बाध येत नाहीं.

**प्रश्न**—" प्रथम सिद्ध व्हा आणि नंतर दुसऱ्यासाठीं कर्में करण्याचा अधिकार तुह्मांस प्राप्त झाला ह्मणजे कर्में करा " असें एक पक्ष ह्मणतो; आणि याच्या उलट "आरंभापासूनच परहितासाठीं कर्में करावीं," असें दुसरा पक्ष सांगतो. या दोन परस्परविरोधी मतांची एकवाक्यता कशी करतां येईल ?

**उत्तर**—या ठिकाणीं उपदेश आणि कर्म यांजबद्दल तुमच्या चित्तांत गोंधळ झाला आहे. उपदेश करणें अथवा परसेवा करणें हा कर्म या शब्दाचा अर्थ आहे. वास्तविक पाहतां दुसऱ्यास उपदेश करण्याचा अधिकार सिद्ध पुरुषावांचून दुसऱ्या कोणासही नाहीं; पण परसेवा करण्याचा अधिकार प्रत्येकास आहे; इतकेंच नव्हे तर जोंपर्यंत दुसऱ्याकडून आपण सेवा घेत आहों, तोंपर्यंत दुसऱ्यांची सेवा आपण करणें हें आपणास आवश्यकच आहे.

# पूर्व आणि पश्चिम.

## प्रकरण १ लें.

रुंद आणि खोल असा प्रवाह असलेल्या महानद्या दुथडी भरून चालल्या आहेत. या नद्यांच्या तटाकीं सुंदर उपवनें जागोजाग पसरलीं आहेत. आपल्या सौंदर्यानें तीं जणूं काय, नंदनवनाशीं स्पर्धा करूं पाहात आहेत. भूलोकावरील या नंदनवनाच्या मध्यभागीं संगमरवरी दगडांचे भव्य प्रासाद आकाशाशीं आपलीं मस्तकें भिडवूं पहात आहेत. यांजवरील नक्षी काम दृष्टीस पडतांच पहाणारा थक्क होऊन जातो. या प्रासादांच्या आजूबाजूस नजर फिरविली असतां लहानसहान झोंपडीं इकडेतिकडे विखुरलीं असल्याचें दिसून येतें. त्यांच्या त्या मातीच्या भिंतींना जागोजाग खिंडारें पडलीं आहेत. वरील आढीं चंद्रमौळी झालीं आहेत. त्यांतील बांबू मधून मधून प्रेक्षकाकडे डोकावून पाहात आहेत. या चंद्रमौळी झोंपड्यांतून वृद्ध आणि तरुण पुरुष इकडेतिकडे फिरतांना आढळतात. त्यांच्या आंगावर लंगोटीशिवाय दुसरें वस्त्र दिसत नाहीं. अन्नाच्या अभावीं त्यांच्या पाठी व पोटें हीं एकरूप झालेलीं आहेत. शेंकडों वर्षांच्या दारिद्र्याचा आणि हताशपणाचा पूर्ण ठसा त्यांच्या चेहऱ्यावर उमटलेला दिसत आहे. गायी, बैल, ह्मशी इत्यादि जनावरें जिकडेतिकडे संचार करीत आहेत. हाय ! हाय ! त्यांचेंही डोळे त्यांच्या धन्यांच्या डोळ्यांप्रमाणेंच तेजशून्य दिसत आहेत. धन्याप्रमाणेंच त्यांच्याही शरिराचीं हाडें स्पष्टपणें मोजतां येतात. एखाद्या गांवाच्या आजूबाजूस पाहिलें तर केरकचरा आणि घाण यांचे ढीग जागोजाग दिसून येतात. सध्यांच्या भरतभूमीचें हें चित्र आहे !

एका बाजूस उत्तुंग राजवाडे तर त्यांच्याच शेजारीं पडकींझडकीं झोंपडीं, एका बाजूस सुंदर देवालय आणि त्याच्या शेजारीं केरकचऱ्याचा प्रचंड ढीग ! एका बाजूस ओकारी येईपर्यंत जेवल्यामुळें ढेरपोट्या बनलेला आणि जरतारी कपडे आंगांत घालणारा लक्ष्मीपुत्र तर त्याच्याच बाजूस

फक्त लंगोटी घालून चालणारा आणि हाडांचीं काडें झालेला संन्यासी नजरेस पडतो. आमच्या भरतभूमींची सांप्रतची स्थिति अशी आहे!

प्लेग आणि महामारी यांच्या धडाक्यानें गांवेंचीं गांवें बेचिराख होत आहेत; विषारी ताप आमचीं काळजें पोखरून टाकीत आहे; दुष्काळ तर आमच्या पांचवीस पुजला आहे; कोणत्या ना कोणत्या भागांत दुष्काळाचें भेसूर तांडव नित्य सुरू आहे; आमची भूमि ही रोग आणि दुःख यांचें कुरुक्षेत्र बनून गेली आहे. जिकडेतिकडे स्मशानेंच स्मशानें आढळून येतात. या ठिकाणीं कित्येक भग्न हृदयांचीं हाडें पसरलीं आहेत आणि त्यांच्याच मध्यभागीं एखादा योगी गंभीर शांततेंत निमग्न होत्साता बसला आहे. मोक्षसाधनावांचून त्याला दुसरें कोणतेंच कर्तव्य दिसत नाहीं. एखादा युरोपीय फिरस्ता इकडे आला तर त्याच्या नजरेस हिंदुस्थानाचें असें चित्र दिसतें!

तीस कोट मनुष्यें निव्वळ बाजारबुणग्यांसारखीं इकडेतिकडे धांवत आहेत. त्यांचें मनुष्यत्व आतां फक्त त्यांच्या बाह्य आकारांतच उरलें आहे. स्वकीयांच्या आणि परकीयांच्या पायाखालीं कित्येक शतकें हीं माणसें तुडविलीं गेल्यामुळें त्यांचें खरें मनुष्यपण नष्ट झालें आहे. त्यांच्या खुद्द देशबांधवांनीं आणि धर्मबांधवांनींच ही स्थिति त्यांस आणली आहे. गुलामांच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें स्वतंत्रबुद्धीचा अभाव असतो, त्याचप्रमाणें यांच्याही ठिकाणीं स्वतंत्र विचारशक्तीचा अभाव असून ठरलेलीं कामें करावीं आणि निमूटपणें दुःखें भोगावीं, अशा स्थितींत त्यांचा काळ जात आहे. भविष्यकाळाबद्दल त्यांच्या चित्तांत कसलीही आशा नाहीं. आपला पूर्वेतिहास तीं विसरलीं आहेत आणि त्यांचा भविष्यकाळही फारसा मनोहर दिसत नाहीं. जीव आणि शरीर यांची संगति चालू क्षणापुरती तरी तुटूं नये एवढीच त्यांची इच्छा दिसते. गुलामांच्या वृत्तीस शोभणारा मत्सर त्यांच्या हृदयांत घर करून बसला आहे. आपल्या शेजाऱ्याचें बरें झालेलें त्यांस पहावत नाहीं. त्यांचीं हृदयें श्रद्धाशून्य झालीं आहेत. त्यांचा आत्मविश्वास मरून गेला आहे. लुच्चेगिरी, आणि विश्वासघात हे कोल्ह्यांचे गुण त्यांच्या आंगीं पूर्णपणें मुरले असून तींच त्यांच्या बचावाचीं शस्त्रें होत. हे लोक शुद्ध आपलपोटे आहेत. प्रसंगीं समर्थांच्या चरणाची धूळ चाटण्यासही हे कमी

करणार नाहींत. एका बाजूला इतक्या प्रतीचा नम्रपणा दाखवीत असतां आपणाहून अशक्त असणारांवर मर्मप्रहार करून त्यांचा जीव घेण्यासही ते मागेंपुढें पाहणार नाहींत. सडलेल्या प्रेतांत लक्षावधि किडे ज्याप्रमाणें बुजबुजत असतात, त्याचप्रमाणें भरतभूमीच्या देहावर तीस कोटी किडे बुजबुजले आहेत. एखाद्या परकीयाच्या नजरेनें दिसणारें आमचें चित्र अशा प्रकारचें आहे!

सत्तावारुणीचें आकंठ पान करून धुंद झालेले, विहित आणि अविहित यांचा विचार ज्यांच्या ठिकाणीं नष्ट झाला आहे असे, जंगली जनावरांप्रमाणें भयप्रद आणि कनककामिनींच्या मागें लागलेले, पावित्र्याची कल्पनाही ज्यांस शिवली नाहीं आणि गलिच्छपणांत जे सदा मुरलेले असे, जडवादाचे पूर्ण भक्त, जडवादाची आत्यंतिक उत्क्रांति हीच ज्यांची संस्कृति, परकीयांस लुबाडून स्वतःचीं घरें भरणारे, परलोकाबद्दलचा विचारही ज्यांच्या चित्तास शिवत नाहीं, देह हाच ज्यांचा आत्मा आहे आणि इंद्रियांचा संतोष करावयाचा हीच ज्यांची इतिकर्तव्यता आहे असे लोक कोणी असतील तर ते युरोपीयच आहेत. एखाद्या हिंदूच्या नजरेनें पाश्चात्यांचें चित्र अशा प्रकारचें असतें! पाश्चात्य लोक म्हणजे चालू काळचे असूरच आहेत असें त्यास वाटत असतें.

परस्परांबद्दल असणारी अपुरी माहिती अथवा पूर्ण अज्ञान आणि परस्परांबद्दल सद्विचाराचा अभाव यांजमुळें उभय पक्षीं अशा प्रकारचीं मतें प्रचलित आहेत. परकीय युरोपियन लोक हिंदुस्थानांत येतात, आणि शहरांतील अति स्वच्छ असणाऱ्या भागांतल्या टोलेजंग इमारतींत राहतात आणि तेथून ‘ नेटिव्ह ’ शहराच्या भागाची तुलना युरोपीय शहरांशीं करतात. त्यांच्याशीं ज्या हिंदी लोकांचा संबंध येतो ते लोक म्हटले म्हणजे बहुधा त्यांचे नोकर असावयाचे. आणि वास्तविक पाहतां हिंदुस्थानाइतकें दारिद्र्य आणि दुःख जगांत दुसऱ्या कोठेंही आढळावयाचें नाहीं. तसेंच आमच्या शहरांतून गलिच्छपणा सर्वत्र आढळतो हेंही खरें आहे. अशा प्रकारच्या घाणेरड्या परिस्थितींत, अशा प्रकारच्या गुलामगिरींत आणि अशा प्रकारच्या अवनतावस्थेंत एखाद्या तरी चांगल्या गुणाचा वास असूं शकेल ही गोष्ट बाहेरून आलेल्या युरोपियाच्या चित्तास शिवतसुद्धां नाहीं.

उलटपक्षीं विहिताविहिताचा विचार न करतां युरोपीय लोक हातीं पडेल तें भक्षण करीत असतात असें आपण पाहात असतों. त्यांच्या स्वच्छतेच्या कल्पना आमच्या कल्पनांहून भिन्न आहेत, असें आमच्या नजरेस येतें. त्यांच्यांत जातिभेदाला थारा नसून त्यांचीं स्त्रीपुरुषें एकत्र मिसळत असतात. दारु पिऊन व एकमेकांच्या हातांत हात घालून तीं नाचत असतात असें आपण पाहातों. या सर्व गोष्टींचें आपणास अत्यंत नवल वाटतें. अशा प्रकारच्या राष्ट्रांत चांगलें तें काय असणार, असा प्रश्न आपल्या मनांत साहाजिक उद्भवतो.

केवळ बाह्य दृष्टि असल्यामुळें दोन्ही पक्ष अशा प्रकारच्या चुका करीत असतात. दोहोंपैकीं एकाच्याही दृष्टीस खोलपणा नाहीं. बाह्य देखाव्याच्या आंतील वस्तुस्थिति काय आहे, हें जाणण्याची तीक्ष्ण दृष्टि दोघांसही नाहीं. परकीय लोकांस आपण म्लेच्छ समजतों आणि आपल्या समाजांत त्यांस आपण मिसळूं देत नाहीं. त्यांच्या बाजूनें तेही आपणास गुलाम समजून आपणासंबंधीं बोलतांना 'निगर' असा तुच्छतादर्शक शब्द वापरतात. उभयपक्षीं बाह्यैकदृष्टीमुळें अशा प्रकारच्या चुका होत असल्या तरी दोघांच्याही मतांत थोडा फार सत्यांश असला पाहिजे हेंही उघड आहे.

प्रत्येक मनुष्यांत कोणत्या ना कोणत्या विशेष कल्पनेचा वास असतो. आपण मनुष्याचें जें कांहीं बाह्यरूप पाहतों तें त्याच्या अंतर्गत सूक्ष्म भावनांचें दृश्यरूप होय. अमूर्त विचार ज्याप्रमाणें शब्दरूपानें मूर्तपणास येतात, त्याचप्रमाणें मनुष्याच्या अंतर्गत भावना त्याच्या एकंदर चालचलणुकीच्या रूपानें प्रत्यक्षत्वास येत असतात. जी गोष्ट एका व्यक्तीस लागू आहे, तीच साऱ्या राष्ट्रासही लागू आहे. व्यक्तीप्रमाणेंच राष्ट्रालाही विशिष्ट राष्ट्रीय कल्पना असतात. प्रत्येक राष्ट्राची ही विशिष्ट कल्पना जगांत आपल्यापरी काम करीत असते आणि जगाच्या अस्तित्वासाठीं तिची आवश्यकताही आहे. जगाच्या अस्तित्वासाठीं अशा प्रकारच्या कल्पनेची आवश्यकता ज्या दिवशीं नष्ट होईल, त्याच दिवशीं ती व्यक्ति अथवा तें राष्ट्र नाश पावेल. आपल्या हिंदुस्थानांत अनंत प्रकारचीं दुःखें, अठरा विसवे दारिद्र्य आणि आंतून व बाहेरून जुलूम, अशा प्रकारची स्थिति असतांही आपण अझून जगलों आहों याचें कारण हेंच आहे. जी राष्ट्रीय

सहन होत नसेल तर तुह्मींच दूर सरा. तुह्मां मूठभर लोकांच्या संतोषासाठीं दीर्घ काळपर्यंत सारें राष्ट्र तुमचा जाच सहन करील काय ? हा जाच सहनशीलतेची सारी मर्यादा आतां उल्लंघूं पहात आहे. तुमच्या साऱ्या चैनी जेथें यथेष्टपणें चालवितां येतील, असा दुसरा एखादा भाग आतां तुह्मीं शोधून काढा. हें विस्तीर्ण जग तुह्मांस अगदीं मोकळें आहे. पण, हा उपदेश तुह्मांस कसचा रुचणार ? ही गोष्ट करावयास लागणारें सामर्थ्य तरी तुह्मांपाशीं कोठें आहे ? तुह्मीं त्या वृद्ध शिवाचें अन्न खाऊन अशाच रीतीनें त्याच्याशीं दगलबाजी करणार! अशाच रीतीनें तुह्मी त्याचा उपहास करणार आणि परकीय देवतांचें स्तोम येथें माजवीत सुटणार! "आह्मी अत्यंत शुद्र आहों, आम्ही हलके आहों, आम्हीं अत्यंत अवनतावस्थेस पोहोंचलेले आहों, आमच्याजवळच्या सर्व चीजा सर्वथैव त्याज्य आहेत अशी बडबड माझे जे कोणी देशबांधव परकीयांसमोर करीत आहेत त्यांस मी इतकेंच ह्मणतों कीं तुमचें ह्मणणें कदाचित् खरेंही असेल. तुह्मीं सत्यवक्तेपणाचा तोरा ज्या अर्थी मिरवितां, त्याअर्थी तुमचें ह्मणणें आह्मी मान्य करतों. पण 'आह्मीं' या शब्दांत स्वतःबरोबर आमच्या साऱ्या राष्ट्रास ओढण्याचा यत्न तुह्मी कां करतां ? महाराज, आपल्यासारख्या सत्यवक्त्यांस असें करणें शोभतें काय ? आपणाबरोबर साऱ्या राष्ट्रासही वाईट ठरवावयाचें ही रीत कोठली ?

उत्तमोत्तम सद्गुणांवर कोणत्याही एकाच राष्ट्राचा हक्क नाहीं, ही गोष्ट आपण प्रथम लक्ष्यांत ठेविली पाहिजे. व्यक्तींत ज्याप्रमाणें सद्गुणदुर्गुणांची मिसळ सांपडते, त्याचप्रमाणें ही गोष्ट राष्ट्रांसही लागू आहे. एखाद्या राष्ट्रांत एखादा सद्गुण विशेषेंकरून आढळला, तर दुसऱ्यांत दुसरा एखादा सद्गुण परिणतावस्थेस गेल्याचें आढळून येईल.

आमच्या राष्ट्राचें अखेरचें साध्य मुक्ति हें आहे, त्याचप्रमाणें पाश्चात्यांचें अखेरचें साध्य धर्म हें आहे. आम्हांला मुख्यत्वेंकरून मुक्तीची लालसा असून त्यांना धर्म हवा आहे. या ठिकाणीं 'धर्म' हा शब्द मीमांसकांच्या अर्थानें योजिला आहे. धर्म म्हणजे काय ? ऐहिक आणि पारत्रिक सुख ज्याच्यायोगें साध्य होईल तो धर्म. कर्म हें अशा प्रकारच्या धर्माचें मुख्य अधिष्ठान आहे. रात्रंदिवस एकसारखें काबाडकष्ट करीत असावें आणि सुखाच्या मागें पळत सुटावें, हीं कर्में मनुष्याकडून हा धर्मच करवीत आहे.

मुक्ति ह्मणजे काय? ऐहिक सुखसुद्धां गुलामगिरीचाच एक भाग आहे, असें जी शिकविते ती मुक्ति. स्वर्गसुखही ऐहिक सुखाच्याच किंमतीचें आहे असें मुक्ति आम्हांस शिकविते. कारण, भूलोक काय अथवा स्वर्गलोक काय, प्रकृतीच्या कायद्याच्या पलीकडचे नाहींत. या दोघांसही प्रकृतीचा कायदा उल्लंघन करवत नाहीं. भूलोक आणि स्वर्गलोक यांत फरक ह्मटला तर तो इतकाच कीं, भूलोक लोखंडासारखा असून स्वर्गलोक सोन्यासारखा आहे. तसेंच सुख हें कोठेंही झालें तरी प्रकृतीच्या कायद्याच्या मर्यादेंत असल्यामुळें तें मरणास पात्र आहे; आणि याकरितां तें चिरकालीन् होऊं शकणार नाहीं. याकरितां मुक्त होण्यासाठींच मनुष्यमात्रानें धडपड केली पाहिजे; देहाच्या बंधनापलीकडे त्यांनीं गेलें पाहिजे; त्यांनीं गुलामगिरीचा त्याग केला पाहिजे. मोक्षाचा मार्ग फक्त हिंदुस्थानांतूनच जातो, दुसऱ्या कोठेंही त्याचें अस्तित्व नाहीं; याकरितांच मुक्तपुरुष दुसऱ्या कोठेंही नसून फक्त हिंदुस्थानांतूनच आढळून येतात असें ह्मणतात तें सर्वथैव खरें आहे. आतां भविष्यत् कालीं इतर देशांतही ते जन्मास येतील ही गोष्ट खरी. आणि या गोष्टीचा आह्मांस संतोष आहे. धर्म आणि मुक्ति यांची सांगड असण्याचा काळ हिंदुस्थानांत पूर्वी एकवार येऊन गेला. युधिष्ठिर, अर्जुन, दुर्योधन, भीष्म, कर्ण इत्यादि कर्मवीरांबरोबरच व्यास, शुक, जनक इत्यादि मुक्तात्मेही आढळून येत असत. बौद्धधर्माच्या उदयाबरोबर धर्ममार्गाचा सर्वथा लोप होत चालला आणि मोक्षमार्गच विहित वाटूं लागला. याच अर्थानें गयासुर ह्मणजे बुद्ध येथें अवतरून त्यानें जगाचा नाश करण्याचा यत्न केला, अशा वर्णनाचें रूपक अग्निपुराणांत आढळून येतें. त्यानें सर्व लोकांस मोक्षमार्गावर आरूढ केलें. शेवटीं देवांनीं सभा भरविली आणि कांहीं युक्तीनें त्याची ही चळवळ कायमची बंद पाडली. हें कसेंही झालें असलें तरी धर्माच्या अभावामुळें आमच्या राष्ट्रास उतरती कळा लागली ही गोष्ट मात्र खरी–सर्व राष्ट्र आज एकदम मोक्षाच्या मार्गास लागलें तर तें उत्तमच; तसें होणें ही गोष्ट फार चांगली आहे यांत संशय नाहीं; पण हें शक्य आहे काय ? इंद्रियजन्य सुखांचा आस्वाद घेतल्यावांचून संन्यस्तवृत्तीचा उदय होणें कधींच शक्य नाहीं. प्रथम या सुखांचा आस्वाद घ्या ह्मणजे तुह्मांस त्यागाचा मार्ग सांपडेल.

उलटपक्षीं सारें राष्ट्र आज जर संन्यासी होऊन बसलें तर त्याला जें कांहीं हवें आहे त्याची प्राप्ति तर त्यास होणार नाहींच, पण उलट त्याजवळ जें कांहीं आहे तें मात्र गमाऊन बसण्याचा संभव आहे. तेल आणि तूप हीं दोन्ही जाऊन नुसतें धुपाटणें मात्र हातीं उरेल. बौद्धधर्माची येथें पूर्ण भरभराट होती तेव्हां प्रत्येक मठांत हजारों संन्यासी राहत असत; आणि त्याच वेळीं आमच्या देशाच्या अवनतीस झपाट्यानें सुरवात झाली. बौद्ध, ख्रिस्तानुयायी, मुसलमान आणि जैन हे सर्वांस एकच कायदा सरसहा लागू करूं पाहतात; पण हें त्यांचें मोठें मूर्खपण आहे. असें करणें ही फार मोठी चूक आहे. शिक्षण, संवयी, चालीरीती, कायदे आणि बंधनें हीं प्रत्येक राष्ट्रास आणि प्रत्येक व्यक्तीस त्यांच्या स्वभावानुरूप वेगवेगळीं असलीं पाहिजेत. केवळ बळजबरीनें एकच कायदा सर्वांस सारखा लागू केला, तर त्याचा काय उपयोग ? " मोक्षाहून अधिक श्रेयस्कर असें दुसरें कांहीं नाहीं; याकरितां सर्वजण मोक्षाच्या मागें लागा असा उपदेश बौद्धांनीं केला; पण असें होणें शक्य तरी आहे काय, इतकाच माझा प्रश्न आहे. उलटपक्षीं आमच्या शास्त्रांनीं प्रत्येकास स्वतःच्या आश्रमधर्माप्रमाणें वागण्याची अनुज्ञा दिली आहे; आणि हें असेंच असलें पाहिजे. जो गृहस्थाश्रमी असेल त्यानें संन्यासधर्माकडे ढुंकूनही पाहूं नये असें आमचीं शास्त्रें सांगतात. ही आज्ञा सर्वथा योग्य आहे. हातभर उडी मारण्याचें सामर्थ्य ज्याला नाहीं, त्यानें एकाच उडींत समुद्रोल्लंघन करून लंकेंत उतरण्याचा यत्न करावा हें हास्यास्पद नाहीं काय ? हें युक्तीला तरी धरून आहे काय ? आपल्या कुटुंबाला पुरेसें अन्न घालण्याचें सामर्थ्यही तुह्मांस नाहीं. शेजारपाजारच्या दोन माणसांचे हातही तुमच्या घरीं कधीं भिजत नाहींत. चार लोकांच्या बरोबरीनें एखादें क्षुल्लकही सार्वजनिक काम धडपणें तुमच्यानें तडीस जात नाहीं. अशाप्रकारचे तुह्मी लोक मुक्तीच्या मागें धांवत असलेले पाहून एखाद्याला खरोखर हांसूंच लोटेल. धर्माहून मोक्ष अधिक श्रेयस्कर आहे यांत संशय नाहीं असें हिंदुशास्त्रेंही सांगतात; तथापि ' **स्वधर्मे निधनं श्रेयः** ' अशी त्यांची अनुज्ञा आहे हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. याच बाबींत बौद्धांच्या डोक्यांत घोंटाळा माजल्यामुळें त्यांनीं अवनतीचा मार्ग मात्र खुला करून दिला. कोणालाही दुखवावयाचें नाहीं हें तत्त्व खरें आहे. दुष्टांचा हल्लाही निमूट-

पणें सहन करावयाचा हें तत्त्वसुद्धां फार मोठें आहे यांत संशय नाहीं; पण तुम्ही गृहस्थाश्रमी असलां तर हल्लयास प्रतिहल्ला करणें तुम्हांस भाग आहे, अशी आमच्या शास्त्रांची अनुज्ञा आहे. अशा स्थितींत योग्य प्रत्युत्तर तुह्मीं न दिलें तर मात्र तुह्मीं मोठें पातक करतां असें आमच्या शास्त्राचें मत आहे. भगवान् मनु ह्मणतात, "कोणी तुमचा वध करावयास आला तर त्याला ठार मारण्यांत पातक नाहीं. तो ब्राह्मण असला तरी त्याचा वध करावा." ही गोष्ट अगदीं खरी आहे. हें तत्त्व विसरून चालणार नाहीं. जे शूर असतात तेच पृथ्वीवरील भोग भोगतात. याकरितां आपलें शौर्य प्रगट करा. परिस्थितीप्रमाणें योग्य तऱ्हेचें धैर्य प्रगट करून साम, दाम, दंड आणि भेद या चतुर्विध नीतिमार्गांनीं आपल्या शत्रूस पादाक्रांत करून पृथ्वीचे भोग भोगा; असें तुह्मीं केलें तरच तुह्मी खरे धार्मिक. उलटपक्षीं लोकांच्या लाथा खाऊन तुह्मी स्वस्थ बसलां तर तुमच्या जिण्यास धिक्कार असो, असेंच ह्मटलें पाहिजे. अशा स्थितींतलें तुमचें जीवित ह्मणजे या लोकींचा प्रत्यक्ष नरकवासच होय; आणि अशा मार्गानें चालणारास त्याची ऐहिक यात्रा संपल्यावरही त्यास नरकाचीच प्राप्ति व्हावयाची. माझे प्रिय धर्मबांधव हो, माझें तुह्मांस हेंच सांगणें आहे. यावरून तुह्मी उगीच एखाद्यास त्रास देत सुटावा अथवा कोणाचा छळ करावा, असा मात्र माझ्या ह्मणण्याचा आशय समजूं नका. लोकांचें बरें करण्याकरितां तुमच्यानें होईल ती खटपट तुह्मीं अवश्य करा; परंतु लोकांनीं तुमचें वांकडें केल्यास त्याला निमूटपणें मान वांकविणें हें मात्र पातक आहे. जो गृहस्थाश्रमधर्मी असेल त्यानें दुष्टाचा प्रतिकार जागच्या जागींच केला पाहिजे. प्रत्येक गृहस्थाश्रमी मनुष्यानें उत्साहपूर्वक मोठे श्रम करून धन संपादन केलें पाहिजे. अशा रीतीनें द्रव्यार्जन करून आपल्या कुटुंबास आणि आपल्या आप्तेष्टांस सुखासमाधानांत ठेवलें पाहिजे. तसेंच त्यानें शक्य तितका आपल्या द्रव्याचा व्यय पुण्यकर्मांतही केला पाहिजे. हें तुमच्यानें होत नसेल तर मनुष्य ह्मणविण्याचीही तुमची योग्यता नाहीं. ज्याला आपला आश्रमधर्म पाळवत नाहीं त्यानें मोक्षाची गोष्ट तोंडावाटे सुद्धां काढूं नये.

धर्मसंचय कर्मावर अवलंबून आहे, या तत्त्वाचा विचार आपण पूर्वी एकवार केलाच आहे. प्रत्येक कर्म उत्साहपूर्वक आणि सफाईनें पार पाडावयाचें असा खऱ्या धार्मिक मनुष्याचा स्वभाव असतो. ज्यांत कोणतेंही कर्म सांगितलें नाहीं असा वेदाचा भाग हा खरोखर वेदभागच नव्हे असें कांहीं मीमांसकांचें मत आहे.

'**आम्नायस्य क्रियार्थत्वादानर्थक्यमतदर्थानाम्**' असें श्रीजैमिनींचें एक सूत्र आहे. कर्ममार्ग सांगणें हा श्रुतींचा हेतु असल्यामुळें ज्या ठिकाणीं क्रिया सांगितली नाहीं, त्या ठिकाणीं वेदांचा हेतु निरर्थक होतो असा या सूत्राचा अर्थ आहे.

'ॐ या एकाच अक्षराच्या जपानें आणि त्याच्याच अर्थाच्या ध्यानानें सर्वार्थांची प्राप्ती होते. परमेश्वराच्या नामस्मरणानें सर्व पापांचें क्षालन होतें. 'परमेश्वराच्या इच्छेवर जो आपला सर्व भार सोंपवितो त्याला सर्व अर्थ प्राप्त होतात,' इत्यादि शास्त्रवचनें आहेत; आणि सत्पुरुषांनींही हेंच सांगितलें आहे हें खरें; पण आपणापैकीं हजारों लोक सर्व जन्मभर ॐ चा जप करीत असतात, परमेश्वराच्या नामस्मरणांत दंग असतात, आणि आपला सर्व भार त्याचे इच्छेवर टाकीत असतात; आणि असें असतांही याचा मोबदला त्यांना काय मिळतो ? या प्रश्नाचें उत्तर 'कांहीं नाहीं' असेंच दिलें पाहिजे. तर मग हीं शास्त्रवचनें खोटीं आहेत काय ? या वस्तुस्थितीचें कारण काय आहे? याचा चांगला विचार करून तें कारण प्रथम चांगलें समजाऊन घेतलें पाहिजे. कोणाचें ध्यान खरें असतें व त्याचा काय उपयोग होतो हें प्रथम पाहिलें पाहिजे. खरोखर परमेश्वराच्या इच्छेवरच ज्यांनीं आपला भार सर्वथा अंतःकरणपूर्वक सोंपविला आहे असे लोक कितीसे सांपडतील ? ज्यांच्या नामोच्चारांत वज्राघाताचें सामर्थ्य आहे असे लोक कितीसे आहेत? ज्याची चित्तशुद्धि झाली असेल तोच या गोष्टी करूं शकेल. कर्मावांचून चित्तशुद्धि होणें शक्य नाहीं, आणि चित्तशुद्धीवांचून धार्मिक बनणेंही शक्य नाहीं.

प्रत्येक व्यक्ति ह्मणजे मूलशक्तीच्या स्पष्टीकरणाचें एक साधन होय. आपणामध्यें पूर्व कर्मांच्या योगानें या शक्तीचा सांठा तयार झालेला असतो. आपण जन्मास येतों त्या वेळीं हा सर्व सांठा आपल्या बरोबरच आलेला

असतो. हा सर्व संचय फलाच्या रूपानें संपून जाईपर्यंत स्वस्थ बसणें अथवा कर्मत्याग करणें आपणापैकीं कोणास तरी शक्य आहे काय? आपल्या पूर्व सत्कर्मांचे अथवा दुष्कर्मांचे जे कांहीं बरेवाईट परिणाम तयार झाले असतील त्याचा उपभोग आनंदरूपानें अथवा दुःखरूपानें घेतल्यावांचून आपली सुटका होणें शक्य नाहीं. पूर्व कर्मांच्या परिपाकानुरूप जी प्रकृति आपणापैकीं प्रत्येकाच्या ठिकाणीं वास करीत आहे ती आपणास कर्म करावयास भाग पाडल्यावांचून राहणार नाहीं. '**यदहंकारमाश्रित्य न योत्स्य इति मन्यसे। मिथ्यैष व्यवसायस्ते प्रकृतिस्त्वां नियोक्ष्यति॥**' असें जें भगवान् श्रीकृष्णांनीं अर्जुनास ह्मटलें आहे तें आपणापैकीं प्रत्येकानें नित्य लक्षांत ठेविलें पाहिजे. याकरितां कर्म करणें जोंपर्यंत आपणास भाग आहे तोंपर्यंत दुष्कर्म आचरण्यापेक्षां सत्कर्म आचरून दुःखाचा निरास करणें व सुख भोगणें अधिक इष्ट नाहीं काय? जगांत चांगलें आणि वाईट असे दोन प्रकार आहेत. यांपैकीं चांगलें स्वीकारणें अधिक बरें असें श्रीरामप्रसाद या नांवाचे एक बंगाली साधू म्हणत असत.

आतां 'चांगलें' म्हणजे काय? याचाही विचार करणें अवश्य आहे. जो कोणी मोक्षाची इच्छा करतो त्याच्या दृष्टीनें चांगला असणारा मार्ग वेगळा आणि धर्मार्थी मनुष्याच्या दृष्टीनें चांगला मार्ग वेगळा असतो. भगवान् श्रीकृष्णांनीं गीतेंत याच महत्वाच्या मुद्याचें विवरण उत्तम रीतीनें केलें आहे. याच तत्त्वाच्या अनुरोधानें वर्णाश्रमधर्मांची स्थापना झाली असून याच तत्त्वावर स्वधर्माचीही उभारणी झाली आहे. '**निर्वैरः सर्वभूतानां मैत्रः करुण एव च। निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी।** ( गीता १२–१३ ) ज्याला कोणीही शत्रू नाहीं, जो सर्वांचा मित्र असून सर्वांबद्दल ज्याच्या हृदयांत करुणा आहे, ज्याच्या ठिकाणीं मी आणि माझें यांचा लोप झाला आहे, ज्याचा अहंकार नष्ट झाला आहे आणि सुखदुःखांच्या ठिकाणीं ज्याची समवृत्ति झालेली आहे तो मोक्षाची इच्छा करणारा असून भगवंताचे हे शब्द फक्त त्यालाच लागू आहेत; आणि '**क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते। क्षुद्रं हृदयदौर्बल्यं त्यक्त्वोत्तिष्ठ परंतप।**' व त्याचप्रमाणें '**तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभस्व जित्वा शत्रून् भुंक्ष्व राज्यं समृद्धम्। मयैवैते निहताः पूर्वमेव निमित्तमात्रम् भव**

सव्यसाचिन्।" इत्यादि भगवंताचा गीतेंतील उपदेश धर्मार्थी मनुष्याकरितां आहे. धर्मसाधनाचा खरा मार्ग कोणता याचा उपदेश भगवंतांनीं अशा प्रकारें केला आहे. आतां कर्म म्हटलें म्हणजे त्यांत बरें आणि वाईट या दोहोंचीही सरमिसळ असावयाची हेंही खरें असून प्रत्येक कर्म करणारास कमी अधिक प्रमाणानें पापाचा अधिकारी व्हावें लागतें हेंही खरें आहे; पण असें असलें म्हणून काय झालें? कांहींच न करतां काष्ठलोष्ठवत् होऊन पडण्यापेक्षां थोडया पापाचाही स्वीकार करणें अधिक बरें नव्हे काय? अगदींच उपाशीं मरण्यापेक्षां थोडें कमी अन्न असलें तरी बरें नव्हे काय? कोणतेंही कर्म न करतां सारा जन्म आळसांत घालवून दगडासारखें होऊन पडण्यापेक्षां बऱ्यावाईटाची सरमिसळ असलेलें कर्म करणें अधिक बरें नाहीं काय? एखादा बैल साऱ्या जन्मांतही खोटें बोलत नाहीं अथवा एखादा धोंडा कधींच चोरी करीत नाहीं पण बैल तो बैल आणि धोंडा तो धोंडा हेंही खरें नाहीं काय? मनुष्यें चोऱ्या करतात आणि मनुष्येंच खोटेंही बोलतात, पण मनुष्येंच मोक्षही मिळवितात हें खरें नाहीं काय? सत्त्वगुणाचें प्राधान्य झालें ह्मणजे मनुष्य कर्म करीत नाहीं आणि अत्यंत गूढ अशा ध्यानांत मग्न होऊन बसतो. रजोगुणाचें आधिक्य असलें ह्मणजे तो बरीं आणि वाईट अशीं दोन्ही प्रकारचीं कर्में करितो आणि तमोगुणाचें आधिक्य झालें ह्मणजे तो स्तब्ध आणि निष्कर्म होऊन बसतो. आतां अशा रीतीनें स्तब्ध असलेल्या मनुष्याच्या ठिकाणीं सत्त्वगुणाचें आधिक्य आहे कीं तमोगुणांचें आधिक्य आहे हें आपणास केवळ बाह्यदृष्टया पाहून कसें ठरवितां येईल? सत्त्वगुणांचें आधिक्य असल्यामुळेंच आपण सर्व शांततेच्या स्थितीस प्राप्त झालों आहों काय? आपण सुखदुःखातीत झालों आहों काय? आणि यामुळेंच कर्मत्यागाचा अधिकार आपणास प्राप्त झाला आहे काय? अथवा तमोगुणाच्या आधिक्यामुळें आपण निर्जीव आणि धोंड्यासारखे स्तब्ध पडलेले आहों? काम करण्याचें सामर्थ्यच नष्ट झालेलें असल्यामुळें आपण निष्कर्म झालों आहों काय? असें झालें असेल तर हळू हळू सडण्याच्या मार्गास आपण लागलों आहों असें ह्मटलें पाहिजे. प्रिय बांधव हो, हे प्रश्न अत्यंत कळकळीनें आणि मनःपूर्वक मी आपणांस विचारीत आहें. हा विषय थट्टेचा नव्हे. या प्रश्नाचीं उत्तरें तुह्मी मला अवश्य दिलीं पाहिजेत. या प्रश्नांची चर्चा तुह्मी

आपल्या मनाशींच करा; ह्मणजे वस्तुस्थिति काय आहे याचा उलगडा तुह्मांस होईल; पण या प्रश्नांच्या उत्तरांसाठीं वाट पाहण्याची तरी आवश्यकता कोठें आहे ? झाडाची परीक्षा फळावरूनच होते. ज्याच्या ठिकाणीं सत्त्वगुणांचें प्राबल्य झालें आहे तो मनुष्य निष्कर्म आणि शांत असतो ही गोष्ट खरी; पण प्रचंड शक्तींच्या केंद्रीकरणामुळेंच ही शांतता आलेली असते. या बाह्य शांततेच्या पोटीं प्रचंड सामर्थ्य एकवटलेलें असतें. आपणा सामान्य मनुष्यांस आपल्या हस्तपादादि अवयवांनीं ज्याप्रमाणें कर्में करावीं लागतात त्याप्रमाणें सात्विक मनुष्यांस तीं अवयवांनीं करावीं लागत नाहींत. इंद्रियांचा उपयोग करण्याचें कारणच त्याला नसतें. ज्याच्या ठिकाणीं असा मूर्तिमंत सत्त्वगुण अधिष्ठित झालेला असतो तो खरा ब्राह्मण असून तो सर्वांची पूजा घेण्यास योग्य असतो. अशा ब्राह्मणाची प्रत्येकानें पूजा केली पाहिजे असें जणूकाय प्रकृतिमातेनें त्याच्या भालीं स्वहस्तें लिहिलेलें असतें. प्रकृतीचा हा लेख सर्व जगास स्पष्ट दिसतो; आणि प्रकृतिमातेची ही आज्ञा शिरसावंद्य मानून अशा सत्पुरुषाच्या पदकमलीं जग लोटांगण घालीत असतें. **'निर्वैरः सर्व भूतानां'** इत्यादि विशेषणें अशाच पुरुषाला मात्र पूर्णपणें लागू पडतात; आणि तुह्मी हेंही लक्षांत ठेवा कीं, जे लोक क्लीबत्वाची भाषा बोलतात, ८।१५ दिवस पोटाला न मिळाल्याप्रमाणें ज्यांचा आवाज अतिशय खोल गेला आहे, भिजलेल्या चिंधीप्रमाणें ज्यांचा ताठरपणा समूळ नष्ट झालेला आहे आणि कोणीं लत्ताप्रहार केला असतांही ज्यांच्या तोंडांतून चकार शब्दसुद्धां निघत नाहीं ते लोक तमोगुणांत बुडालेले आहेत. हीं चिन्हें मृत्यूचीं आहेत; हीं लक्षणें जिवंतपणाचीं नव्हत. यांत सत्वगुणाचा लवलेशही नाहीं. अशा लोकांचे अंतरात्मे सडण्याच्या मार्गास लागलेले आहेत असें पक्कें समजावें. अर्जुनही अशाच प्रकारच्या लोकांच्या पंक्तीस बसण्याच्या बेतांत आला होता; आणि याकरतांच भगवंतांनीं गीतारूपानें त्याला इतका विस्तृत उपदेश केला. अर्जुनाची स्थिति अशीच झाली नव्हती काय ? भगवंतांनीं पहिले उच्चारलेले शब्दच या गोष्टीची साक्ष देत आहेत. भगवान् ह्मणतात, **'क्लैब्यं मास्म गमः पार्थ नैतत्त्वय्युपपद्यते'** पार्था, असें क्लीबत्व धारण करूं नको. हें तुला शोभत नाहीं. पुढें अकराव्या अध्यायांत भगवान् ह्मणतात, ' **तस्मात्त्वमुत्तिष्ठ यशो लभ**

स्व' याकरितां तूं उठ; आणि यशाचा लाभ करून घे. जैन, बौद्ध आणि त्यांच्याच पंक्तीचे इतर मतवादी वगैरे लोकांची छाप आपणांवर पडल्यामुळें आपण या तमोगुणप्रधान लोकांच्या स्थितीस येऊन पोहोंचलों. गेलीं हजार वर्षें आपला सारा देश परमेश्वराच्या नामस्मरणानें दुमदुमून गेला आहे. हजार वर्षें तो एकसारखी प्रार्थना करीत आहे; आणि चमत्कार हा कीं, परमेश्वर आपले कान अगदीं बहिरे करून बसला आहे. पण त्यानें तरी आमची प्रार्थना कां ऐकावी ? एखाद्या मूर्खाच्या ओरडीकडे आपण सामान्य मनुष्येंसुद्धां जर दुर्लक्ष्य करतों तर परमेश्वरानें दुर्लक्ष्य केल्यास काय नवल ? आतां या दुर्गतिपंकांतून आपणास बाहेर पडावयाचें असेल तर '**क्लैब्यं मास्म गमः**' या भगवंताच्या उपदेशाकडे लक्ष्य देणें एवढाच मार्ग आपणास मोकळा आहे; असो.

आतां हें विषयांतर बाजूस ठेऊन आपण आपल्या चालू विषयाकडे वळूं. आपला चालू विषय पूर्व आणि पश्चिम असा आहे. येशू ख्रिस्त हा युरोपियनांचा देव असून तो काय उपदेश करीत आहे पहा.

"कोणाशींही शत्रुत्व करूं नका. जे तुम्हांला शाप देत असतील त्यांना तुह्मी आशीर्वाद द्या. कोणी तुमच्या उजव्या गालावर मारलें तर दुसरा गालही त्याच्यापुढें करा. ऐहिक कर्में टाकून देऊन परलोकसाधन करा. जगाचा शेवट जवळ आला आहे." आतां भगवान् श्रीकृष्ण गीतेंत काय ह्मणतात पहा. "सदोदित उत्साहपूर्वक कर्में करा. आपल्या शत्रूंस मारून राज्य भोगा." पण या दोन उपदेशांचे परिणाम दोन ठिकाणीं अगदीं वेगवेगळे झाले आहेत. ख्रिस्ताच्या मनांत जें करावयाचें होतें त्याच्या उलट युरोपांत घडून आलें आणि आमच्या देशांत भगवान् श्रीकृष्णांच्या उपदेशाचा परिणामही अगदीं उलट झाला. भगवान् येशू ख्रिस्ताच्या उपदेशाकडे युरोपीय लोकांनीं मनापासून कधींही लक्ष्य दिलें नाहीं. ते जन्मतःच कर्मपरायण आणि प्रकृतिस्वभावानें अत्यंत राजसी असल्यामुळें मोठा खटाटोप करून साऱ्या जगांत उपलब्ध होणारे चैनीचे पदार्थ मोठ्या अट्टाहासानें ते प्राप्त करून घेत आहेत आणि त्यांचा यथेच्छ उपभोगही घेत आहेत; आणि उलटपक्षीं आम्हीं कोंपऱ्यांत बसून राहिलों आहोंत. आह्मी रात्रंदिवस मृत्यूचें चिंतन करीत असून '**नलिनीदलगत जलमतितरलम्**

**तद्वज्जीवितमतिशय चपलम्**' हें गाणें गात आहों. सदोदित मृत्यूचें चिंतन करीत राहिल्यामुळें आमचें सारें रक्त थंड होऊन गेलें असून यमाच्या भीतीमुळें आमचे स्नायूही गार पडले आहेत. जणूं काय मृत्यूच्या त्या अधिपतीनें ही आमची प्रार्थना ऐकिली! आणि प्लेग, महामारी आणि दुसरे आपले हजारों दूत आपल्या देशांत पाठवून दिले! गीतेच्या उपदेशाप्रमाणें कोण वर्तत आहे? असें वर्तन करणारे लोक युरोपीयच होत; आणि भगवान् ख्रिस्ताचा उपदेश जर कोणाला पटला असेल तर तो आम्हां श्रीकृष्णाच्या वंशजांस होय. मोक्षाचा मार्ग प्रथम शोधून काढून तो सर्वांपुढें उघडपणें मांडण्याचें कार्य प्रथम श्रुतींनींच केलें हें नीट ध्यानांत ठेवा. बुद्ध, ख्रिस्त अथवा दुसरे कोणीही महात्मे झाले तरी त्यांच्या उपदेशाचा मूळ झरा श्रुतींतच आहे. बुद्ध आणि ख्रिस्त इत्यादि महात्मे संन्यासी असल्यामुळें ते अजातशत्रु होते आणि यामुळेंच सर्व भूतांच्या ठिकाणीं ते सकरुणही होते. त्यांच्या दृष्टीनें त्यांचा मार्ग उत्तम होता यांत शंका नाहीं. त्यांच्या स्थितींतल्या पुरुषास त्यांचा उपदेश योग्यच होता; पण साऱ्या जगाला या मोक्षमार्गावर आरूढ होण्याचा जुलूम करणें योग्य आहे काय? हा प्रयत्नच फुकट आहे. गाढवाला कितीही धुतलें आणि मर्दन केलें तरी त्याचा घोडा होईल काय? जुलमानें अथवा प्रार्थनेनें कोणाला मोक्षमार्गाला लावतां येईल काय? पण मोक्षमार्गावर आरूढ होण्याची ज्यांची इच्छा नाहीं अथवा तसें करण्यास जे योग्य नाहींत अशा प्रकारच्या लोकांची सोय बुद्धानें अथवा ख्रिस्तानें कशी केली आहे याचाही विचार केला पाहिजे. त्यांची सोय त्यांनीं कांहींच केली नाहीं. 'एक मोक्ष तरी मिळवा अथवा खुशाल मरून जा' असाच त्यांचा उपदेश आहे. मोक्ष अथवा संपूर्ण नाश या दोहोंशिवाय तिसरा मधला मार्ग त्यांनीं मुळींच दाखविलेला नाहीं. मोक्षाशिवाय इतर कशाचीही खटपट तुह्मी करूं लागलां तर बुद्ध अथवा ख्रिस्त तुमचे हातपाय ताबडतोब बांधून टाकतात. अल्प काळ तरी लौकिक सुखें कशीं भोगावीं याचा मार्ग त्यांनीं मुळींच दाखविलेला नाहीं. या मार्गावर कांटेरी कुंपणें घालून त्यांनीं तो पक्का बंद करून टाकिला आहे; एवढेंच नव्हे तर त्या मार्गास जाऊं पहाणाऱ्याच्या वाटेंत जागोजाग त्यांनीं खड्डेही खणून ठेविले आहेत. धर्म, अर्थ, काम

आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांची प्राप्ति करून घेण्याचा रस्ता फक्त श्रुतींनींच दाखविला आहे. बुद्धानें आमचें वाटोळें मात्र केलें. त्याचप्रमाणें ग्रीसचें आणि रोमचें ख्रिस्तानें वाटोळें केलें. यानंतर कालेंकरून युरोपीय लोकांच्या सुदैवानें प्रॉटेस्टंट अथवा ख्रिस्तीधर्मसुधारकांचा पंथ उदयास आला. या पंथानें पोपगुरूच्या उपदेशास धुडकाऊन लाविलें. या पंथाच्या उदयामुळें युरोपीय लोकांच्या छातीवरील मोठी धोंड उचलली गेली. हिंदुस्थानांत कुमारिल भट्टाचा जन्म होऊन त्यानें कर्ममार्गाचें पुनरुज्जीवन केलें आणि श्रीशंकराचार्य आणि श्रीरामानुज यांनीं सनातनधर्माचा पाया पक्का करून धर्म, अर्थ, काम आणि माक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचे परस्पर संबंध समतोल आणि समप्रमाण केले. या महापुरुषांच्या उद्योगामुळें आर्यभूमीचा गेलेला जीव पुन्हां परत येण्याच्या मार्गास लागला; पण हिंदुस्थान हा तीसकोटी जीवांचा देश असल्यामुळें या कार्याला थोडा अवधि लागत आहे. तीस कोटी लोकांस जागृति आणण्याचें कार्य एका दिवसांत होऊं शकेल काय ?

बौद्ध आणि वैदिक या दोन्ही धर्मांचें अतिम कार्य एकच आहे; पण तें साधण्यासाठीं बौद्धधर्मानें स्वीकारलेला मार्ग मात्र चुकीचा आहे. बौद्धधर्माचा मार्ग बरोबर असता तर आज आपली इतकी निराशाजनक दशा कां झाली असती ? केवळ कालावधीमुळें ही दुर्दशा घडून आली आहे असें ह्मणणें सयुक्तिक होणार नाहीं. कार्यकारणभावाचे कायदे उल्लंघन करून कोणतेंही कार्य काल करूं शकतो काय ?

यामुळें बौद्धधर्माचें साध्य वैदिक धर्मासारखेंच असलें तरी त्याचा मार्ग चुकीचा असल्यामुळें हिंदुस्थानास त्यानें अवनती मात्र प्राप्त करून दिली. माझ्या या ह्मणण्यामुळें माझ्या बौद्धबंधूंस कदाचित् राग येईल आणि ते आकाशपाताळ एक करून सोडतील हेंही खरें; पण असें म्हणण्यावांचून गत्यंतर काय आहे ? जें सत्य असेल तें बोललेंच पाहिजे; मग त्याचा परिणाम कांहींही झाला तरी त्याची पर्वा मी करीत नाहीं. वेदांनीं सांगितलेला जातिधर्माचा अथवा वर्णाश्रमधर्माचा मार्गच बरोबर आहे. तो प्रत्येक वर्णाचा स्वधर्म आहे. या आंखून दिलेल्या मार्गाप्रमाणें प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या परिस्थितीप्रमाणें आणि सामर्थ्यास अनुरूप अशीं कर्तव्यें लावून दिलीं आहेत. वैदिक धर्माचा आणि त्याच्या अनुयायी समाजाचा मूळ पाया

वर्णाश्रमधर्म हाच आहे. मी आपल्या स्वदेशबांधवांची आणि स्वधर्मबांधवांची मिथ्या स्तुति करीत आहें अशा भ्रमानें माझ्या कित्येक मित्रांस राग येईल हेंही मी जाणून आहें; पण प्रश्न इतकाच कीं अशा प्रकारची खोटी स्तुति करून मला काय फायदा आहे ? माझे बांधव मला कांहीं द्रव्यदान करीत आहेत काय ? अथवा दुसऱ्या कोणत्याही रीतीनें ते माझ्या उपयोगीं पडत आहेत काय ? उलट बाह्य देशांत भिक्षा मागून जो पैसा मी मिळवितों तो माझ्यापासून उपटण्याचा यत्न मात्र ते करीत आहेत. हिंदुस्थानांतील पोरकीं पोरें आणि दुष्काळग्रस्त लोक यांचीं पोटें माझ्या भिकेच्या पैशावर भरावीं अशी माझ्या देशबांधवांची खटपट आहे. आणि हा पैसा त्यांना मीं न दिला तर माझी नालस्ती करून मला शिव्या देण्यासही ते मागेंपुढें पाहात नाहींत. माझ्या सुशिक्षित बांधवांनो ! माझे देशबंधु अशा प्रकारचे लोक आहेत. त्यांची खोटी स्तुति करून अखेरीस माझ्या पदरीं काय पडणार हें मी पक्कें जाणून आहें. ते भ्रमिष्ट आहेत असें समजूनच त्यांच्यांशीं वागलें पाहिजे. एखाद्या वेड्याला आपण औषध पाजूं लागलों तर लाथांची आणि चावण्याची बक्षिशी घेण्याची तयारी आपण ठेविली पाहिजे. लाथा सोसूनही जो कोणी त्याच्या घशांत औषध ओतील तोच त्याचा खरा मित्र होय.

जातिधर्म अथवा स्वधर्म हाच मार्ग अंतिम साध्यास पोंचविण्यास युक्त आहे असें सर्वत्र आढळून येईल. जगांतील सर्व समाजांत हाच मार्ग कल्याणप्रद असून मुक्तिमार्गाची ही एक शिडी आहे. या स्वधर्माचा विसर आपणास पडल्यामुळेंच आपण सांप्रतच्या अवनतदशेस आलों आहों; पण स्वधर्म या शब्दाचा जो अर्थ सांप्रतच्या उच्च वर्णियांत रूढ झाला आहे तोही मूर्खपणाचा आहे; त्याच्यासंबंधीं सावधगिरी बाळगणें अवश्य आहे. जातिधर्माचें प्रत्येक अंग आपणास पूर्णपणें माहित आहे अशी उच्चवर्णीयांची समजूत आहे; पण वास्तविक पाहतां या ज्ञानाचा गंधही त्यांस नाहीं; आपल्या खेड्यांत चालू असलेल्या रीतीभाती हाच श्रुतीचा वर्णाश्रमधर्म आहे अशी आपली ठाम समजूत करून घेऊन आणि सर्व प्रकारचे हक्क बळकाऊन बसून हे उच्चवर्णीय लोक विनाशाच्या पंथास झपाट्यानें लागले आहेत. गुणकर्मविभागानें उत्पन्न होणाऱ्या जातीबद्दल हें माझें

ह्मणणें नसून जन्मसिद्ध जातिभेदाबद्दल मी बोलत आहें. जातिभेदाचा मूळ-पाया गुणकर्मविभाग हाच होय हें मी कबूल करतों. पण हे गुण दोनतीन पिढ्यांच्या अवधींत आनुवंशिक होऊन बसतात हेंही आपण लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. आपल्या सामाजिक जीवनाच्या अत्यंत नाजुक भागासच कीड लागत चालली आहे. तसें नसतें तर आपण सांप्रतच्या अवनतावस्थेस कां पोहोंचलों असतों ? **' संकरस्य च कर्ता स्यामुपहन्यामिमाः प्रजाः '** असें भगवंतांनीं गीतेंत ह्मटलें आहे. हा वर्णसंकर कसा घडून आला ? सांप्रत सर्व जातींची खिचडी बनली असून गुणकर्मविभाग संपूर्ण नाश पावला आहे. असें कां झालें ? आपल्या प्राचीन पूर्वजांचा गौर वर्ण नष्ट होऊन आपला सांप्रतचा काळा वर्ण त्या जागीं कोठून आला ? पूर्वीचा सत्त्वगुण नष्ट होऊन त्या जागीं थोड्याशा रजोगुणानें युक्त असा तमोगुण सर्वत्र कोठून पसरला ? या प्रश्नांचीं उत्तरें देणें ह्मणजे एक मोठें महाभारत सांगण्यासारखें आहे. याकरितां तीं देण्याचें काम मी पुढें एखाद्या प्रसंगीं करीन. सध्यां इतकेंच लक्ष्यांत ठेवा कीं, जातिधर्म बरोबर आणि मनःपूर्वक पाळला गेला तर राष्ट्राचा नाश कधींही होत नाहीं. हें खरें असेल तर आमची अवनती कशी झाली याचाही विचार केला पाहिजे. आपण सांप्रतच्या वाईट दशेस येऊन पोहोंचलों आहों यावरूनच जातिधर्माच्या आपल्या मूळ पायांत कांहीं घोंटाळा झाला असला पाहिजे हें उघड आहे. यावरून सांप्रत ज्याला आपण जातिधर्म असें नांव देतों तो खरा जातिधर्म नसून खऱ्या जातिधर्माहून तो अगदीं वेगळा आहे. प्रथम आपल्या शास्त्रांचा उत्तम अभ्यास करा. आपलीं शास्त्रें शब्दशः वाचून त्यांचा अर्थ नीट ध्यानीं आणा; ह्मणजे त्यांत सांगितलेल्या जातिधर्माचा समूळ नाश झाला आहे असें आपणास आढळून येईल. आपल्या साऱ्या देशांत त्या प्राचीन जातिधर्माचा मागमूसही सांप्रत कोठें उरलेला नाहीं. हा खरा जातिधर्म पुन्हां परत आणण्याचा खटाटोप तुह्मीं केला तर देशावर तो एक महदुपकार होईल यांत शंका नाहीं. मला जें कांहीं समजलें आहे तें तुह्मांपुढें स्पष्ट बोलून दाखविण्याचें कार्य मी करीत आहें. तुमच्या कोणत्याही मूर्खपणाच्या चालीरीतीची वाहवा करून तिला सशास्त्र स्पष्टीकरणाचा पाठिंबा देण्यास मी तयार नाहीं. तुह्मांला तारण्याचा आव घालून

तुलना करतां असें आढळून येईल कीं, इस्लामी धर्म जेथें जेथें गेला तेथें तेथें मूळच्या रहिवाशांस त्यानें कायम राखिलें. तीं मानवकुलें आजमितीसही कायम असून त्यांचें विशिष्ट राष्ट्रीयत्व आणि त्यांची भाषा हीं अद्यापिही कायम आहेत.

अशा प्रकारचा एकतरी विजय खिस्ती धर्मास दाखवितां येईल काय ? स्पेन देशांत राहणारे आरब अथवा अमेरिकेंतल्या मूळच्या जाती आज कुठें आहेत ? युरोपांत राहणाऱ्या यहुदी लोकांस खिस्ती लोक कशा रीतीनें वागवीत आहेत ? परोपकाराकरितां म्हणून ज्या कांहीं संस्था निर्माण झाल्या आहेत, त्यांखेरीज करून बाकीची कोणतीही चळवळ खिस्ती धर्मशास्त्रास अनुसरून चालू असल्याचें आढळून येत नाहीं. युरोपची जी कांहीं सुधारणा आज दिसून येत आहे ती सारी खिस्ती धर्माशीं झगडून झाली आहे. खिस्ती धर्मशास्त्र धाब्यावर बसवून आपलें पाऊल या सुधारणेनें पुढें टाकलें. खिस्ती धर्माची ज्योत पूर्वीइतकीच आजही युरोपांत प्रखर असती तर पाश्चूर, कोच इत्यादि अनेक शास्त्रज्ञांचा तिनें स्वाहा केला असता. डार्विन् सारख्या महापंडितास तिनें अग्निकाष्ठांचें बक्षिस दिलें असतें. संस्कृति आणि खिस्ती धर्म यांचा परस्पराशीं कोणत्याही प्रकारचा मेळ सध्यां युरोपांत नाहीं. खिस्ती धर्मरूपी आपल्या जुनाट शत्रूस धुळीस मिळवून व खिस्ती भटांचें उच्चाटन करून परोपकारी आणि शिक्षणविषयक संस्था आपल्या हातीं घेण्यास युरोपीय संस्कृति आतां सिद्ध झाली आहे. युरोपांतील खालचा वर्ग सध्यांप्रमाणें अज्ञानतिमिरांत बुडालेला नसता तर खिस्ती धर्माची इतिश्री होण्यास क्षणही लागता ना. खिस्ती धर्माचें हें जुनें खोड तेथून मुळापासून उपटलें गेलें असतें. आतां या हकीगतीशीं इस्लामी धर्माची तुलना करा. सर्व महंमदी देशांत समाजघटनेचा मूळ पाया इस्लामी धर्मावर पक्का उभारला गेला आहे. राज्यांतील सर्व अधिकारी वर्ग मुसलमानी मौलवींचा मोठा मान ठेवीत असतात आणि इतर धर्मांच्या पंडितांसही ते मानतात.

युरोपीय संस्कृतीची तुलना एखाद्या कापडाच्या तुकड्याशीं करावयाची झटली तर ती अशी करतां येईल. डोंगराळ मुलुख आणि समुद्रकांठ हा या वस्त्राचा माग; अनेक प्रकारांनीं संकीर्ण झालेला मानववंश हा या वस्त्राचा

कापूस; नित्य लढाया करणें आणि धार्मिक बाबतींत व स्वसंरक्षणार्थ नित्य तंटेभांडणें करणें हा या कपड्याचा उभा धागा होय. जो कोणी तलवार गाजवितो तो मोठा आणि जो हातीं तलवार धरीत नाहीं त्याचें स्वातंत्र्य गमावलें जाऊन कोणातरी लढवय्याच्या हातचें खेळणें त्याला होऊन बसावें लागतें. व्यापार हा या वस्त्राचा आडवा धागा आहे. या सुधारणेच्या प्रसाराचें मुख्य साधन तरवार हें असून धैर्य आणि बळ हीं उपसाधनें होत. तिचें अखेरचें साध्य ऐहिक व स्वर्लौकिक सुख हें आहे.

आतां आमची स्थिति कशी आहे हें पहा. आर्य लोक शांततेचे चाहते आहेत. शेतकी करावी आणि मुलांबाळांसह सुखासमाधानानें नांदावें इतकीच त्यांची इच्छा. या बाबतींत त्यांस कोणाकडून उपसर्ग लागला नाहीं ह्मणजे ते संतुष्ट आणि सुखी असतात. अशा प्रकारच्या आयुष्यक्रमांत त्यांना फुरसदीचा वेळ पुष्कळ सांपडतो आणि यामुळें विचार करण्याची आणि संस्कृतावस्थेस स्वतःस पात्र करून घेण्याची संधि त्यांस अधिक मिळते. आर्यांचा राजा जनक हा स्वहस्तें शेतकी करीत असे. त्याच्या काळीं त्याच्या इतकें सत्यवस्तूचें ज्ञान दुसऱ्या कोणासही नव्हतें. ऋषि, मुनी आणि योगी हे आह्मामध्यें आरंभापासूनच जन्मास आले आहेत. हें जग मायिक आहे ही गोष्ट आर्यांस प्रथमपासून समजली आहे. तुह्मी कितीही लुटालूट केलीत अथवा युद्धें केलीं तरी खरा आनंद फक्त शांतींतच आहे.खऱ्या आनंदाचा वास इंद्रियजन्य सुखांचा त्याग करूनच मिळणारा आहे. इंद्रियजन्य सुखाचीं साधनें वाढवून खऱ्या सुखाची प्राप्ति व्हावयाची नाहीं. खरें सुख तुह्मांस प्राप्त करून घ्यावयाचें असेल तर मन आणि बुद्धि यांस तुह्मी सुसंस्कृत केलें पाहिजे. या साऱ्या गोष्टींची ओळख आर्यांस प्रथमपासूनच पटली आहे. मोठमोठीं अरण्यें नाहींशीं करून ती जमीन शेतकीस योग्य अशी त्यांनीं तयार केली. यानंतर त्या स्वच्छ केलेल्या भूमीवर वैदिक स्थंडिलांची योजना त्यांनीं केली. भरतभूमीवरील निरभ्र आकाशांत यज्ञाचा पवित्र धूम भरून राहत होता. वातावरणांत शांति पसरली होती. वेदमंत्रांचे ध्वनि आणि प्रतिध्वनि चोहोंकडे दुमदुमून जात होते. पाळलेलीं आणि इतर जनावरें निर्भय चित्तानें इकडे तिकडे चरत होतीं. विद्या आणि धर्मसाधन यांच्या पायापाशीं तरवारीची योजना केली होती. धर्माचें, मनुष्याच्या जीविताचें आणि त्याच्या जना-

वरांचें रक्षण करावें इतकीच कामगिरी या तरवारीकडे सोंपविली होती. भयाच्या प्रसंगीं जो दुर्बळांचें रक्षण करील तोच शूर गणला जात होता. त्याला क्षत्रिय असें ह्मणत. नांगर आणि तलवार या दोहोंवर धर्माचें साम्राज्य होतें. या दोहोंचें संरक्षण धर्मच करीत असे. धर्म हाच येथला राजाधिराज होता. सर्व जग झोंपीं गेलें तरी हा धर्म सदोदित जागा असे. धर्माच्या छत्राखालीं सर्वांचें संरक्षण होऊन त्यांस पूर्ण स्वातंत्र्य मिळत असे.

आर्यांसंबंधीं युरोपीय पंडित काय म्हणतात पहा. आर्य लोक बाहेरून कोठून तरी आर्यावर्तांत आले; त्यांनीं तेथल्या मूळ रहिवाशांच्या जमिनी त्यांजपासून बुचाडून घेतल्या आणि मूळच्या रहिवाशांस नामशेष करून आर्यांनीं आपल्या वसाहती तेथें स्थापिल्या. या त्यांच्या मतांत मुळींच तथ्य नसून हें निव्वळ मूर्खपणाचें प्रदर्शन आहे. आमचे हिंदु पंडीतही असल्या वचनास माना डोलवितात हें खरोखरच मोठें आश्चर्य आहे. असल्या प्रकारच्या धडधडीत खोटया गोष्टी आमच्या मुलांबाळांच्या डोक्यांत नित्यशः कोंबल्या जात आहेत, ही स्थिति खरोखरच फार शोचनीय आहे.

मी स्वतः कांहीं मोठा पंडित नाहीं. मी विद्वान् आहें अशा प्रकारची घमेंड मी मुळींच बाळगीत नाहीं; पण जें कांहीं थोडेंसें ज्ञान मला आहे तें सारें एकवटून पॅरीस येथील महासभेंत या मतावर मी खरपूस टीका केली. पुष्कळ हिंदी आणि युरोपीय पंडितांशीं या विषयावर मी चर्चा केली आहे. मला वेळ मिळाला तर त्यांच्या या उपपत्तीविरुद्ध बलवत्तर प्रमाणें उभीं करण्याची माझी आकांक्षा आहे. माझ्या देशांतील पंडितांस माझी इतकीच विनंति आहे कीं, विद्वज्जन हो! आपले जुने ग्रंथ तुह्मीं स्वतः धुंडाळून पहा आणि जें काय ठरविणें असेल तें स्वतःच्या स्वतंत्र विचारानें ठरवा.

युरोपीय लोक कोणत्याही देशांत गेले ह्मणजे संधि सांपडतांच तेथील मूळच्या लोकांचा निःपात करून त्यांच्या भूमीवर 'सुखेनैव' नांदतात. हा त्यांचा नित्यक्रम असल्यामुळें आर्यांनींही तसेंच केलें असावें अशी त्यांची कल्पना होते. आपल्या स्वतःच्या देशांत राहून तेथल्या तेथेंच जे कोणी युरोपीय उपजीविका चालवितात, त्यांची गणना तेथील दुर्वृत्त लोकांत होते. यामुळें बाहेर कोठें तरी जाऊन तेथें लूटफाट करण्याची संधि ते पाहात

असतात. स्वतःच्या अशा प्रकारच्या वर्तनामुळें आर्यांबद्दलही त्यांची तशीच समजूत झाली असावी; पण या मताला कांहीं पुरावा आहे काय ? ही नुसतीच मनःकल्पना असेल तर ती तुह्मीं आपली आपल्यापाशींच ठेवा.

आर्यलोक हिंदुस्थानांत बाह्यदेशांहून आले असें कोणतें सूक्त तुह्मांला कोणत्या वेदांत सांपडलें ? हिंदुस्थानांतल्या मूळच्या रहिवाशांचा त्यांनीं निःपात केला ही कल्पना तुह्मी कोठून काढली ? असल्या प्रकारच्या मूर्खपणाच्या प्रलापांनीं तुह्मी काय मिळवूं पाहात आहां ? रामायणाचा तुह्मी केलेला अभ्यास सारा फुकट गेला आहे. असल्या प्रकारच्या निव्वळ दंतकथा त्यांतून तुह्मी कां निर्माण करूं पाहतां ?

रामायण ह्मणजे दक्षिण हिंदुस्थानांतील मूळच्या रानटी जातींवर आर्यांनीं मिळविलेला विजय असा अर्थ तुह्मी करतां. खरोखर हा फार खासा अर्थ आहे ! रामचंद्र हा आर्यवंशांतील एक सुसंस्कृत राजा आहे असें रामायणावरून दिसून येतें. तो लंकेच्या रावणाबरोबर युद्ध करतो. आतां रामायण तुह्मी नीटपणें वाचून पाहिल्यास रावण हा रामचंद्राहूनही अधिक सुसंस्कृत होता असें तुह्मांस आढळून येईल. अयोध्येच्या राजाहून लंकेचें राज्य अधिक सुसंघटित होतें असें दिसून येतें. आतां दक्षिण हिंदुस्थानांतील वानरांस रामानें केव्हां जिंकलें ? ते तर उलटपक्षीं रामचंद्राचे स्नेही आणि मदतगार होते. कोणत्या वालीचें अथवा कोणत्या गूहकाचें राज्य रामानें आपल्या राज्यास जोडलें, हें तुह्मी दाखवूं शकाल काय ?

आतां कित्येक प्रसंगीं आर्य आणि रानटी लोक यांत प्रसंगविशेषीं लढाया होत असाव्या हें अगदीं शक्य आहे. एखाददुसरा लबाड मुनी आपल्या पर्णकुटींत बसून आपल्या यज्ञस्थंडिलावर राक्षस धोंडे अथवा हाडें केव्हां फेंकतात याची वाट पहात बसला असावा हेंही शक्य आहे. अशा प्रकारें संधि सांपडतांच एखादा लबाड मुनी राजाकडे ओरड करीत असावा. शस्त्रास्त्रांनीं सिद्ध झालेले राजे आपल्या घोड्यावर बसून मुनीच्या मदतीस धांवत असत. अशा प्रकारच्या शस्त्रास्त्रांनीं सज्ज झालेल्या क्षत्रियांपुढें काठ्या आणि धोंडे असल्या प्रकारच्या आयुधांनीं सज्ज झालेल्या रानटी लोकांचा कितीसा टिकाव लागणार? अशा प्रकारच्या लढायांत रानटी लोक पुष्कळ मारले जात असत. अशा प्रकारच्या कांहीं गोष्टी घडल्या असतील, पण

एवढयावरून आर्यांनीं त्यांचा निःपात केला व त्यांच्या जमिनी हिरावून घेतल्या हें तुमचें ह्मणणें सिद्ध होतें काय ? अशा प्रकारच्या मताला रामायणांत काय पुरावा आहे ?

उष्ण हवेचा पुष्कळ लांबरुंद आणि सपाट असा प्रदेश व मधून मधून लांबरुंद व खोल नद्या अशा प्रकारच्या भूभागावर आर्यसंस्कृतीचा जन्म झाला. या संकृतिपटांत उच्चप्रतीचे सुधारलेले, अर्धवट सुधारलेले आणि रानटी असे सर्व प्रकारचे मानववंश आहेत. हे सर्व वंश बहुधा आर्य आहेत. वर्णाश्रमाचार हा या पटाचा आडवा धागा आहे. प्रकृतीशीं चढाओढ करून तिजवर जय मिळविणें हा या पटाचा उभा धागा आहे.

माझ्या युरोपीय मित्रांनो! कोणत्या देशाची स्थिति तुह्मी सुधारली असा प्रश्न मी तुम्हांस विचारूं काय ? ज्या ठिकाणीं तुम्हांस दुर्बल मानववंश आढळले त्या ठिकाणीं तुम्ही ते समूळ नाहींसे केले आहेत. त्यांच्या भूमीवर तुम्ही स्वतःची स्थापना केली आहे. आणि तीं बिचारीं मानवकुलें कायमचीं नाहींशीं झालीं आहेत. अमेरिका, आस्ट्रेलिया, न्यू झीलंड, पॅसिफिक समुद्रांतील बेटें आणि दक्षिण आफ्रिका येथील इतिहास काय सांगत आहे ? या देशांतल्या मूळच्या जाती आज कोठें आहेत ? त्या आज नामशेष झाल्या आहेत. जीं राष्ट्रें नामशेष करण्याचें सामर्थ्यच तुमच्यांत नव्हतें तेवढींच कायतीं अद्यापि जीव धरून आहेत.

हिंदुस्थानानें अशा प्रकारची वागणूक कधींही केली नाहीं. आर्य लोक दयार्द्र आणि उदार होते. त्यांचीं अंतःकरणें समुद्राप्रमाणें विस्तीर्ण आणि अमर्याद होतीं. त्यांच्या मेंदूंत सामान्य मानवी बुद्धीला अगम्य असें ज्ञान भरलें होतें. बाह्यतः दिसावयास गोड परंतु वस्तुतः पशूस साजणारे असे हे मार्ग त्यांच्या डोक्यांत कधीं शिरलेच नाहींत. आतां आपल्या देशांतील पढतमूर्खांसही मला एक प्रश्न विचारावयाचा आहे. तो हा कीं आर्यांनीं येथल्या मूळच्या रहिवाशांची कत्तल करून त्यांची भूमि बळकाविली असती तर वर्णाश्रम ही संस्था निर्माण झाली असती काय ?

स्वतःला राहण्यास मुबलक जागा सांपडावी ह्मणून सर्व जगाचा संहार करावा, असा युरोपचा हेतु आहे. उलटपक्षीं सर्वांस आपल्या बरोबरीचें करावें, किंबहुना आपणाहूनही अधिक श्रेष्ठ करावें हा आर्यांचा हेतु आहे.

युरोपीय संस्कृतीचें साधन तरवार हें आहे; आणि वर्णरचना हें आर्यांचें साधन आहे. वर्णरचना करणें ही संस्कृतीची पहिली पायरी होय. अशा रीतीनें प्रत्येकाला आपली विद्वत्ता आणि मनोभूमिकेची संस्कृति यांस अनुरूप असें अधिक वरवरचें स्थान मिळत जातें. बलिष्ठाचा जय आणि कनिष्ठाचा घात हा युरोपचा कायदा आहे. दुर्बलाचें संरक्षण हा भरतभूमीचा सामाजिक कायदा आहे.



# संभाषणें आणि बैठकी.



## १

## मृत्यूबद्दलचा विचार.

[ श्री. सुरेंद्रनाथसेन गुप्त यांनीं दिलेल्या आपल्या रोजनिशींतील उताऱ्यावरून. ]

निरनिराळ्या पाठशाळांतील माझ्या कित्येक मित्रांस बरोबर घेऊन स्वामीजींस भेटण्यासाठीं मी बेलूर मठांत गेलों. आह्मी स्वामीसभोंवतीं जाऊन बसलों. अनेक प्रकारच्या विषयांवर संभाषण सुरू होतें. कोणी कसाही प्रश्न विचारला तरी स्वामीजी त्याला ताबडतोब समाधानकारक उत्तर देत. इतक्यांत मध्येंच आह्मांकडे बोट करून ते ह्मणाले, " युरोपीय पद्धतीचें तत्वज्ञान आणि सूक्ष्मेंद्रियशास्त्र यांचा निरनिराळ्या मतांनुसार तुह्मीं सध्यां अभ्यास करीत आहां; तसेंच निरनिराळीं मानवकुलें आणि निरनिराळे देश यांजबद्दल नवी नवी माहितीही तुह्मांस मिळत आहे; पण आपल्या जीवितांतील अत्यंत उच्चप्रतीचें सत्य काय आहे हें तुह्मांस सांगतां येईल काय ? "

स्वामीजींचा प्रश्न ऐकून आह्मी मोठ्या विचारांत पडलों. त्यांच्या प्रश्नामुळें आमच्या चित्तांत चलबिचल झाली खरी, पण आह्मांकडून त्यांस काय पाहिजे आहे, तें आह्मांस समजेना; यामुळें अर्थातच आमच्यापैकीं कोणीही उत्तर दिलें नाहीं. तेव्हां आपल्या स्फूर्तिदायक वाणीनें स्वामीजी बोलूं लागले.

" हें पहा, आपणा सर्वांस एक दिवस मरावयाचें आहे ही गोष्ट तुह्मीं नित्य ध्यानांत ठेविली, तर तुमचा अंतरात्मा जागृत होईल. आपणास मरावयाचें आहे ही आठवण नित्य जागृत राहिली तरच तुमच्या क्षुद्र बुद्धीचा लय होईल. असें झालें तरच कोणतेंही काम तुह्मी चांगल्या व्यावहारिक रितीनें पार पाडूं शकाल. तुमचें शरीर आणि मन यांस नवजीवन प्राप्त होईल.

ज्या कोणाचा तुमच्याशीं संबंध येईल, त्यांनासुद्धां तुह्मांकडून नवजीवनाची प्राप्ति होईल. तुह्मांकडून नवें चैतन्य मिळत आहे असें तुमच्या स्नेह्यांसोबत्यांसही कळून येईल. ''

यानंतर माझ्याशीं त्यांचें पुढील संभाषण झालें.

**मी**—स्वामीजी, नित्य मृत्यूचा विचार करीत राहिल्यामुळें उदासवाणें वाटणार नाहीं काय ? त्यामुळें छातीवर निराशेचें दडपण पडणार नाहीं काय ?

**स्वामीजी**—अगदीं बरोबर; आरंभीं तुमचें हृदय व्याकुल होईल. नैराश्य आणि उदासीनता यांचे विचार तुमच्या चित्तांत आरंभीं घर करून राहतील; पण असें झालें तरी चिकाटी सोडूं नका. अशाच स्थितींत कित्येक दिवस लोटून जाऊंद्या. नंतर तुमच्या हृदयांत नवी शक्ति उत्पन्न होत आहे असें तुह्मांस दिसून येईल. तुमच्या चित्तांत सदोदित घोळणारा मृत्यूबद्दलचा विचार तुह्मांस नवजीवन देत असल्याचें दिसून येईल. ' हें सर्व जग पोकळ आहे, ' या वचनाची सत्यता तुमच्या मनश्चक्षूंपुढें सदोदित राहिल्यानें तुह्मी अधिक विचारशील व्हाल. अशा स्थितींत हा अभ्यास असाच चालूंद्या. दिवस, महिने आणि वर्षें निघून जाईपर्यंत स्वस्थ मनानें वाट पहात रहा, ह्मणजे तुमच्यांतील जीवनकला एखाद्या सिंहाचें बल घेऊन जागृत होत आहे, असा अनुभव तुह्मांस येईल. आज क्षुद्रशी भासणारी तुमची अंतर्गत शक्ति रूपांतर पावून ती प्रचंड रूप धारण करील. मृत्यूबद्दल तुह्मी सदोदित विचार करीत राहिलां तर माझ्या वचनाची सत्यता खडान् खडा तुह्मांस पटेल. आतां मी शब्दांनीं अधिक काय सांगूं ?

इतक्यांत माझा एक मित्र स्वामीजींची स्तुति आपले शेजाऱ्याजवळ हळूच करीत होता ती ऐकून स्वामीजी ह्मणाले,

'' माझी स्तुति करण्याचें कांहीं कारण नाहीं. आपल्या या जगांत स्तुति आणि निंदा यांस वास्तविक खरी किंमत कांहींच नाहीं. पाळण्यांत घालून झोंके दिल्याप्रमाणें स्तुति आणि निंदा या मनुष्याला झोंके मात्र देत असतात. माझीं स्तुतिस्तोत्रें ऐकतां ऐकतां मला आतां कंटाळा आला आहे. त्याचप्रमाणें निंदेच्या चिखलाचा वर्षावही मला खूप सोसावा लागला आहे; पण त्यांचा विचार करून फायदा काय ? स्तुति अथवा निंदा यांजकडे लक्ष्य

न देतां प्रत्येकानें आपलें कर्तव्य मात्र करावें. ऐहिक वस्तीचा अखेरचा क्षण प्राप्त झाला ह्मणजे स्तुति आणि निंदा या दोहोंचीही किंमत तुह्मांला, मला आणि इतरांना सारखीच. आपलें कर्तव्य बजवावें एवढयाचसाठीं आपणास हा जन्म मिळाला आहे. यमराजाचें बोलावणें आल्याबरोबर सर्वांचा त्याग करून निघून जाणें आपणास भाग आहे."

**मी**—स्वामीजी, आपण मनुष्यें किती क्षुद्र आहों !

**स्वामीजी**–बरोबर; अगदीं खरें. तुह्मी फार चांगले बोललांत. या अनंत विश्वांत कोट्यवधि सूर्य आणि त्यांच्या ग्रहमाला आहेत आणि केवढया अचिंत्य शक्तीच्या जोरानें त्यांस गति प्राप्त झाली आहे याचा विचार केला ह्मणजे आपण किती क्षुद्र आहों, हें आपणास ताबडतोब दिसून येईल. हें सारें विश्व जोरानें परिभ्रमण करीत करीत जणूंकाय एका अज्ञात केंद्राच्या पायाकडे धांव घेत आहे. अशा स्थितींत मनाचा क्षुद्रपणा आणि बुद्धीचे क्षुद्र विचार आपल्या ठिकाणीं घोळूं देणें युक्त आहे काय ? असल्या प्रकारच्या क्षुद्र वृत्तीस आपल्या चित्तांत जागाच सांपडूं नये. परस्पर द्वेष आणि तंटे भांडणें हीं उपस्थित करून आपल्या पदरीं काय पडणार आहे ? गडे हो, माझें ऐका. आपापल्या पाठशालांतील शिक्षणक्रम आटोपून तुह्मी बाहेर पडलां ह्मणजे सर्वस्वी परसेवेस स्वतःस अर्पण करा. तुह्मी असें केलें तर त्यायोगें ज्या सुखाची प्राप्ति तुह्मास होईल तें सुख पैशाच्या खजिन्यांनीं अथवा हिऱ्यामोत्यांच्या भांडारांनींही तुह्मांस प्राप्त होणार नाहीं, हें माझें वचन ध्यानीं धरा. परसेवेंत तुमची काया जसजशी झिजत जाईल तसतसें ज्ञानप्राप्तीच्या मार्गावर तुमचें पाऊल अधिकाधिक पुढें पडेल.

**मी**––पण स्वामीजी, आह्मीं अगदीं कंगाल स्थितींतले आहों.

**स्वामीजी**–असले कंगालपणाचे विचार अगदीं बाजूस ठेवा.तुह्मीं कोणत्या बाबतींत कंगाल आहां ? आपल्याजवळ गाडी आणि घोड्यांची जोडी नाहीं अथवा हांक मारतांच 'जी' ह्मणून हात जोडून चाकरांचा तांडा आपल्यासमोर उभा राहात नाहीं, याबद्दल तुह्मांला खरोखर कष्ट होतात काय ? असल्या गोष्टींचा विचार कशाला हवा ? दुसऱ्यांचें बरें व्हावें ह्मणून अंतःकरणपूर्वक तुह्मी अहर्निश झटलां, तर या चालू आयुष्यांत करावयाचें असें कांहींच बाकी उरलें नाहीं असें तुह्मांस आढळून येईल. हें कसें घडतें याची नीटशी

कल्पनाच तुह्मांस आज होत नाहीं. आपल्या या पवित्र जीवनौघापलीकडे चिरजीविताचें साम्राज्य पसरलें आहे. मधला मृत्यूचा पडदा एकवार दूर झाला ह्मणजे या साम्राज्याचे वारसदार तुह्मीच आहां असें तुह्मांस दिसून येईल.

**मी**—स्वामीमहाराज, आपणासमोर बसून आपल्या तोंडचे चैतन्यदायी शब्द ऐकतांना आह्मांस किती आनंद होतो ह्मणून सांगूं?

**स्वामीजी**—साऱ्या हिंदुस्थानभर कित्येक वर्षें मीं प्रवास केला. त्या वेळीं दयेचे केवळ सागर असे कितीतरी पुरुष मला भेटले. त्यांच्या पादारविंदाचा स्पर्श होतांच जणूंकाय सामर्थ्याचा प्रवाह माझ्या अंतःकरणांत वाहूं लागल्याचें माझ्या अनुभवास येई. त्यांच्या सान्निध्यामुळें जो शक्तिप्रवाह मला प्राप्त झाला आहे, त्याच्याच बळावर हे चार शब्द मी तुमच्यापाशीं बोलत आहें. मी स्वतः मोठा मनुष्य आहें असा विचार तुमच्या चित्तास शिवूंसुद्धां देऊं नका.

**मी**—पण स्वामीजी, आपण प्रत्यक्ष ईश्वरदर्शन घेतलें आहे असा आमचा समज आहे.

हे शब्द माझ्या मुखांतून बाहेर पडतात न पडतात तोंच स्वामींचे ते मोहक नेत्र अश्रूंनीं भरून आले! "अहाहा! अद्यापिही तो देखावा माझ्या मनःश्चक्षूंपुढें नुकताच घडल्यासारखा दिसत आहे." प्रेमरसानें ओथंबलेल्या आपल्या शांत आणि मधुर वाणीनें स्वामी ह्मणाले, "ज्ञानी ज्या ज्ञानाच्या प्राप्तीसाठीं धडपडत असतात, त्या ज्ञानाचें पूर्ण रूप त्याच कल्याणमय पायांपाशीं आहे. भक्त ज्या प्रेमासाठीं धडपडतात तो प्रेमरसाचा सागर त्याच पायांपाशीं आहे. आश्रय मागण्यासाठीं स्त्रीपुरुषांनीं त्या पायांवांचून दुसऱ्या कोठें जावें?" इतकें बोलून स्वामी थोडा वेळ स्तब्ध राहिले. नंतर ते पुन्हां बोलूं लागले, "हाय हाय! एकमेकांशीं तंटेभांडणें करण्यांत आपल्या आयुष्याचा व्यय मनुष्यें करतात हें त्यांचें केवढें मूर्खत्व! पण असें किती दिवस चालेल? आयुष्याच्या सायंकालीं सारीं आपल्या घरीं परत जातील, त्या वेळीं सारीं आपल्या मातेच्या आलिंगनांत मग्न होतील."

## २

## हिंदुस्थानांतून श्रद्धा गेली, ती परत मिळविली पाहिजे—खरे मर्द पाहिजेत—खरी सामाजिक सुधारणा.

[ श्री. सुरेंद्रनाथ सेन यांच्या खासगी रोजनिशीवरून. ]

शनिवार, ता० २२ जानेवारी १८९८.

आज भल्या पहांटेस मी स्वामीजींकडे गेलों. त्या वेळीं स्वामीजी कलकत्ता येथें रमाकांत बोस रस्त्यावर ५७ नंबरच्या घरीं बाळाराम बाबूकडे राहात होते. एवढया पहांटेससुद्धां श्रोत्यांचा जंगी थवा जमला होता. स्वामीजी ह्मणाले, " आज आपणांस श्रद्धेची फार जरूर आहे. आपल्या ठिकाणीं आत्मश्रद्धा हवी. आत्मश्रद्धा हेंच जिवंतपणाचें लक्षण असून दुर्बलता ह्मणजे मृत्यूच होय. आपण आत्मरूप असून स्वतंत्र आहों, आपणास मृत्यू स्पर्शही करावयाचा नाहीं, अशी श्रद्धा आपल्या ठिकाणीं नित्य जागृत राहिली पाहिजे. आपण स्वभावतःच पवित्र आहों. पाप करणें आपणास शक्य तरी आहे काय? छे, छे! ही गोष्ट सर्वथा अशक्य आहे. अशा प्रकारच्या आत्मश्रद्धेची आज आपणास फार जरूर आहे. अशी आत्मश्रद्धा आपणापाशीं असेल तर आपण मर्द बनूं; एवढेंच नव्हे तर आपण खचित परमेश्वर बनूं! ही श्रद्धा नष्ट झाल्यामुळेंच आपला देश असा रसातळास गेला आहे."

**प्रश्न**—स्वामीजी, ही श्रद्धा आपणांमधून कशी नष्ट झाली?

**स्वामीजी**—बाळपणापासून आपणाला मिळणारें सारें शिक्षण नकारात्मक असतें. आपल्याला मिळणाऱ्या शिक्षणामुळें विघटनेचें कार्य मात्र होतें. आह्मी ह्मणजे कःपदार्थ एवढेंच जाणावयास आह्मी शिकतों. आपल्या देशांत कधींकाळीं तरी महापुरुष होऊन गेले, ही जाणीव चालू शिक्षणक्रमांत आह्मांस केव्हांच प्राप्त होत नाहीं. विधायक असा कोणताही भाग आपल्या शिक्षणक्रमांत नाहीं. आपले हातपाय आपणच कसे चालवावे हें ज्ञानसुद्धां आह्मांस प्राप्त होत नाहीं! इंग्रज लोकांच्या पूर्वजांबद्दल खडानूखडा माहिती आह्मी मुखोद्गत करतों, पण आमच्या स्वतःच्या पूर्वजांबद्दल आह्मांस कांहींच माहिती नसते. आह्मी दुर्बलतेचा धडा मात्र पूर्णपणें शिकलों आहों. आह्मी जितराष्ट्रांच्या मालिकेमध्यें पडल्यामुळें आपण

दुर्बल आहों, असा आह्मी आपला समज करून घेतला आहे. कोणत्याही बाबतींत आपणास स्वातंत्र्य ह्मणून नाहींच असें आपणांस वाटतें. अशा स्थितींत आह्मी श्रद्धाहीन झालों तर त्यांत काय नवल ? गेलेली ही खरी श्रद्धा आपण पुन्हां परत मिळविली पाहिजे. आत्मविश्वास आपण पुन्हां जागृत केला पाहिजे. असें झालें तरच आपली धडगत आहे. आह्मांस आज जीं अनेक प्रकारचीं कोडीं येऊन पडलीं आहेत त्यांचा निकाल अशा स्थितींत आपला आपणच लावूं.

**प्रश्न**—ही गोष्ट घडणें कधीं काळीं तरी शक्य आहे काय? आपल्या समाजांत असंख्य व्यंगें आज आपणास दिसत आहेत. तीं सारीं नुसत्या आत्मश्रद्धेनें कशीं नाहींशीं होतील? याशिवाय आपल्या देशांत दुसऱ्याही अनेक उणीवा आहेत. या उणीवा नाहींशा करण्यासाठीं राष्ट्रीय सभा आणि दुसऱ्या कित्येक देशाभिमानी संस्था एकसारखी धडपड करीत आहेत. ब्रिटिश सरकाराकडे या संस्थांमार्फत अर्जांचीं भेंडोळींच्या भेंडोळीं रवाना होत आहेत. आमच्या गरजा ब्रिटिश सरकाराच्या कानांवर अधिक चांगल्या प्रकारें कशा घालतां येतील याचा विचार करणें हेंच आपलें मुख्य कर्तव्य आहे. येथें श्रद्धेचें काय काम आहे ?

**स्वामीजी**—गरज तुह्मांला कीं सरकाराला हें आधीं सांगा पाहूं ? गरज तुह्मांला असेल तर ती सरकार दूर करील कीं ती तुमची तुह्मांसच दूर करावी लागेल ?

**प्रश्न**—पण प्रजेच्या अडचणी दूर करणें हें राजाचें कर्तव्यच आहे. आपणाला जें कांहीं हवें असेल तें राजावांचून दुसऱ्या कोणाकडे मागावें ?

**स्वामीजी**—भिकाऱ्याची चौपदरी सदोदित रिकामी असते हें ध्यानीं असूंद्या. तुह्मांला जें काय हवें आहे तें सारें सरकारानें उद्यां दिलें अशी घटकाभर कल्पना केली तरी प्राप्त वस्तूची जतन करण्यास लागणारे मर्द कोठें आहेत ? यासाठीं असे मर्द प्रथम निर्माण करा. आपणाला मर्दांची जरूर आहे. आत्मश्रद्धेवांचून मर्द निपजणें शक्य आहे काय ?

**प्रश्न**—पण बहुतेक लोकांना आपलें हें मत पसंत पडणार नाहीं.

**स्वामीजी**—बहुतेक लोक ह्मणजे कोण ? मूर्ख आणि केवळ सामान्य बुद्धीचे असेच बहुतेक लोक असतात. ज्यांचें बहुमत ह्मणून तुह्मीं ग्राह्य

मानतां तें बहुमत ह्मणजे अशा लोकांचें मत. ज्यांना स्वतंत्र विचार करण्याजोगा मेंदू आहे असे लोक कोठेंही झाले तरी थोडेच असावयाचे. अशा प्रकारचे थोडेसे बुद्धिमान् लोकच प्रत्येक कार्यांत आणि प्रत्येक बाबींत खरे पुढारी असावयाचे. बाकीचा उरलेला बराचसा भाग यांच्या सूत्राप्रमाणें चालणारा असतो; आणि वास्तविक पाहतां असें असणें हेंच चांगलें. खऱ्या नेत्यांच्या मागें सामान्य जनता जात असली ह्मणजे सर्व कारभार सुरळित चालतो. कोणाच्याही पुढारीपणाखालीं मान वांकविण्यांत ज्यांना कमीपणा वाटतो असे लोक खरोखर निव्वळ मूर्ख असतात; ते आपल्या स्वतःच्याच बुद्धीनें चालून आपल्या पायावर धोंडा पाडून घेत असतात. तुह्मी सामाजिक सुधारणेच्या लांबलचक गप्पा मारीत नाहीं काय? पण वास्तविक तुह्मी काय करीत असतां? तुमच्या मतें विधवांचीं पुन्हां लग्नें झालीं अथवा स्त्रियांना स्वातंत्र्य मिळालें अथवा अशाच दुसऱ्या कांहीं गोष्टी झाल्या ह्मणजे तुमची समाजसुधारणा संपली असेंच कीं नाहीं? आणि या सुधारणासुद्धां कांहीं विशिष्ट जातींपुरत्याच करावयाच्या असा तुमचा बाणा आहे. अशा प्रकारच्या सुधारणा घडून आल्या तर थोड्याबहुत लोकांस त्यांचा थोडाबहुत फायदा होईल ही गोष्ट खरी; पण साऱ्या राष्ट्राला त्यापासून कितपतसा फायदा होणार आहे? याला खरी सुधारणा ह्मणावें कीं हा आपलपोटेपणाचाच एक प्रकार समजावा? कोणत्याही रीतीनें आपली स्वतःची पोळी चांगली भिजली ह्मणजे इतर लोक अर्धपोटे राहून व्याकुल झाले तरी हरकत नाहीं.

**प्रश्न**—तर मग कोणत्याही बाबींत समाजसुधारणा नको असेंच आपलें ह्मणणें आहे काय?

**स्वामीजी**—असें कोण ह्मणतो? समाजसुधारणेची जरूर आहे ही गोष्ट खरी; पण ज्याला तुह्मी समाजसुधारणा हें नांव देतां, त्या गोष्टीशीं सामान्य आणि कंगाल जनतेचा कांहींच संबंध येत नाहीं. ती सारी सुधारणा त्यांच्यांत अगोदरच झालेली आहे. त्यांच्यांत पुनर्विवाह होतात. त्यांच्या स्त्रिया स्वतंत्र असतात. ज्या गोष्टी हव्या ह्मणून तुह्मी ओरड करतां त्या त्यांजपाशीं अगोदरच आहेत. यामुळें त्यांच्या दृष्टीनें समाजसुधारणेच्या बाबींत या गोष्टी येतच नाहींत. आपण श्रद्धाहीन झाल्यामुळें अनेक पातकांचे धनी आपण झालों आहों. श्रद्धाहीनतेमुळें अनेक अरिष्टें आपल्या समाजांत नवीं नवीं

उत्पन्न होत आहेत. रोगाचें मूळ खणून काढणें हाच माझ्या मतें उत्तम उपाय आहे. रोगाला कांहीं वेळ दबवून ठेवणें हा प्रकृति सुधारण्याचा मार्ग नाहीं. आपणाला अनेक बाबींत सुधारणा हवी आहे यांत संशय नाहीं. ही नाकबूल करण्याइतका मूर्ख कोण आहे? उदाहरणार्थ परस्पर जातींत लग्न-संबंध झाले तर ते आह्मांस हवे आहेत. कारण, अशा संबंधांच्या अभावीं दिवसेंदिवस आपली शारीरिक हानी होत आह.

त्या दिवशीं सूर्यग्रहण होतें. तो प्रश्न विचारणारा गृहस्थ स्वामींस नमन करून जातां जातां ह्मणाला, आतां मला गंगास्नानास गेलें पाहिजे, तथापि पुन्हां एखादे दिवशीं मी येईन.

---

## ३

## ज्ञानयोग आणि भक्तियोग यांची एकवाक्यता—चांगल्यांत आणि वाइटांत एकाच परमेश्वराचा वास–कोणत्याही वस्तूचें बरेंपण अथवा वाईटपण तिचा उपयोग करण्यावर अवलंबून असतें–कर्म–सृष्टी–ईश्वर–माया.

[श्री. सुरेंद्रनाथ यांच्या खासगी रोजनिशीवरून.]

रविवार, ता. २३ जानेवारी १८९८.

बागबझारमधील बाळाराम बाबू यांच्या घरीं रामकृष्णाश्रमाची साप्ताहिक सभा भरली होती. सायंकाळची वेळ. स्वामी तुर्यानंद, स्वामी योगानंद, स्वामी प्रेमानंद इत्यादि मंडळी मठांतून आली होती. पूर्वेकडील सज्जात स्वामीजी बसले होते. सर्व सज्जा लोकांनीं अगदीं गच्च भरून गेला होता. सज्जाच्या दक्षिणेकडील आणि उत्तरेकडील भागांतही खूप गर्दी जमली होती. स्वामीजी कलकत्त्यांत असत त्या वेळीं नेहमींच अशी गर्दी जमे.

स्वामीजी फार चांगले गातात ही गोष्ट पुष्कळ श्रोत्यांस समजली होती. यामुळें स्वामींचें भजन ऐकण्यास पुष्कळ मंडळी उत्सुक झाली होती. एका गृहस्थांनीं आजूबाजूच्या लोकांस स्वामीजींस विनंति करण्याविषयीं सूचना

दिली. स्वामीजी जवळच असल्यामुळें श्रोत्यांच्या मनांतील आशय समजून ते हंसत हंसत ह्मणाले, " अहो महाशय, तुह्मी आपापसांतच काय कुजबुजत आहां ? जरा मोठयानें बोलाल तर बरें होईल." यानंतर महाशयांनीं विनंति केल्यावरून स्वामीजी एक मातेचें पद गाऊं लागले. त्यांचें गाणें ह्मणजे जणूं काय वीणारवच चालला होता असें वाटलें. गाणें संपल्यावर महाशयांकडे वळून ते ह्मणाले, " आतां तृप्ति झाली ना ? पण आतां भजन पुरे झालें. नाहीं तर भजनाच्या आवेशांत मी धुंद होऊन माझें भान उडून जाईल. याशिवाय विलायतेंत वारंवार भाषणें करावीं लागल्यामुळें माझा आवाजही खराब झाला आहे. त्यांत कांपरेपणा अधिक आला आहे."

यानंतर स्वामीजींनीं " मुक्तीचें खरें स्वरूप " या विषयावर व्याख्यान देण्यास आपल्या एका ब्रह्मचारी शिष्यास आज्ञा केली. त्यांच्या आज्ञेप्रमाणें त्या शिष्यानें कांहीं वेळ भाषण केलें. त्यानंतर आणखीही कांहीं भाषणें झालीं. या भाषणावर कांहीं वादविवादही होऊं द्या असें सुचवून आपल्या गृहस्थाश्रमी शिष्यांस पुढें सरण्यास सांगितलें अद्वैत आणि ज्ञान हीं श्रेष्ठ असून द्वैत आणि भक्ति हीं कमी दर्जाचीं आहेत अशा अर्थाचा उपक्रम या गृहस्थाश्रमी शिष्यांनीं केल्यावर श्रोत्यांतील कांहीं जणांनीं त्याजवर आक्षेप घेतला. दोन्ही पक्ष आपापले मुद्दे मोठया जोरानें लढवूं लागले. हें वाग्युद्ध कांहीं वेळ अवलोकन केल्यावर हें प्रकरण चिडीस जात आहे असें पाहून स्वामीजींनीं त्यांस थांबवून पुढील भाषण केलें.

**स्वामीजी**—वादविवादाच्या भरांत संतापून जाऊन सारी मजा तुह्मी कां बिघडवतां ? श्रीरामकृष्ण काय ह्मणतात पहा: 'शुद्ध भक्ति व शुद्ध ज्ञान हीं एकरूप—नव्हे एकच—आहेत.' भक्तीच्या दृष्टीनें पाहतां परमेश्वर केवळ प्रेमरूप आहे. 'मी परमेश्वरावर प्रेम करतों' असें बोलणेंसुद्धां बरोबर नाहीं. कारण परमेश्वर सर्वत्र प्रेमरूपच आहे. त्याला सोडून प्रेम बाहेर कोठें राहूंच शकत नाहीं. तुमच्या अंतःकरणांत जें प्रेम असतें आणि जें तुह्मी त्याला अर्पण करतां तें प्रेमसुद्धां तो स्वतःच आहे. चोऱ्या करणारा चोर, तनुविक्रय करणारी वेश्या आणि आपल्या अपत्यावर प्रेम करणारी माता या साऱ्यांत त्याच परमेश्वराचा वास आहे. गुरुत्वाकर्षणाच्या कायद्यानें अनेक ग्रहमाला एकमेकींकडे ओढल्या जातात. हें गुरुत्वाकर्षणही तोच. सर्वत्र तोच आहे

ज्ञानमतानुसार सर्वत्र त्याचाच वास अनुभवास येतो. ज्ञान आणि भक्ति यांची एकवाक्यता येथें होते. ईश्वरी भावांत तुह्मी पूर्ण मग्न झालां अथवा समाधींत तुह्मी प्रवेश केला ह्मणजे त्या स्थितींत मात्र द्वैतभाव नष्ट होऊन भक्त आणि परमेश्वर यांजमधील फरक नाहींसा होतो. भक्तिशास्त्रांत भक्त आणि परमेश्वर यांचे पांच प्रकारचे परस्पर संबंध वर्णिले आहेत. यांपैकीं कोणत्याही मार्गानें तुम्हांस परमेश्वरास जाणतां येतें. आतां या पांच मार्गांत आणखीही एका सहाव्याची भर टाकतां येईल. अद्वैत रूपानें परमेश्वराचें चिंतन करणें हा तो सहावा मार्ग होय. अशा रीतीनें अद्वैत्यांसही भक्त म्हणतां येईल. त्यांच्या दृष्टीनें परमेश्वराचें स्वरूप अभिन्न दिसेल इतकेंच. जोंपर्यंत आपण मायेच्या हद्दींत आहोंत तोंपर्यंत द्वैत कल्पना शिल्लक उरेल यांत शंका नाहीं. देश, काल, निमित्त आणि नाम. रूप हीं मायेचीं स्वरूपें आहेत. या मायेची हद्द ओलांडल्यावर अद्वैताचा अनुभव होतो. या ठिकाणीं पोहोंचलेला मनुष्य द्वैतीही नव्हे आणि अद्वैतीही नव्हे; त्याला सर्वत्र एकरूपच दिसतें. भक्त आणि ज्ञानी यांमध्यें आढळून येणारा सर्व भेद फक्त आरंभींच्या स्थितींतील होय. एकाला परमेश्वर बाहेर दिसत असतो आणि दुसऱ्याला तो स्वतःच्या अंतर्यामींच दिसतो.

आतां याशिवाय आणखीही एक मुद्दा लक्षांत ठेवण्यासारखा आहे. पराभक्ति म्हणून भक्तीची आणखीही एक पायरी आहे असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत. अद्वैतसिद्धांताच्या पक्क्या अनुभवानंतर आणि मुक्तिलाभानंतरही परमेश्वराची जी भक्ति करणें ती पराभक्ति. बाह्यतः या म्हणण्यांत परस्पर विरोध दिसतो; मुक्तिलाभानंतर भक्तीची इच्छा शिल्लक कां उरावी असा प्रश्न येथें उपस्थित होण्याजोगा आहे. याचें उत्तर इतकेंच कीं, मुक्त पुरुष हा सर्व प्रकारच्या कायद्यांबाहेरचा असतो. त्याच्या बाबतींत कोणतीही मर्यादा लागू करतां येत नाहीं. याकरितां त्याच्यासंबंधीं कोणताही प्रश्न उपस्थित करण्याचा अधिकारच आपणास नाहीं. मुक्तिलाभानंतर केवळ भक्तिसुखाकरितां भक्त म्हणून ते भक्ति करीत असतात.

**प्रश्न**—पुत्रवात्सल्य हें ईश्वरी प्रेमाचें स्वरूप असूं शकेल असें घटकाभर गृहीत धरतां येईल. पण चोर आणि जार यांच्या पापप्रवृत्तींतही त्याच परमेश्वराचें प्रेममय रूप असूं शकेल हें आपलें म्हणणें आमच्या गळीं उत-

रत नाहीं. अशा स्थितींत पाप आणि पुण्य या दोहोंबद्दलही परमेश्वर सारखाच जबाबदार आहे असें म्हणावें लागेल.

**स्वामीजी**—ज्ञानाच्या अत्युच्च दशेंत मात्र या ह्मणण्याच्या सत्यत्वाचा अनुभव येईल. सृष्टींत जेथें प्रेम अथवा कोणत्याही प्रकारचा परस्परांबद्दल असलेला ओढा आढळून येईल, तेथें तेथें तें प्रेममय परमेश्वराचेंच स्वरूप आहे, ही गोष्ट आत्मानुभवाच्या स्थितींत मात्र अनुभवास येते. प्रत्यक्ष सृष्टींत या कल्पनेचें सत्यत्व अनुभवावयाचें असेल, तर तसें करण्यास आत्मानुभवच घेतला पाहिजे.

**प्रश्न**—पण पापांतसुद्धां परमेश्वराचा वास असतो, हें कबूल केलें पाहिजे काय ?

**स्वामीजी**—वास्तविक पाहतां चांगलें आणि वाईट अशा प्रकारच्या फरकाला खरोखर अस्तित्वच नाहीं. केवळ आमच्या समजुतीसाठीं हा भाषेचा फरक उत्पन्न झाला आहे. ज्या वस्तूला आज आपण वाईट ह्मणतों, तिलाच उद्यां आपण चांगलीही ह्मणतों. तिचा जसा बरावाईट उपयोग आपण करूं, त्याप्रमाणें ती आपणांस बरी अथवा वाईट दिसते. या दिव्याच्या प्रकाशाचेंच उदाहरण घ्या. हा प्रकाश आहे ह्मणून आपणास पाहतां येतें आणि उपयुक्त कार्यें करतां येतात. प्रकाशाचा उपयोग करण्याचा हा एक प्रकार झाला. आतां या दिव्याच्या ज्योतीवर तुह्मी आपलें बोट धरलें तर तें भाजेल. त्याच दिव्याच्या उपयोगाचा हा दुसरा प्रकार झाला. कोणत्याही वस्तूचा उपयोग आपण करूं तसा होतो, हें आपण प्रथम लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. सद्गुण आणि दुर्गुण यांच्या बाबतींतही हेंच तत्त्व लागू आहे. सामान्यत्वें-करून पाहतां आपल्या शरिराच्या आणि मनाच्या धर्मांचा योग्य उपयोग करणें याचें नांव सद्गुण; आणि याच धर्मांचा दुरुपयोग झाला ह्मणजे तोच दुर्गुण होतो.

अशा रीतीनें कांहीं वेळ प्रश्नोत्तरेंच चाललीं होतीं. इतक्यांत एकजण ह्मणाला, “ आकाशांतील तारकांत परस्पर दिसून येणारें गुरुत्वाकर्षण हें-सुद्धां परमेश्वराचेंच स्वरूप आहे. या ह्मणण्यांत कांहीं तथ्य असलें अथवा नसलें तरी ही कल्पना मोठी काव्यमय आहे एवढें मात्र कबूल केलेंच पाहिजे.

**स्वामीजी**—छे छे ! मेहरबान, हें नुसतें काव्य नाहीं. ज्ञानप्राप्तीनंतर हा अनुभव कोणालाही प्रत्यक्षच घेतां येतो.

या मुद्यासंबंधीं स्वामीजींनीं आणखी जें कांहीं विवेचन केलें त्यावरून त्यांच्या ह्मणण्याचा आशय माझ्या लक्षांत आला तो असाः–जडवस्तु आणि चैतन्य हीं बाह्यतः अगदीं वेगवेगळीं दिसत असलीं तरी वस्तुतः एकाच वस्तूचीं तीं दोन भिन्न रूपें आहेत. त्याचप्रमाणें बाह्य सृष्टींत अथवा अंतर्गत सृष्टींत शक्तीचे निरनिराळे प्रकार आपल्या पाहण्यांत येत असले तरी तीं एकाच शक्तीचीं अनेक प्रकारचीं दृश्यरूपें आहेत. ज्या ठिकाणीं चैतन्याच्या व्यक्त दशेचें परिमाण अत्यंत अल्प असतें, तेथें आपण तिला जड वस्तु असें नांव देतों; आणि ज्या ठिकाणीं हें परिमाण अधिक प्रमाणावर व्यक्त होतें, तेथें तिला आपण सचेतन अथवा जिवंत वस्तु ह्मणतों. वास्तविक पाहतां केवळ जड अशी एकही वस्तु अस्तित्वांत नाहीं. कोणत्याही स्थितींत आणि कोणत्याही काळीं चैतन्याचा अत्यंत अभाव जींत आहे अशी एकही वस्तु अस्तित्वांत नाहीं. जड विश्वांत गुरुत्वाकर्षण या स्वरूपानें जी शक्ति अनुभवास येते तीच शक्ति अधिक सूक्ष्म आणि अधिक विरल झाली ह्मणजे ती प्रेम या स्वरूपानें अनुभवास येते. आत्मानुभवाच्या अधिकाधिक उच्च दशेंत या स्वरूपांचा स्पष्ट अनुभव होतो.

**प्रश्न**–व्यक्तीच्या ठिकाणीं मनोधर्मांचा उपयोग वेगवेगळ्या प्रकारें कां व्हावा ? आपल्या मनोधर्मांचा दुरुपयोग करण्याची प्रवृत्ति तरी एखाद्याच्या ठिकाणीं कां उद्भवते ?

**स्वामीजी**—पूर्वकर्मानुसार अशाच प्रकारची प्रवृत्ति उत्पन्न होते. आपणापाशीं आजमितीस जो कांहीं सांठा आहे तो सारा आपणच निर्माण केलेला आहे. यावरूनच आपल्या मनोधर्मास योग्य दिशेस न लावून त्यांचा दुरुपयोग करणें आपल्याच हातांत आहे हें उघड होतें.

**प्रश्न**—आपली सर्व परिस्थिति ही आपल्या कर्मांपासूनच उत्पन्न झाली आहे असें कबूल केलें तरी ही प्रवृत्ति उत्पन्न होण्यास केव्हां तरी मूळ आरंभ झाला असला पाहिजे. मग अगदीं आरंभीं तरी ही प्रवृत्ति कोठून आली ?

**स्वामीजी**—अमुक काळीं सृष्टीला प्रथम आरंभ झाला हें तुह्मी कशावरून ह्मणतां ? सृष्टि अनादि आहे असें श्रुतीचें मत आहे. परमेश्वराचें अस्तित्व आहे तोंपर्यंत सृष्टीचेंही अस्तित्व आहे.

**प्रश्न**—महाराज, ही माया येथें कां आणि कोठून आली ?

**स्वामीजी**—परमेश्वरासंबंधीं 'कारणें' विचारीत सुटणें ही चूक आहे. अपूर्ण स्थितींतल्या प्राण्यांबद्दलच असे प्रश्न आपणांस करतां येतील. जो स्वतः सर्वांगपूर्ण आहे आणि ज्याच्या ठिकाणीं कसल्याही प्रकारची उणीव भासत नाहीं त्याच्या ठिकाणीं 'कां,' 'कसें' इत्यादि शब्द कसे संभवतील? 'माया कोठून आली ?' अशा प्रकारचा प्रश्नच संभवत नाहीं. काल, देश, आणि निमित्त याचाच अर्थ माया. तुह्मीं, मी आणि बाकीचे सारे लोक मायेच्या हद्दींतलेच आहों. अशा स्थितींत मायेच्या पलीकडे काय आहे, असा प्रश्न तुह्मीं विचारतां ! मायेच्या हद्दींत राहून तिच्या पलीकडचा प्रश्न तुह्मीं कोणत्या आधारावर विचारणार ?

यानंतर आणखीही बरीच भवती न भवती झाली. मिल्ल, हॅमिल्टन्, हर्बर्ट स्पेन्सर इत्यादिकांच्या तत्त्वज्ञानांकडे भाषणाचा ओघ वळला. या बाबींतही स्वामीजींनीं सर्वांस समर्पक उत्तरें दिलीं. पाश्चात्य तत्त्वज्ञानाशीं स्वामीजींचा इतका परिचय असलेला पाहून आणि प्रश्नांचीं उत्तरें तडकाफडकीनें देण्याची त्यांची रीत पाहून सर्वांसच मोठें नवल वाटलें.

यानंतर अनेक प्रकारच्या विषयांवर संभाषणें होऊन दरबार बरखास्त झाला.

---

४

## एकाच वर्णाच्या पोटजातींत परस्पर विवाह-हिंदुस्थानाला कोणत्या शिक्षणाची जरुरी आहे-ब्रह्मचर्य-लवकर विवाह न करण्याविषयीं.

[ श्री. सुरेंद्रनाथ सेन यांची रोजनिशी. ]

सोमवार, ता० २४ जानेवारी १८९८.

गेल्या शनिवारीं स्वामीजींना प्रश्न विचारणारा गृहस्थ आजही आला होता. पोटजातींतल्या विवाहाचा प्रश्न पुन्हां उपस्थित करून तो ह्मणाला,

निरनिराळ्या राष्ट्रांतील मानवकुलांत विवाहसंबंध घडवून आणण्यास काय उपाय करावा ?

**स्वामीजी**—जीं राष्ट्रें आपणाहून भिन्नधर्मीय आहेत त्यांतील लोकांशीं आपले विवाहसंबंध व्हावे या गोष्टीस माझी अनुमती नाहीं. अशामुळें सध्यांपुरतीं तरी समाजबंधनें शिथिल होऊन अनंत प्रकारचे घोटाळे उपस्थित होण्याचा संभव आहे. एकाच धर्मांतील मानवकुलाच्या पोटशाखांत परस्पर लग्नसंबंध व्हावे असें माझें मत आहे.

**प्रश्न**—पण अशा स्थितींतही पुष्कळ घोटाळे निघण्याचा संभव आहे. अशी कल्पना करा कीं मला एक मुलगी आहे. या मुलीचें सर्व बालपण बंगाल्यांत गेलें आहे. आतां तिचा विवाह एखाद्या मराठ्याशीं अथवा मद्राशाशीं केला, तर या पतिपत्नींस परस्परांची भाषा कळण्याची सुद्धां मारामार ! याशिवाय त्यांच्या संवयी आणि कुलाचार हींसुद्धां बहुतांशीं भिन्न असणार. अनेक अडचणींपैकीं या अगदीं थोड्याशा अडचणी मी सांगितल्या. याशिवाय समाज गिल्ला करील तो वेगळाच. त्यानें पूर्वीच्या घोटाळ्यांत अधिक भर मात्र पडावयाची.

**स्वामीजी**—तुह्मी ह्मणतां तशा प्रकारचीं लग्नें मोठ्या प्रमाणावर सुरू होण्यास अद्यापि बराच काळ लोटला पाहिजे. याशिवाय अशा प्रकारचे विवाह एकदमच सुरू करणें फारसें विहित नाहीं. ज्या मार्गांत अत्यंत कमी अडचणी असतील तोच मार्ग अशा कामीं पसंत करणें हितावह आहे. याकरितां एकाच वर्णाच्या पोटजातींत परस्पर विवाहसंबंध आरंभीं सुरू होण्याकरितां खटपट करावी. उदाहरणार्थ, बंगाल्यांतील कायस्थ ब्राह्मण. यांच्यांत उत्तररर्ही, दक्षिणरर्ही, बंगज इत्यादि अनेक पोटभेद आहेत. या पोटभेदांत सांप्रत परस्पर लग्नसंबंध होत नाहींत. यांच्यांतच असे संबंध प्रथम सुरू करण्याची खटपट करावी. आपल्या हातांत ज्या कांहीं वस्तु उपलब्ध असतील, त्या घेऊनच आपण आपली इमारत उठविली पाहिजे. सरसहा मोडतोड करीत सुटणें ह्मणजे सुधारणा नव्हे.

**प्रश्न**—आपण ह्मणतां तसेंच कां होईना; पण तसें झालें तरी त्यांतून विशेष प्रकारच्या कोणत्या फलाची प्राप्ति होणार ?

**स्वामीजी**—पोटजातींतल्या जातींत मात्र विवाहसंबंध व्हावे असा निर्बंध कित्येक शतकें चालू असल्यामुळें चुलत घराण्यांत आणि इतर नजीकच्या आप्तेष्ट घराण्याशीं विवाहसंबंध करण्याचा प्रसंग येतो, हें आपणास दिसत नाहीं काय ? याच कारणामुळें शारीरिक दृष्ट्या आपल्या समाजाची हानी होत आहे. यामुळेंच आपलीं शरीरें रोगांचीं माहेरघरें बनून गेलीं आहेत. रक्ताचें अभिसरण नियमित व्यक्तींत सुरू राहिल्यामुळें तें रक्त आतां नासून गेलें आहे. यामुळें जन्मादारभ्यच आपल्या बापांचे रोग घेऊन नवी संतती या जगांत अवतरते. शरिरांत रक्ताचा सांठा अगदीं बेताबाताचा असल्यामुळें रोगजंतूंस प्रतिबंध करण्याची शक्ति या शरिरांत असत नाहीं. हे रोगजंतु तर त्यांस खाण्यासाठीं जणूं काय टपून बसलेले असतात. यासाठीं हें विवाहसंबंधाचें वर्तुल आपण अधिक विस्तृत केलें तरच भावी प्रजेच्या अंगांत नव्या प्रकारचें रक्त निर्माण होईल. असें झालें तरच अलीकडच्या रोगांच्या तावडींतून आणि दुसऱ्या अनेक कष्टांतून आपली भावी प्रजा वांचेल.

**प्रश्न**—अल्प वयांत लग्न करण्यासंबंधीं आपलें काय मत आहे?

**स्वामीजी**—बंगाल्यांतल्या सुशिक्षित वर्गांत लवकर लग्न करण्याची रूढि हळूहळू नाहींशी होत चालली आहे. मुलींच्या लग्नाची यत्ताही पूर्वीपेक्षां एकदोन वर्षांनीं वाढली आहे; पण या फेरबदलाचें मुख्य कारण दारिद्र्य हेंच आहे. कोणत्याही कारणानें कां होईना मुलींच्या लग्नाची इयत्ता आणखीही वाढली पाहिजे. गरीब बिचारा बाप काय करणार ? मुलगी थोडीशी मोठी होते न होते तोंच घरांतल्या बायकाच काय, पण दूरदूरच्या नातलग आणि शेजारणीपाजारणीसुद्धां त्याच्यामागें एकसारखी बोंचणी लावतात. मुलीचें लग्न होऊन जाईपर्यंत त्या त्याला चैन पडूं देत नाहींत. आणि धर्माचें पांघरूण घेऊन मिरविणाऱ्या तुमच्या दांभिक लोकांबद्दल तर बोलावयासच नको. सम्मति वयाचा कायदा पास होण्याचें घाटूं लागतांच तुमच्या धर्मरक्षकांनीं एकच कोलाहल करून दिला. ‘ धर्म बुडाला हो बुडाला ’ अशी ओरड त्यांनीं सुरू केली. बारातेरा वर्षांच्या मुलींना मुलें झालीं म्हणजेच जणूं काय धर्मरक्षण होतें! अशा प्रकारच्या स्थितींत तुमच्या

धर्माबद्दल आणि तुमच्या राज्यकीय आकांक्षांबद्दल राज्यकर्त्यांच्या मनांत अनादर उत्पन्न झाला तर त्यांत नवल नाहीं.

**प्रश्न**—तर मग स्त्रिया आणि पुरुष यांचें विवाहाचें वय वाढविलें पाहिजे असें आपलें मत आहे काय ?

**स्वामीजी**—होय, असें माझें निश्चित मत आहे. पण याबरोबर खरें शिक्षण देण्याचीही आवश्यकता आहे. नाहीं तर भलतेच प्रकार घडून येण्याचा संभव आहे. शिक्षण याचा अर्थ सध्यांच्या पद्धतीचें शिक्षण असा मात्र नव्हे. सध्यांचें नुसतें मोडतोडीचें शिक्षण आम्हांस नको. नव्या विधायक पद्धतीचें शिक्षण आपण कबूल केलें पाहिजे. पुस्तकांतून भाराभर पाठांतर करविणारें शिक्षण नको. ज्यायोगें शुद्ध दानत निर्माण होईल असें शिक्षण आपणास हवें आहे. ज्याच्या योगानें मनोबल वाढेल, बुद्धीचा विकास होईल आणि मनुष्य स्वावलंबी होईल असें शिक्षण आपणांस हवें आहे.

**प्रश्न**—आपणास स्त्रियांच्या बाबतींत बऱ्याच प्रकारच्या सुधारणा कराव्या लागतील नाहीं ?

**स्वामीजी**—मी ह्मणतों अशा प्रकारचें शिक्षण त्यांना मिळालें ह्मणजे आपल्या अडचणी स्त्रिया स्वतःच दूर करतील. सदोदित॰परावलम्बित्व त्यांस शिकविलें गेलें असल्यामुळें थोडीशी अडचण भासतांच अथवा भीतीचें यत्किंचित् कारण उद्भवतांच रडून डोळे सुजविण्यापलीकडे त्या कांहीं करीत नाहींत. इतर गुणांबरोबरच शौर्य आणि पराक्रम हे गुणही त्यांच्या अंगीं आले पाहिजेत. स्वसंरक्षणाची कला सांप्रतच्या दिवसांत त्यांना आवश्यक आहे. झांशीच्या राणीचें उदाहरण पहा.

**प्रश्न**—आपण ह्मणतां ती पद्धति अगदींच नवीन आहे. आणि अशा पद्धतीचें शिक्षण स्त्रियांस देण्याचा काल अद्यापि बराच दूर आहे असें मला वाटतें.

**स्वामीजी**—तें कसेंही असलें तरी प्रयत्नांची शिकस्त आपण केली पाहिजे. केवळ स्त्रियांच्या शिक्षणाकडे लक्ष्य देऊनच आपलें काम भागतें असें नाहीं. पुरुषांच्या शिक्षणाकडेही आपण लक्ष्य पुरविलें पाहिजे. एखाद्याला नुसतीं मुलें झालीं ह्मणजे तेवढयानेंच त्याचें बापाचें कर्तव्य संपतें असें नाहीं. मुलें झालीं ह्मणजे पुष्कळ प्रकारच्या जबाबदाऱ्या त्याच्या शिरा-

वर येऊन पडत असतात. आतां स्त्रीशिक्षणासंबंधीं ह्मटलें तर पातिव्रत्याचें शिक्षण हिंदु स्त्रियांस देण्याची आवश्यकता नाहीं. कारण, पिढयान्‌पिढया तें त्यांच्या आंगांत मुरत आलें आहे. आतां प्रथम पातिव्रत्याची कल्पना त्यांच्या चित्तांत अतिशय तीव्र केली पाहिजे. तें साध्य सर्वांहून उच्च आहे, अशी भावना त्यांच्या चित्तांत निर्माण केली पाहिजे. यायोगें त्यांची दानत बळकट होईल. अशा स्थितींत स्त्रियांनीं लग्न केलें अथवा त्या कुमारिका राहिल्या, तरी त्यांजबद्दल धास्ती बाळगण्याचें कारण नाहीं. आपल्या पावित्र्याचा भंग होऊं देण्यापेक्षां प्रसंगीं त्या मरणही पत्करतील. कोणत्याही उच्च साध्याकरितां—मग तें साध्य कोणतेंही असो—प्रसंगीं जीवही गमावण्यास तयार होणें हें शौर्य कमी प्रतीचें ह्मणतां येईल काय? सांप्रतची परिस्थिति पाहतां कांहीं स्त्रियांस तरी त्यागाचा धडा शिकविणें अत्यंत आवश्यक झालें आहे. असें झालें ह्मणजे त्या जन्मभर कुमारिका राहण्याची शपथ घेतील. यांतच पावित्र्यरक्षणाच्या बलाचीही भर पडेल. आपलें पावित्र्य कायम राखावें हा धडा हिंदु स्त्रियांच्या आंगीं अत्यंत प्राचीन कालापासून मुरून गेला आहे. याबरोबरच त्यांस आधिभौतिक शास्त्रांचें ज्ञानही दिलें पाहिजे. यायोगें केवळ त्यांचाच फायदा होईल असें नाहीं, तर त्यांचें ज्ञान इतरांच्याही उपयोगी पडेल. या गोष्टी सहजपणें त्यांस साध्य होतील. त्यांतच त्यांचें चित्त रंगून जाईल. आपल्या मातृदेशाचें कल्याण आपणास करावयाचें असेल तर या भूमींत पवित्र वर्तनाचे ब्रम्हचारी आणि ब्रम्हचारिणी हीं निर्माण झालीं पाहिजेत.

**प्रश्न**—यामुळें स्त्रियांचा कोणता फायदा होईल?

**स्वामीजी**—त्यांच्या उदाहरणानें आणि लोकांसमोर त्यांचा राष्ट्रीय हेतु नित्य नजरेसमोर राहिल्यामुळें विचार आणि भावना यांत क्रांति घडून येईल. आज कशी स्थिति आहे पहा. मुलगी नऊ दहा वर्षांची झाली नाहीं तोंच कसाबसा तिचा विवाह उरकणें तिच्या आईबापांस भाग पडतें. आणखी दोन तीन वर्षांत तिला मूल झालें तर सर्व कुटुंबांत आनंदाचा जणूं काय उद्रेक होतो. अशा प्रकारच्या क्षुद्र कल्पना आणि भावना समूळ बदलल्या गेल्या, तरच आपली जुनीपुराणी श्रद्धा पुन्हां परत येण्याची थोडी तरी आशा आहे. जे कोणी अशा प्रकारचें खरें ब्रम्हचर्य तंतोतंत जन्मभर पाळतील;

त्यांच्या ठिकाणीं आत्मश्रद्धाबलाचा केवढा मोठा सांठा निर्माण होईल, याचा विचार तुम्हींच करा. एवढया मोठया बलावर ते लोकांचें किती हित करतील हें काय सांगावयास पाहिजे ?

तो प्रश्न विचारणारा गृहस्थ स्वामीजींचें पादवंदन करून जावयास निघाला. पुन्हां केव्हांतरी येण्याबद्दल स्वामींनीं त्यास विनविलें. तेव्हां तो ह्मणाला, " महाराज, मी अवश्य येईन; मला आपल्या दर्शनानें किती तरी लाभ झाला आहे. आपणाकडून मला अनेक नव्या गोष्टी कळल्या. पूर्वीं त्या कोठेंही माझ्या ऐकण्यांत आल्या नव्हत्या. " तो गृहस्थ निघून गेल्यानंतर जेवणाची वेळ झाली ह्मणून मीही आपला घरचा रस्ता सुधारला.

## ५.

## मधुरभाव-प्रेम-नामकीर्तन-त्यांतील भीतीचीं स्थलें-भक्ति आणि ज्ञान यांचा योग्य मिलाफ-एक विलक्षण स्वप्न.

[ श्री. सुरेन्द्रनाथ सेन यांची खासगी रोजनिशी. ]

सोमवार, ता० २४ जानेवारी १८९८.

दुपारच्या वेळीं मी पुन्हां स्वामीजींकडे गेलों. या वेळींही त्यांच्या भोंवतीं बराच मोठा श्रोतृगण जमला होता. ईश्वर हा आपला पति या मधुरभावानें त्याचें पूजन करणें हा विषय चालू होता. श्रीचैतन्यांच्या पंथाचा हा मार्ग आहे. श्रीचैतन्यांचे कांहीं विक्षिप्तपणाचे प्रकार ऐकून श्रोतृमंडळींत मधून मधून मोठा हंशा पिकत होता. इतक्यांत एकजण मध्येंच ह्मणाला, "श्रीचैतन्यांच्या वागणुकींत अशी थट्टा करण्याजोगें काय होतें ? ते महापुरुष नव्हते असें तुह्मांस वाटतें काय ? प्रत्येक गोष्ट मनुष्यमात्राच्या कल्याणाकरितांच त्यांनीं केली असें तुह्मांस वाटत नाहीं काय ? "

**स्वामीजी**—तिकडे कोण बोलतें आहे ? श्रीचैतन्यांच्या चरित्रांतला फक्त थट्टेचाच भाग तुह्मांस दिसतो असेंच ह्मणावयाचें काय ? कोणाची थट्टा करावयाची ह्मटलें तर मला तुमचीसुद्धां हवी तेवढी चेष्टा करतां येईल. कनककामिनीचा मोह जाळून टाकण्याचें जें अलौकिक धैर्य श्रीचैतन्यांपाशीं

होतें, तें प्राप्त करून घेण्याकरितां सारा जन्म मला धडपड करावी लागली आहे. आणि हेंच साध्य लोकांच्या मनांत भरविण्याकरितां सारा जन्म मी त्यांस उपदेश करीत आहें. कनककामिनीच्या लोभास श्रीचैतन्यांच्या हृदयांत थाराही नव्हता. त्यांच्या पाठीमागें त्यांच्या शिष्यांनीं स्त्रियांस आपल्या पंथांत घेतलें. चैतन्यांच्या नांवानें ते त्यांजबरोबर हवातसा धुडघुस घालूं लागले. चैतन्यांच्या उच्चतम ध्येयाची त्यांनीं नुसती खिचडी करून टाकली. भगवान् चैतन्यांनीं जी प्रेमभावना आपल्या उदाहरणानें लोकांसमोर जिवंत उभी केली होती तींत कामविकाराचा यत्किंचित् सुद्धां अंश नव्हता. ही स्त्री आणि हा पुरुष हा भेदसुद्धां त्यांच्या चित्तांत राहिला नव्हता. लिंगभेदविरहित प्रेमाचें असें उज्वल रूप सामान्य मनुष्याच्या गळीं उतरण्याजोगेंच नसतें. यानंतर जे वैष्णव गुरू झाले त्यांनीं आपल्या आद्यगुरूनें शिकविलेला पूर्ण विरक्ततेचा धडा लोकांस न शिकवितां त्यांची प्रेमभावना मात्र त्यांनीं लोकांसमोर मांडली. अशा शिक्षणाचा परिणाम इतकाच झाला कीं ईश्वरी प्रेमाची शुद्ध भावना लोकांच्या अंतरंगांत न उतरल्यामुळें तिला स्त्रीपुरुषांमधील सकाम भावनेचें अत्यंत घाणेरडें स्वरूप प्राप्त झालें.

**प्रश्न**—महाराज, पण चांडाळांना सुद्धां श्रीहरीच्या नांवानें भगवान् चैतन्य उपदेश देत असत; मग हें शिक्षण सामान्य मनुष्याच्या उपयोगीं पडण्याजोगें नव्हतें असें कसें ह्मणतां येईल ?

**स्वामीजी**—त्यांच्या उपदेशासंबंधीं सध्यां मीं बोलत नाहीं. राधाप्रेमाची जी त्यांची अत्युत्कट प्रेमभावना तिजबद्दल मी बोलत आहें. या भावनेच्या प्रेमरंगांत ते रात्रंदिवस रंगलेले असत. राधेच्या स्वरूपाशीं त्यांचा स्वतःचा एकजीव होऊन जाई.

**प्रश्न**—सामान्य मनुष्यांसही ही भावना कां साध्य होऊं नये ?

**स्वामीजी**—ही भावना सामान्य मनुष्यांनीं साध्य करण्याचा यत्न केल्यास त्याचे परिणाम काय होतात हें आपल्या देशाच्या स्थितीवरूनच दिसत आहे. मधुरभावाचा उपदेश सार्वत्रिक झाल्यामुळें सर्व राष्ट्र स्त्रैण झालें. या सर्व मानवशाखेच्या अंगीं स्त्रीत्व उतरलें. सर्व ओरिसा प्रांत भेकड लोकांची जन्मभूमि झाला. राधाप्रेमाच्या मागें चारशें वर्षें लागल्यामुळें सर्व बंगाल प्रांताचें पौरुष बहुधा पूर्ण नाहींसें झालें आहे. कांहीं झालें

कीं रडावें आणि करुणा भाकावी, इतकीच अक्कल या लोकांस उरली आहे. हा दुर्गुण सर्व बंगाली राष्ट्राच्या आंगीं मुरला आहे. राष्ट्राचे विचार आणि कल्पना यांवरून त्या राष्ट्राचें महत्व समजून येत असतें. बंगाल्यांचें साहित्य पाहिल्यास काय आढळून येतें? गेल्या चारशें वर्षांचा सर्व ग्रंथसंग्रह धुंडाळून पाहिला तर त्यांत जिकडे तिकडे रडारडीवांचून कांहीं दिसून येणार नाहीं. पौरुषाचा उद्भव होईल अशा प्रकारचें काव्य या अवकाशांत बंगाल्यांत मुळींच निर्माण झालें नाहीं.

**प्रश्न**—तर मग हा मधुरभाव धारण करण्यास योग्य कोण समजावें?

**स्वामीजी**—कामविकार यत्किंचितही शिल्लक आहे तोंपर्यंत खऱ्या प्रेमाचा उद्भव होणें शक्य नाहीं. अंत:करणांत कामविकाराचा जरी अत्यंत अल्प अंश असला तरी तो प्रेमोद्भव होऊं देणार नाहीं. अत्यंत त्यागी पुरुषावांचून—मनुष्यांतील नरशार्दूलावांचून—हा भाव धारण करण्यास कोणासही अधिकार नाहीं. ही भावना सार्वत्रिक व्हावी अशा विचारानें तिचा उपदेश केला गेल्यास मनुष्याच्या अंत:करणांत जें विकारी प्रेम असतें त्याचा मात्र अधिक उद्रेक होईल. परमेश्वर आपला पति अशा भावनेनें ईशचिंतन करण्यापेक्षां अशा भावनेच्या मागें लागलेला सामान्य मनुष्य आपल्या स्त्रीचें चिंतन मात्र करील! या भावनेचा सदुपयोग कितपत होणार हें निराळें सांगावयास नकोच!

**प्रश्न**—तर मग सामान्य संसारी जनांस ईश्वर हा आपला पति या भावनेच्या मार्गाचा उपयोग करून घेणें अगदीं अशक्यच आहे काय?

**स्वामीजी**—सामान्य संसारी जनांस या मार्गाचा मुळींच उपयोग नाहीं यांत संशय नाहीं. अशा माणसांत एखाददुसरा अपवाद निघाल्यास निघेल; पण दुसरे इतके मार्ग उपलब्ध असतां या मार्गाविषयीं इतका अट्टाहास कां धरावा? मधुरभावावांचून अन्य भावानें परमेश्वराचें चिंतन करणें शक्य नाहीं काय? आपलें सर्व बल एकवटून दुसरे चार मार्ग अंत:करणपूर्वक कां चोखाळूं नयेत? प्रथम अंत:करण खुलें करा ह्मणजे बाकीच्या गोष्टी आपोआपच घडून येतील. पण इतकें मात्र पक्कें लक्ष्यांत ठेवा कीं कामविकार अंशत:सुद्धां शिल्लक असेल तोंपर्यंत प्रेमाची प्राप्ति होणार नाहीं. कामविकाराचें समूळ उच्चाटन करण्याचाच यत्न प्रथम कां करूं नये?

"मी संसारी आहें, मला हें कसें साध्य होईल?" असा प्रश्न तुह्मी कदाचित् कराल; पण हें निव्वळ वेडेपण आहे. तुह्मी संसार केला एवढयाचकरितां कामाग्नीची होळी सदोदित पेटविली पाहिजे काय? सर्व आयुष्य अशाच रीतीनें फुकट घालविलें पाहिजे काय? आतां यांत दुसराही एक विचार आहे. मधुरभावाच्या प्राप्तीसाठीं पुरुषानें स्त्रीत्व पत्करणें हें तरी त्याला शोभण्यासारखें आहे काय?

**प्रश्न**—महाराज, आपलें ह्मणणें खरें आहे. नामसंकीर्तनापासून आपल्या धार्मिक उन्नतीस पुष्कळ मदत होते. आणि याशिवाय चार मंडळीबरोबर भजन करण्यास मजाही वाटते. आपल्या धर्मग्रंथांनींही या मार्गाचा उपदेश केला असून श्रीचैतन्य देवांनींही सामान्य जनतेस त्याचा उपदेश केला आहे. मृदंग वाजूं लागला ह्मणजे छातींत कशा गुदगुदल्या होतात आणि नाचण्याचीही कशी इच्छा होते याचें वर्णन काय करावें?

**स्वामीजी**—आपण ह्मणतां हें सर्व बरोबर आहे, पण कीर्तन ह्मणजे नुसतें नृत्य नव्हे. परमेश्वराचे गुणानुवाद गाणें आणि कोणत्याही रीतीनें त्याचें नामसंकीर्तन करणें हेंच खरें कीर्तन. वैष्णवांचें नृत्य आणि त्यांचा उत्कट भक्तिभाव हीं फार मोहक आहेत यांत शंका नाहीं; पण या त्यांच्या मार्गांत एक भयाचेंही स्थळ आहे तें आपण टाळलें पाहिजे. तें भयाचें स्थल ह्मणजे प्रतिक्रिया. एका पक्षीं भावनांचा अतिशय उद्रेक झाल्यामुळें डोळ्यांतून अश्रुधारा येऊं लागतात आणि मत्त झालेल्या मनुष्याप्रमाणें डोकें झोंके खाऊं लागतें; पण उलटपक्षीं भजन समाप्त होतांच या भावना जितक्या सपाट्यानें वर आल्या, तितक्याच सपाट्यानें त्या खालीं जातात, हेंही लक्ष्यांत ठेविलें पाहिजे. एखादी समुद्रावरील लाट जितक्या झपाट्यानें वर सरते, तितक्याच सपाट्यानें ती खालींही उतरते. अशा वेळीं जी प्रतिक्रिया होत असते तिचा तडाखा सहन करणें फार कठीण आहे. विवेकबुद्धि जागृत असल्यावांचून अशा स्थितींत एखादा मनुष्य खालीं घसरून विषयांच्या मागें लागण्याचें भय असतें. अमेरिकेंतही अशाच प्रकारचा अनुभव मला आला. चर्चांत (देवळांत) जावें, मोठया भक्तिभावानें परमेश्वराची प्रार्थना करावी, मनोभावानें त्याचें गीत गावें आणि उपदेशश्रवणाच्या वेळीं डोळ्यांतून अश्रूही यावे, पण देवळाच्या बाहेर पाऊल ठेवतांच प्रत्याघात होऊन हींच मनुष्यें

अनेक प्रकारच्या विषयांच्या मागें हात धुवून लागलेलीं दिसावीं असें माझ्या अनुभवास आलें आहे.

**प्रश्न**—महाराज, तरमग श्रीचैतन्यदेवांनीं सांगितलेल्या मार्गांपैकीं आह्मांस कोणता मार्ग विहित आहे, हें आपण सांगितल्यास आमच्या हातून चुका घडणार नाहींत.

**स्वामीजी**—भक्तीशीं ज्ञानाचा संयोग करून परमेश्वराचें पूजन करा. भक्तीबरोबरच आत्मानात्म विचारही जागृत असूंद्या. यावांचून श्रीचैतन्यांपासून दुसरेही सद्गुण तुह्मी घ्या. श्रीचैतन्यदेव सर्व प्राण्यांवर कसे प्रेम करीत होते, परमेश्वराच्या ठिकाणीं त्यांची निष्ठा किती जाज्वल्य होती आणि त्यांचा त्याग किती पूर्ण स्वरूपाचा होता, हें ध्यानीं आणून हे गुण आंगीं आणण्यासाठीं सारा जन्म तुह्मी खटपट करा.

तो प्रश्न विचारणारा गृहस्थ हात जोडून स्वामीजींस ह्मणाला, "महाराज, आपली मी क्षमा मागतों. आपलें ह्मणणें बरोबर आहे असें मला आतां कळून आलें. आपल्या टीकेची दिशा माझ्या लक्षांत प्रथम न आल्यामुळें आपल्या ह्मणण्यावर मी आक्षेप घेतले. वैष्णवांच्या मधुरभावावर आपण थट्टेनें टीका करीत होतां अस मला प्रथम वाटलें."

स्वामीजी हंसून म्हणाले, "हें पहा, आपणाला टीका कर्तव्य असेलच तर ती परमेश्वरविषयक अथवा महापुरुषविषयक असलेली बरी. माणसांवर टीका करण्यापेक्षां त्यांजवर टीका करणें अधिक सुखाचें असतें. मला कांहीं अपशब्द तुम्ही बोललां तर चिडून जाऊन मीही कदाचित् तुम्हांस गालिप्रदान करीन. आणि त्याचा मोबदला तुम्हीही मला द्याल; पण ईश्वर अथवा महापुरुष हे अपकाराला प्रतिअपकार कधींही करीत नाहींत."

स्वामीजींचें पादवंदन करून तो गृहस्थ निघून गेला. स्वामीजी कलकत्त्यांत असले ह्मणजे असा मेळा नेहमीं जमावयाचा हें मी पूर्वीं सांगितलेंच आहे. पहांटेपासून रात्रीं आठनऊ वाजेपर्यंत सारा दिवस माणसांच्या झुंडी जात येत असावयाच्या. यामुळें स्वामीजींच्या भोजनाची वेळही ठरवितां येत नसे. अशा प्रकारचा गोंधळ बंद करण्यासाठीं ठरींव वेळाखेरीज इतर वेळीं कोणाचीही भेट घ्यावयाची नाहीं असा नियम त्यांनीं करावा असें पुष्कळांनीं त्यांस सांगितलें; पण स्वामीजी पडले कोमल अंतःकरणाचे. दुसऱ्या कोणासही

मदत करण्यास त्यांचा पाय नेहमीं पुढेंच. धर्मज्ञानाच्या बाबतीसाठीं लोक धडपडत येतात, हें पाहून त्यांचें अंतःकरण दयार्द्र होत असे. यामुळें त्यांची प्रकृति नादुरुस्त असतांही कोणाच्याही आग्रहास न जुमानतां अशा प्रकारचा नियम त्यांनीं केला नाहीं. " इतक्या लांबून पायपीठ करून बिचारे लोक येथें येतात आणि मी येथें खुशाल बसलेला असतां थोडीशी प्रकृति बिघडेल ह्मणून त्यांच्याशीं चार शब्दही मी बोलूं नये काय ? " असें ते ह्मणत.

चार वाजण्याच्या सुमारास बैठक संपवून बहुतेक मंडळी आपल्या घरोघर गेली. जे कांहीं थोडे गृहस्थ अद्यापिही मागें राहिले होते, त्यांजबरोबर इंग्लंड आणि अमेरिका वगैरे देशांबद्दल स्वामीजी बोलूं लागले. मध्येंच भाषणाच्या ओघांत ते ह्मणाले, " इंग्लंडाहून परत येत असतां मला एक चमत्कारिक स्वप्न पडलें. आमची बोट भूमध्यसमुद्रांतून चालली होती. इतक्यांत एक फार वृद्ध आणि दिसण्यांत अत्यंत आदरणीय असा एखाद्या ऋषीसारखा गृहस्थ मला दिसला. माझ्यापुढें येऊन तो मला ह्मणाला, 'तुह्मी इकडे येऊन आमची पूर्वस्थिति आह्मांस प्राप्त करून द्या. हिंदुस्थानांतील ऋषींनीं सांगितलेल्या ज्ञानाचा अवलंब करणारा एक पंथ प्राचीनकाळीं होता. त्या पंथापैकींच मी आहें. आह्मी ज्या ज्ञानाचा प्रसार केला तेंच ज्ञान येशू ख्रिस्ताच्या नांवानें ख्रिस्तीलोक इतरांस सांगत आहेत. खरें ह्मटलें तर येशू ख्रिस्त या नांवाचा कोणीं मनुष्य जन्मासच आला नव्हता. याबद्दल तुह्मांला कांहीं पुरावा हवा असेल तर ही जागा खणून पहा; ह्मणजे वाटेल तितका पुरावा येथें तुह्मांस सांपडेल.' मी ह्मटलें 'कोणती जागा आपण खणावयास सांगतां ? ज्या ठिकाणीं आपण ह्मणतां अशा प्रकारचा पुरावा आहे ती जागा मला दाखवा.' तुर्कस्थानच्या जवळच्या प्रदेशाकडे बोट करून तो ह्मणाला, 'ही ती जागा.' इतके शब्द ऐकून मी एकदम जागा झालों आणि बोटीच्या वरच्या मजल्यावर गेलों. कप्तानाला भेटून मी त्याला ह्मटलें, 'आतां आपली बोट कोठेंशी आहे बरें?' कप्तान ह्मणाला, ' तो पहा समोरच तुर्कस्थानचा प्रदेश आणि क्रीट बेट हीं दिसत आहेत. "

हें खरोखरच स्वप्न ह्मणावें कीं यांत कांहीं तथ्य असेल हें कोणीं सांगावें?

## ६

## कांहीं आठवणी—हिंदुस्थानांतील दुष्काळांचा प्रश्न आणि आत्मत्यागी तरुण मंडळी—पूर्व आणि पश्चिम—हा सत्त्वगुण कीं तमोगुण—भिकाऱ्यांचें राष्ट्र—परस्परविनिमय—तोंडावर टीका करा आणि इतरांपाशीं सद्गुण गा—प्रत्येकजणास विवेकानंद होतां येईल–अखंड ब्रह्मचर्यव्रत हेंच सर्व सामर्थ्याचें मूळ रहस्य–समाधि आणि कर्म.

[श्री. प्रियनाथ सिंह यांची रोजनिशी.]

आमचें घर स्वामीजींच्या घराजवळच होतें. ते आणि आह्मीं एकाच मोहोल्ल्यांत राहत असल्यामुळें इतर मुलांबरोबर मी त्यांच्याशींही खेळत असें. माझ्या लहानपणापासूनच स्वामीजींकडे माझा ओढा होता. तो महापुरुष होईल असें मला मनापासून वाटत असे. त्यांनीं संन्यास घेतला तेव्हां आह्मां सर्वांची मोठी निराशा झाली. त्यांच्या भावी मोठेपणाच्या ज्या कल्पना आमच्या चित्तांत होत्या, त्या आतां फुकट जाणार असें आह्मांस वाटलें.

ते अमेरिकेस निघून गेल्यानंतर शिकागो येथील महाधर्मपरिषदेंतील आणि अमेरिकेच्या इतर शहरांतील व्याख्यानांचा गोषवारा मी वर्तमानपत्रांत वाचला तेव्हां मी स्वतःशींच ह्मटलें ‘ वस्त्राखालीं अग्नि कधींही झांकून राहणार नाहीं.’ स्वामीजींच्या आंगीं असलेला स्फुल्लिंग ज्वालारूप झाल्याचें आह्मांस दिसून आलें. कळी बऱ्याच वर्षांनंतर उमलेली असल्याचें आमच्या प्रत्ययास आलें.

स्वामीजी स्वदेशीं परत आले ही गोष्ट कांहीं कालानंतर मला कळली. त्या वेळीं मद्रासेस त्यांचीं कित्येक उत्साहजनक भाषणें झालीं. हीं भाषणें मी वाचलीं, त्या वेळीं हिंदुधर्मांत इतकीं उदात्त प्रमेयें असून तीं इतक्या सुबोध रीतीनें विशद करतां येतात, या गोष्टीचें मला मोठें नवल वाटलें. स्वामीजींचें सामर्थ्य किती अचाट ह्मणावें ! हा काय मनुष्य कीं परमेश्वराचा अवतार ! स्वामीजी कलकत्त्यास आले तेव्हां सर्वत्र मोठा उत्साह पसरला. काशीपुरांत गंगानदीच्या तटाकीं असलेल्या सील यांच्या विश्रामबागेंत

त्यांच्या मागोमाग लोकांच्या झुंडीच्या झुंडी गेल्या. थोड्या दिवसांनंतर स्वामीजींच्या स्वागतार्थ एक मोठी सभा राजा राधाकांत देव यांच्या घरीं भरली होती. त्या वेळीं सभेनें दिलेल्या मानपत्रास स्वामीजींनीं मोठें उत्साहजनक उत्तर दिलें. कलकत्त्यांतील त्यांचें हें पहिलेंच भाषण होतें. हें भाषण ऐकून सारें शहर अगदीं तोंडतां बोट घालून राहिलें; पण ही हकीगत सर्वांस ठाऊक आहे.

स्वामीजी कलकत्त्यास आल्यानंतर त्यांची एकांतीं भेट घेण्यास आणि पूर्वीप्रमाणेंच त्यांच्याशीं मोकळेपणें चार शब्द बोलण्यास मी फार उत्सुक होऊन गेलों होतों; पण त्यांच्या भोंवतीं मंडळीचा ताफा सदोदित पडलेला. जावें तेव्हां मंडळी जमलेली असून प्रश्नोत्तरें सुरूच आहेत असा देखावा दृष्टीस पडे. यामुळें कांहीं काळपर्यंत त्यांची व माझी एकीकडे भेट झाली नाहीं. अखेरीस एके दिवशीं गंगातटाकीं फिरत असतां असा सुयोग आला. स्वामीजींचा मीं बाळपणींचा सवंगडी. तेव्हां माझ्याशीं ते पूर्वपरिचिताप्रमाणें अगदीं मोकळेपणानें बोलूं लागले; पण चार शब्द होतात न होतात तोंच त्यांस बोलावण्यावर बोलावणीं येऊं लागलीं. कित्येक गृहस्थ त्यांची भेट घेण्यास आले असल्याचें लोक त्यांस सांगू लागले. तेव्हां स्वामीजी ह्मणाले, “ वेड्या, मला थोडीशी तरी विश्रांति दे. हा माझा बाळपणींचा खेळगडी. याच्याशीं मला चार शब्द तरी बोलूं द्या. थोडा वेळ तरी मला पाय मोकळे केले पाहिजेत. त्या भल्या गृहस्थांना बसवून घे आणि पानसुपारी देऊन थोडा वेळ थांबण्याची विनंति कर.”

अशा रीतीनें त्या दूताची रवानगी स्वामीजींनीं करून दिल्यानंतर मी त्यांस ह्मटलें, “ स्वामीजी, आपण आतां साधु झालां. आपल्या स्वागताच्या खर्चासाठीं येथें वर्गणी गोळा करावी लागली. सध्यां तर दुष्काळ मी ह्मणतो. अशा स्थितींत लोकांवर कसलाही भार घालणें मला अयुक्त वाटतें. ‘ माझ्या स्वागतासाठीं एक पईसुद्धां खर्च न करतां ही सारी रक्कम दुष्काळ फंडाला द्या’ अशा अर्थाची तार तुह्मी कलकत्याहून कराल असें मला वाटलें होतें. पण आपण तसें कांहींच केलें नाहीं हें कसें ? ”

**स्वामीजी**–वा ! माझी तर इच्छा अशीच होती कीं, लोकांत प्रचंड उत्साह उत्पन्न व्हावा. लोकांनीं माझ्याभोंवतीं जमून उत्साह करावा अशीच माझी

इच्छा होती. असें कांहीं झाल्याशिवाय श्रीरामकृष्णांचें स्मरण त्यांस व्हावें कसें ? आणि त्यांच्या नांवानें लोकांच्या ठिकाणीं उत्साहाची भरती यावी कशी ? हें मोठें थाटाचें स्वागत केवळ माझ्याचसाठीं झालें असें तुला वाटतें काय ? यामुळें श्रीरामकृष्णांचें नांवही अधिक उज्ज्वल झालें नाहीं काय ? श्रीरामकृष्णांबद्दल अधिक माहिती मिळावी ह्मणून लोकांची तृष्णा किती तीव्र झाली पहा. श्रीरामकृष्णांबद्दल त्यांस यापुढें हळूहळू अधिक ज्ञान प्राप्त होईल. केवळ लोककल्याणार्थ ज्या पुरुषानें येथें अवतार घेतला त्याची माहितीसुद्धां जर लोकांस नाहीं तर त्यांचें कल्याण तरी कसें होणार ? रामकृष्णांचें खरें स्वरूप काय होतें हें लोकांच्या लक्ष्यांत आलें ह्मणजे खरे मर्द निर्माण होतील; आणि अशीं खरीं नाणीं निर्माण झालीं ह्मणजे तीं दुष्काळासारख्या आपत्तीस हां हां ह्मणतां देशांतून हांकून काढतील. यासाठीं कलकत्त्यांत कांहीं तरी चळवळ आणि उत्साह उत्पन्न व्हावा अशी माझी इच्छा होती. प्रचंड सभा भरावी आणि यायोगें श्रीरामकृष्णांच्या अवतारकार्याबद्दल लोकांत विश्वास उत्पन्न व्हावा अशीच माझी इच्छा होती. नाहीं तर केवळ माझ्यासाठीं एवढी गडबड कशास हवी होती? असल्या स्वागतांची मला काय पर्वा आहे ? अरे, तुझ्याबरोबर मी रस्त्यांत धुळींत खेळत होतों तेव्हांपेक्षां आतां काय मी मोठा झालों आहें ? पूर्वीसारखाच मी आतांही आहें. माझ्यांत तुला कांहीं बदल दिसतो ?

" नाहीं स्वामीजी; आपल्यांत ह्मणण्यासारखा कांहीं फरक नाहीं." असें उत्तर मी त्यांस दिलें खरें, तथापि हे आतां अवतारी पुरुष झाले आहेत असें माझ्या मनांत आल्यावांचून मात्र राहिलें नाहीं.

स्वामीजी पुढें बोलूं लागले, " दुष्काळ हा तर आपला आतां नेहमींचाच पाहुणा होऊन बसला आहे. आमची सर्व भूमि तो आतां जणूं काय दग्ध करीत आहे. दुसऱ्या कोणत्याही देशांत इतक्या वारंवार दुष्काळ पडल्याचें तुह्मांस ठाऊक आहे काय ? नाहीं. आणि याचें कारण इतकेंच कीं इतर देशांत खरीं मनुष्यें राहतात; आणि आमच्या देशांतलीं माणसें जवळ जवळ दगडविटांच्याच वर्गांत गणण्यास हरकत नाहीं. त्यांच्यांत कर्तृत्व कसलें तें नाहींच. श्रीरामकृष्णांच्या चरित्रापासून बोध घेऊन आमच्या लोकांनीं प्रथम आपलपोटेपणा सोडला पाहिजे. श्रीरामकृष्णांच्या चरित्राचें खरें

स्वरूप काय होतें याचा अभ्यास त्यांनीं केला पाहिजे. इतकें झालें ह्मणजे वारंवार पडणाऱ्या या दुष्काळास आळा घालण्याचे खरे प्रयत्न सुरू होतील. त्या मार्गानें हळूहळू मीही कांहीं कार्य करणार आहें हें तुला दिसेलच.

**मी**—असें झालें तर फारच उत्तम होईल. तर मग आपण आतां येथें पुष्कळ व्याख्यानें देणार असाल; नाहीं तर रामकृष्णांची ओळख लोकांस कशी पटणार ?

**स्वामीजी**—छे, छे ! असें वेड्यासारखें काय बोलतोस ? त्यांच्या नांवाची ओळख लोकांस पटण्याची आतां कांहीं बाकी राहिली आहे काय ? त्या दृष्टीनें आजपर्यंत पुष्कळ कामगिरी झाली आहे. आमच्या या देशांत नुसत्या व्याख्यानाचा उपयोग फारसा होत नाहीं. आमचे सुशिक्षित लोक हीं व्याख्यानें ऐकून घेतील आणि फारच झालें तर मोठ्यानें टाळ्या पिटून 'भले शाबास! वाहवा! ' असें ह्मणतील; पण यापलीकडे मात्र त्यांची मजल जाणार नाहीं. सभामंडपांतून ते एकवार घरीं गेले कीं जेवणाबरोबर तें व्याख्यानही पचवून नाहींसें करतील. गंजलेल्या जुन्यापुराण्या लोखंडाच्या तुकड्यावर घणाचे कितीही घाव घातले तरी त्याचा काय उपयोग ? अशानें त्याचा भुगा मात्र होईल. तें प्रथम लाल होईपर्यंत तापविलें पाहिजे; आणि मग घणाचा प्रयोग त्यावर केल्यास वाटेल तो आकार त्याला देतां येईल. आमच्या देशांत कडकडीत आणि जिवंत उदाहरण लोकांच्या नजरेसमोर नित्य असल्या-शिवाय त्यांच्या हातून कोणतेंही कार्य व्हावयाचें नाहीं. आपल्या देशासाठीं स्वतःच्या जिवाचाही होम करणारे आणि सर्वस्वावर पाणी सोडण्यास तयार असे तरुण आज आह्मांस हवे आहेत. त्यांचा आयुष्यक्रम प्रथम सुसंघटित झाल्यानंतर त्यांच्या हातून कांहींतरी खरें कार्य होण्याची आशा आहे.

**मी**—स्वामीजी, स्वतःच्या धर्माचा ओ ना मासुद्धां ठाऊक नसणारे किती तरी तरुण पुरुष ख्रिस्ती अथवा मुसलमान होतात. असल्या लोकांसाठीं कांहीं खटपट करण्याऐवजीं हिंदुधर्मप्रसारार्थ तुह्मी इंग्लंडास आणि अमेरि-केस गेलां या गोष्टीचें पुष्कळ वेळां मला मोठें कोडें पडे.

**स्वामीजी**—काल बदलला आहे ही गोष्ट प्रथम लक्ष्यांत घेतली पाहिजे. खऱ्या धर्मास अनुसरून आपलें आचरण ठेवण्यास जें सामर्थ्य लागतें, तें आमच्या लोकांच्या आंगीं आहे काय ? आपण सात्विक आहों अशी नुसती

घमेंड मात्र त्यांजपाशीं पुष्कळ आहे. पूर्वकाळीं आपले लोक खरोखर सात्विक होते यांत संशय नाहीं; पण घसरतां घसरतां आतां ते तळच्या पायरीस गेले आहेत. सत्वगुणांतून अध:पतन झालें ह्मणजे पुढचा मुक्काम तमोगुणांत व्हावयाचा. आमच्या लोकांचें असेंच झालें आहे. आपल्या खोलींत हात जोडून बसून नुसता 'हरी हरी' करणारा आणि स्वत:च्या डोळ्यांसमोर जुलूम आणि बळजबरी यांचें साम्राज्य दिसत असतां तें थंड डोळ्यांनीं पाहणारा मनुष्य सत्वगुणी म्हणतां येईल काय ? छे ! छे ! हें सत्वगुणाचें लक्षण नव्हे. असा मनुष्य पूर्णपणें तमोगुणांत बुडाला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. स्वत:च्या पोटाची आग शमविण्यापुरतें खाण्यास मिळण्याचीही जेथें पंचाईत तेथले लोक धर्माभ्यास तरी कसचा करणार ? ज्यांची भोगेच्छा अंशत:-सुद्धां तृप्त झाली नाहीं असले लोक त्यागी कसे होणार ? याकरितां पोटभर खायला मिळेल असे मार्ग प्रथम शोधून काढले पाहिजेत. आणि संसारांतील सुखें त्यांच्या पदरीं पुरेशीं पडतील अशी तजवीज केली पाहिजे. यानंतर खरें वैराग्य हळूहळू येईल. वैराग्यप्राप्तीनंतर खऱ्या धर्ममार्गाचेंही आचरण ते करूं लागतील. अमेरिकेंतले आणि इंग्लंडांतले लोक किती रजोगुणी आहेत पहा. ऐहिक भोग भोगून भोगून ते आतां तृप्त झाले आहेत. त्यांचा ख्रिस्तीधर्म ह्मणजे आमच्या पौराणिक धर्माच्या स्वरूपाचा आहे. त्यांत अंधविश्वास हाच मोठा गुण. संस्कृति आणि शिक्षण यांचा प्रसार पाश्चात्य लोकांत झाल्यामुळें ख्रिस्तीधर्मांत त्यांस समाधान मिळेनासें झालें आहे. या वेळीं त्यांना थोडासाही टेंकू मिळाला तरी चटकन् ते सत्त्वगुणांत प्रवेश करतील. सध्यांचे दिवस असे आले आहेत कीं, एखाद्या गौरकायाच्या तोंडून हिंदुधर्मावरचीं व्याख्यानें तुह्मीं ऐकलीं तर त्याजवर तुमचा जसा विश्वास बसेल, तसा तो चिंधी पांघरणाऱ्या संन्याशाच्या शब्दावर बसावयाचा नाहीं.

**मी**--खरें आहे महाराज; घोसबाबूसुद्धां अगदीं असेंच ह्मणत होते.

**स्वामीजी**--माझे पाश्चात्य शिष्य योग्य शिक्षण आणि अनुभव घेऊन इकडे येऊन तुह्मास कांहीं उपदेश करूं लागले ह्मणजे तुमच्यांतले बडे आणि वजनदार लोकसुद्धां त्यांचीं भाषणें ऐकण्यास उत्सुक होतील हें तुला दिसेलच. ते माझे पाश्चात्य शिष्यच तुह्मांस विचारतील कीं तुह्मीं काय करीत बसलां आहां ? तुमचा आत्मविश्वास कोठें गेला ? तुमचा क्रियाकलाप, तुमचा

धर्म, तुमच्या चालीरीती आणि तुमची नीति हीं आमच्या नीतीहून कोणत्या दृष्टीनें उणीं आहेत? अशा प्रकारचीं भाषणें ते करूं लागले ह्मणजे तुमच्यांतील मोठे लोकसुद्धां त्यांस माना डोलवितील. अशा रीतीनें आपल्या देशांत त्यांस पुष्कळ सत्कार्य करतां येईल. आतां धर्माच्या बाबतींत ते तुमच्या गुरुस्थानीं येऊन बसतील असें समजण्याचें मात्र मुळींच कारण नाहीं. भौतिक शास्त्रांच्या बाबींत मात्र ते तुमचे गुरु होतील हें खरें. लोकांची ऐहिक स्थिति सुधारण्याच्या बाबतींत पाश्चात्यांनीं तुमचें गुरुपण स्वीकारावें आणि धार्मिक ज्ञानाच्या बाबतींत आपल्या लोकांनीं त्यांचें गुरुपण करावें हेंच योग्य. धर्माच्या बाबतींतलें हें गुरुशिष्यांचें नातें हिंदुस्थान आणि इतर देश यांमध्यें चिरकाल असेंच रहावयाचें.

**मी**--स्वामीजी, आपण ह्मणतां ही गोष्ट होईल तरी कशी ? ते लोक आह्मांकडे तुच्छता बुद्धीनें पाहतात. अशा स्थितींत केवळ परार्थ बुद्धीनें ते आमचें कल्याण करतील ही गोष्ट मुळींच शक्य दिसत नाहीं.

**स्वामीजी**—आमचा द्वेष करण्यास त्यांस पुष्कळ कारणें आहेत; आणि आम्ही द्वेषास योग्यच आहोंत असेंही ते दाखवूं शकतील. प्रथम असा विचार केला पाहिजे कीं आपण जिंकलेले लोक आहों आणि याशिवाय आमच्या इतकें भिक्षुकी राष्ट्र साऱ्या दुनयेंत दुसरें एकही नाहीं. वरच्या वर्गानें खालच्या वर्गास हजारों वर्षें एकसारखें पायाखालीं तुडविल्यामुळें खालच्या वर्गाच्या अंगांतलें पौरुष समूळ नष्ट झालें असून तो वर्ग जणूं काय धंदेवाईक भिकाऱ्यांचाच होऊन बसला आहे; आणि जे इंग्रजी भाषेंत थोडेसे र ट फ करावयास शिकले ते लोक खाखोटीस अर्जांचीं भेंडोळीं बांधून सरकारी कचेऱ्यांच्या दरवाज्याभोंवतीं गोंडा घोळीत असतात. पंचवीस तीस रुपड्यांची एखादी जागा रिकामी झाली कीं पांचशें बी. ए., एम्. ए. चे अर्ज तेथें जाऊन धडकतात. कांहीं कांहीं अर्जांची भाषा तर खरोखर नमूनेदार असते. " महाराज, माझ्या घरीं खावयास अन्न नाहीं; माझीं बायकापोरें उपाशीं मरत आहेत. आपण दयाळु होऊन मला आणि माझ्या कुटुंबास अन्नदान करा. नाहीं तर आह्मी सारे भुकेनें मरून जाऊं. " हे लोक नोकरींत शिरले ह्मणजे आपला सारा स्वाभिमान दशदिशांस उधळून लावतात. त्यांची नोकरी ह्मणजे अत्यंत वाईट प्रकारची गुलामगिरीच ह्मणावयास हरकत नाहीं. आपल्या देशांतील

सामान्य वर्गाची स्थिति या प्रकारची आहे. आतां ज्या लोकांनीं उच्च शिक्षण घेतलें आहे आणि स्वतःस जे पुढारी ह्मणवितात ते तरी काय करतात? ते मंडळ्या आणि सभा स्थापन करतात; आणि "हाय! हाय! हिंदुस्थान बुडाला हो बुडाला. अहो इंग्रज राज्यकर्त्यांनो! राज्यांतील उच्च दर्ज्याच्या जागा आमच्या लोकांस द्या आणि दुष्काळाच्या जबड्यांतून आम्हांस मुक्त करा!!" असें तारस्वरानें ओरडत असतात. अशा रीतीनें अहोरात्र 'दे दाता!' 'दे दाता!' अशा प्रकारचा जप उच्च स्वरानें करीत असतात. त्यांच्या साऱ्या भाषणाचा निष्कर्ष काढला तर 'आह्मांस द्या!' 'आह्मांस आणखी द्या!' यावांचून दुसरा कोणताही निघणार नाहीं. अरे वेडप्यांनो, त्यांनीं तुह्मांस आणखी द्यावें तरी किती? त्यांनीं तुह्मांस आगगाड्या दिल्या, तारायंत्रें दिलीं आणि सुसंघटित राज्यव्यवस्था दिली. त्यांनीं चोराचिलटांचा बंदोबस्त केला, त्यांनीं आधिभौतिक शास्त्रांचें शिक्षण दिलें. आतां त्यांनीं अधिक द्यावें तरी काय? केवळ परमार्थ बुद्धीनें कोणी तरी याहून अधिक असें दुसऱ्यास काय देणार? त्यांनीं तुह्मांस इतक्या गोष्टी तरी निःसंशय दिल्या आहेत. आतां मी असें विचारतों कीं तुह्मी याचा मोबदला त्यांस कोणत्या रीतीनें दिला आहे?

**मी**—महाराज, आमच्याजवळ देण्यासारखें आहे तरी काय? आह्मी कर देतों.

**स्वामीजी**—कर तरी तुह्मी होऊन देतां काय? तुह्मी आपखुषीनें कर देतां कीं सरकार शांतता राखतें, ह्मणून तें सक्तीनें तुह्मांकडून कर वसूल करतें? त्यांनीं तुमच्यासाठीं ह्मणून आजपर्यंत जें जें कांहीं केलें त्याचा मोबदला तुह्मी काय दिला आहे याचें अगदीं खरें आणि स्पष्ट उत्तर मला द्या. त्यांजपाशीं नाहीं अशीही एक जिन्नस तुह्मीं त्यांस देण्यासारखी आहे. तुह्मीं इंग्लंडास जातां पण तेसुद्धां भीक मागण्यासाठींच जातां. तेथें जाऊन तुह्मीं शिक्षणासाठीं हात पसरतां. दुसरे कांहीं लोक जातात ते प्रसंगीं पाश्चात्यांच्या धर्माचीच तारीफ करतात आणि परत येतात. वा! केवढी ही कर्तबगारी! त्यांस देण्यासारखी एकही वस्तु खरोखरीच तुमच्यापाशीं नाहीं काय? तुमचा धर्म आणि तुमचें तत्त्वज्ञान हा अमूल्य सांठा तुमच्याजवळ आहे, तो तुह्मांस त्यांस देतां येईल. साऱ्या जगाच्या इतिहासाचें तुह्मी अवलोकन केलें तर कोणत्याही देशांत प्रचलित असलेल्या अमूल्य विचारांचा मूळ उगम हिंदुस्थानांतूनच झाला

आहे असें तुह्मांस आढळून येईल. मूल्यवान् विचार प्रसवणारी एकच खाण जगांत आहे; ती खाण हिंदुस्थान ही होय. अनंतकाळापासून असे विचार एकंदर मानवकुलास भरतभूमि देत आली आहे. स्वतःच्या उदरांतून उत्पन्न होणारीं हीं बिनमोल रत्नें सढळ हातानें व किमतीशिवाय साऱ्या जगास ती आजवर वांटीत आली आहे. भरतभूमींत निर्माण झालेलीं उच्च ध्येयें, वेदांत तत्त्वज्ञान आणि तुमच्या सनातन धर्मांतील गूढ प्रमेयें हीं हस्तगत करून घेण्याकरितां इंग्रज लोक हिंदुस्थानांत आले आहेत. तुह्मी त्यांजकडून जें कांहीं घेतां त्याच्या मोबदल्यांत हीं रत्नें तुह्मी त्यांच्या स्वाधीन करा. आह्मी हिंदु लोक ह्मणजे शुद्ध भिक्षुक आहों असा आक्षेप पाश्चात्य लोक आह्मांसंबंधीं घेत असतात. तो आक्षेप दूर करण्याकरितांच भगवंतानें मला त्यांच्या देशीं नेलें. केवळ भिक्षा मागण्याकरितांच इंग्लंडास जाणें हें आपणास मुळींच उचित नाहीं. त्यांनीं आपणास रोज रोज काय ह्मणून भीक घालावी? अशा प्रकारची भीक कधीं तरी कोणी नेहमीं घालील काय? भिकाऱ्यासारखे सदोदित हात पसरणें हें सृष्टीच्या कायद्यासही सोडून आहे. परस्परविनियम अथवा ‘ दे वाण घे वाण ’ हा सृष्टीचा कायदा आहे. जी व्यक्ति, जो वर्ग अथवा जें राष्ट्र हा कायदा पाळीत नाहीं, त्याचें जीवित कधींही भरभराटीचें व्हावयाचें नाहीं. हा कायदा पाळणें आपणासही भाग आहे. मी अमेरिकेस गेलों त्याचें कारण हेंच. तेथील लोकांस धर्मज्ञानाची तृषा सध्यां इतकी जबर लागली आहे कीं, मजसारखे हजारों लोक तेथें गेले तरी त्या सर्वांस तेथें पुरेसें कार्यक्षेत्र मिळेल. आपणापाशीं जी कांहीं संपत्ति होती ती ते तुह्मांस आज पुष्कळ काळपर्यंत देत आले आहेत. आतां आपल्या बिनमोल ठेव्याचे त्यांस भागीदार करण्याची वेळ आली आहे. असें झालें ह्मणजे त्यांच्या ठिकाणची तुच्छताबुद्धि नष्ट होऊन तिच्या जागीं तुमच्याबद्दल विश्वास, भक्ति आणि आदर हीं कशीं उत्पन्न होतात हें तुह्मांस दिसून येईल; आणि तुमच्या देशासाठीं निरपेक्ष बुद्धीनें ते कसे झटतील हेंही तुह्मांस आढळून येईल. पाश्चात्य लोक शूर आहेत. ते कधींही उपकार विसरत नाहींत.

**मी**—महाराज, पश्चिमेकडील आपल्या भाषणांत आमच्या लोकांच्या विशिष्ट बुद्धिमत्तेचा आणि सद्गुणांचा उल्लेख आपण वारंवार आणि आवेशयुक्त

केला आहे. आमच्या ठिकाणीं धर्मप्रेम किती जाज्वल्य आहे हें पटवून देण्याजोगा भक्कम पुरावा आपण त्या लोकांपुढें मांडला आहे. पण आतां आपण ह्मणतां कीं आह्मीं शुद्ध तमोगुणी झालों आहों; आणि असें असतांही ऋषिप्रणीत सनातनधर्म जगास शिकविण्याचा मक्ता आह्मांकडेच आहे असेंही आपण ह्मणतां. या साऱ्या परस्परविरोधांचा मेळ तरी कसा बसवावयाचा ?

**स्वामीजी**--साऱ्या जगांतील देशांपुढें जाऊन तुमची नाचक्की मी करावी असें तुझ्या मनांत आहे काय ? राष्ट्र ह्मणून तुमच्या आंगीं जे विशिष्ट गुणधर्म आहेत, तेच परकीयांच्या नजरेस मी आणावे हें अधिक उचित नाहीं काय ? एखाद्याचे दुर्गुण ममताळूपणें पण त्याच्यासमोर बोलावे हें चांगलें. अशामुळें त्याची खात्री लवकर पटते, आणि तो सुधारणेच्या मार्गास लागतो; पण इतरांपाशीं तुह्मी त्याचे सद्गुणच गाइले पाहिजेत. “ एखाद्या वाईट मनुष्याला तो चांगला आहे असें वारंवार ह्मणत गेलें तर कालेंकरून तो खरोखरच चांगला होतो आणि अशाच रीतीनें चांगल्याचा वाईटही होतो ” असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत. पाश्चात्य लोकांत काय उणीवा आहेत त्या मी भरपूर रीतीनें त्यांजसमोर मांडल्या आहेत. माझ्यापूर्वी जे जे लोक तिकडे गेले त्या सर्वांनीं तेथें तुमची मनसोक्त निंदा केली आहे हें विसरूं नका. तसेंच पाश्चात्यांची स्तुतीही त्यांनीं त्यांजसमोरच भरपूर केली आहे. अशा स्थितींत ते आमचा द्वेष करण्यास शिकले यांत नवल मानण्यासारखें कांहीं नाहीं. याच कारणासाठीं तुमचे सद्गुण मी त्यांच्या निदर्शनास आणले आणि त्यांचे स्वतःचे दुर्गुण त्यांस उघडे करून दाखविले. तसेंच तुमचा कमीपणा आतां मी तुम्हांस दाखवीत असून त्यांचे सद्गुण तुम्हांपुढें मी गात आहें. तमोगुणांत तुह्मी कितीही बुडून गेलां असलां तरी प्राचीन ऋषींच्या स्वभावाचा अत्यंत अल्प तरी अंश तुह्मांमध्यें अद्यापिही निःसंशय आहे. किमानपक्ष त्या सनातनधर्माचा सांगाडा तरी तुह्मी अद्यापि जिवंत ठेवला आहे. असें आहे तथापि वाटेल त्यानें उठावें आणि धर्मगुरु होऊन पाश्चात्य देशांत जावें असा मात्र माझ्या ह्मणण्याचा आशय नाहीं. प्रथम एकांतवास स्वीकारून आपला आयुष्यक्रम धर्मतत्त्वांस अनुरूप असा बनविला पाहिजे. आपण पूर्ण त्यागी बनलें पाहिजे. त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यव्रताचें अखंड परि-

पालनही आपण केलें पाहिजे. तुह्मी आज तमोगुणी झालां असलां ह्मणून काय झालें ? त्या तमाचा नाश करणें शक्य नाहीं काय ? ही गोष्ट क्षणार्धांत करतां येईल. तमोगुणाचा नाश करावा याच कार्यासाठीं भगवान् श्रीरामकृष्ण आपणामध्यें अवतरले.

**मी**--आपणासारखें व्हावें ही भलतीच हांव कोण धरील ?

**स्वामीजी**--माझ्यामागें दुसरा एकही विवेकानंद होणार नाहीं असें का तुला वाटतें ? थोड्याच वेळापूर्वीं जो तरुणांचा संघ मजसमोर भजन करून गेला, त्यांतील प्रत्येकजण परमेश्वराची कृपा होईल तर विवेकानंद होईल. आज तुह्मी त्यांस तुच्छ समजत आहां. भांगगांजाच्या निशेंत धुंद होणारे ते आहेत असें तुह्मी समजत आहां; पण परमेश्वराच्या कृपेनें त्यांतील प्रत्येकजण एक एक विवेकानंद होईल. जगाला जरूर असेल तर विवेकानंदांची वाण पडणार नाहीं. हजारों आणि लक्षावधि विवेकानंद कोठून येतात तें तुह्मांस समजणारदेखील नाहीं. मी जें कांहीं कार्य केलें आहे तें विवेकानंद या व्यक्तीचें नाहीं हें तुह्मी निःसंशय समजा. हें कार्य खुद्द भगवंताचें आहे. एक गव्हर्नर जनरल गेला तर बादशहा त्याच्या जागीं दुसरा पाठवतो. तुह्मी तमोगुणांत कितीही बुडालां असलां तरी मनोभावानें आणि अंतःकरणपूर्वक भगवंताच्या आश्रयास तुह्मी गेलां तर तुमच्या सर्व अडचणी दूर होतील यांत संशय बाळगूं नका. हीच वेळ योग्य आहे. जगाला लागलेल्या रोगावर रामबाण मात्रा देणारा वैद्य आला आहे. त्याचें नांव घेऊन तुह्मी कार्यास आरंभ केला तर आपलें प्रत्येक कार्य तुमच्याद्वारें तो पार पाडील. तमोगुणाचेंच रूपांतर एकदम अत्युच्च सत्त्वांत होईल.

**मी**—स्वामीजी, आपण कांहींही ह्मणालांत तरी तें मला खरें वाटत नाहीं. तत्त्वज्ञानाची चर्चा करण्यास लागणारें वक्तृत्व आपणासारखें कोणास प्राप्त झालें आहे ?

**स्वामीजी**--अरे तुला माहीत नाहीं; ही शक्ति कोणाच्याही अंगीं येईल. बारा वर्षेंपर्यंत कडकडीत ब्रह्मचर्य जो अखंडपणें पाळतो आणि ज्याला केवळ परमेश्वराच्या भेटीचीच इच्छा उरलेली असते, त्याला असें सामर्थ्य प्राप्त होत असतें. अशाच प्रकारचें ब्रह्मचर्य मी पाळलें आहे. यामुळें माझ्या

मेंदूवरचा जणूं काय एक पडदा निघून गेल्यासारखें झालें आहे. यामुळें तत्त्वज्ञानासारख्या सूक्ष्म विषयावर सुद्धां व्याख्यान देण्याकरितां कांहीं पूर्व-तयारी मला मुळींच करावी लागत नाहीं. मला उद्यांच एखादें व्याख्यान द्यावयाचें आहे असें समज. अशा वेळीं आज रात्रीं उद्यांच्या विषयाबद्दलचीं सर्व चित्रें जणूं काय माझ्या डोळ्यांसमोर वावरतात आणि मी जें कांहीं पाहिलेलें असतें, तेंच शब्दरूपानें मी माझ्या व्याख्यानांत सांगतों. बारा वर्षेंपर्यंत अखंड ब्रह्मचर्य जो कोणी पाळील त्याला असें सामर्थ्य खचित प्राप्त होईल. ही शक्ति माझ्या एकट्याच्याच वांट्यास आली नाहीं हें आतां तुझ्या लक्ष्यांत आलें असेलच. असें ब्रह्मचर्य तूं पाळलेंस तर तुलाही तें सामर्थ्य प्राप्त होईल. अमक्या एका मनुष्यालाच या सामर्थ्याचा लाभ होईल आणि दुसऱ्या कोणास तो होणार नाहीं असें आमचीं शास्त्रें मुळींच ह्मणत नाहींत.

**मी**—महाराज, संन्यास घेण्यापूर्वी एके दिवशीं आपण सारे......च्या घरांत बसलों असतां समाधीचें रहस्य आपण आह्मांस समजावून सांगत होतां हें आपणास आठवतें काय? त्या वेळीं कलियुगांत समाधीचा अनुभव होणें शक्य नाहीं असा आक्षेप मी घेतला होता. तेव्हां आपण ह्मणालां, "तुला समाधि पहावयाची आहे काय? अथवा तिचा अनुभव तुला स्वतःला घ्यावयाचा आहे काय? मला स्वतःला त्या स्थितीचा अनुभव आहे आणि हवें असल्यास तुलाही तो अनुभव मी देईन." आपलें भाषण संपतें न संपतें तोंच एक परका गृहस्थ तेथें आल्यामुळें आपला विषय तितकाच राहिला.

**स्वामीजी**—हो; तो प्रसंग मला आठवतो खरा.

मला समाधिसुखाचा अनुभव देण्यासंबंधाची गोष्ट मी पुन्हां काढतांच ते ह्मणाले, आज कित्येक वर्षें एकसारखें काम केल्यामुळें आणि एकसारखीं व्याख्यानें दिल्यामुळें माझ्या अंगीं रजोगुणाचा प्रादुर्भाव झाला आहे. यामुळें माझ्या अंगच्या सामर्थ्यावर सध्यां जणूंकाय दडपण पडल्यासारखें झालें आहे. सर्व कर्में सोडून मी हिमालयांत गेलों आणि एकांतांत कांहीं काळपर्यंत ध्यानस्थ बसलों तर ती शक्ति मजमध्यें पुन्हां प्रज्वलित होईल.

७.

## कांहीं आठवणी-प्राणायाम-परविचारप्रवेश-पूर्वजन्मज्ञान.

[ श्री. प्रियनाथ सिंह यांच्या खासगी रोजनिशीवरून. ]

स्वामीजींचें दर्शन घ्यावें या हेतूनें आणखी एकदोन दिवसांनीं मी घराच्या बाहेर पडलों. दारांतच माझे दोन स्नेही मला भेटले. प्राणायामाबद्दल स्वामीजींपासून कांहीं माहिती घेण्याचा त्यांचा उद्देश होता. यासाठीं तेही मजबरोबर यावयास निघाले. राजा, देवता आणि संन्यासी यांचें दर्शन रिक्त हस्तानें घेऊं नये अशी शास्त्राज्ञा माझ्या कर्णपथावर आलेली असल्यामुळें आह्मी कांहीं फळफळावळ व मिठाई घेतली व महाराजांच्या दर्शनास गेलों. फळफळावळ व मिठाई हातीं घेऊन त्यांनीं ती आपल्या मस्तकाकडे नेली व त्यांचें पादवंदन आह्मीं करण्यापूर्वींच त्यांनीं आह्मांस वंदन केलें. माझ्या दोन स्नेह्यांपैकीं एकजण स्वामिजींचा साहाध्यायी होता. स्वामीजींनीं त्याला ताबडतोब ओळखलें आणि त्याच्या प्रकृतिस्वास्थ्याबद्दल आणि योगक्षेमाबद्दल त्याजपाशीं विचारपूस केली. नंतर त्यांनीं आम्हांस जवळ बसवून घेतलें. या वेळींही त्यांचें दर्शन घेण्यास व त्यांचें भाषण ऐकण्यास उत्सुक अशी बरीच मंडळी आली होती. कांहीं गृहस्थांच्या थोड्याशा प्रश्नांस उत्तरें देऊन झाल्यावर भाषणाच्या ओघांत प्राणायामाबद्दल ते बोलूं लागले. प्रथम मनापासून जड द्रव्याची उत्पत्ति कशी होते हें त्यांनीं अर्वाचीन शास्त्रांच्या सहाय्यानें स्पष्ट करून दाखविलें व नंतर प्राणायाम ह्मणजे काय हें ते सांगूं लागले. त्यांचा राजयोगावरील ग्रंथ पूर्वीं आह्मी तिघांनींही काळजीपूर्वक वाचला होता. तथापि पुस्तकांत दिसून आलेलें त्यांचें ज्ञान त्यांच्या प्रत्यक्ष ज्ञानापुढें कांहींच नाहीं असें आह्मांस त्या दिवशीं दिसून आलें. ते जें कांहीं सांगत होते तें केवळ पुस्तकी ज्ञान नव्हतें हें मला तेव्हांच दिसून आलें. कारण धर्माचीं अत्यंत गूढ प्रमेयें ते इतक्या सोप्या, विस्तृत आणि मनोवेधक पद्धतीनें विशद करीत होते कीं, सत्याचा प्रत्यक्ष अनुभव असल्यावांचून असल्या गोष्टी केवळ शास्त्रांच्या साहाय्यानें इतक्या स्पष्टपणें सांगणें शक्यच नाहीं.

दुपारच्या साडेतीन वाजल्यापासून तों संध्याकाळीं साडेसातपर्यंत प्राणायामावर त्यांचें भाषण चालू होतें. कचेरी बरखास्त होऊन आह्मी तेथून

निघालों. वाटेंत माझे स्नेही मला ह्मणाले, " आमच्या मनांतला प्रश्न स्वामीजींस कळला तरी कसा ? ही गोष्ट तुह्मी त्यांस अगाऊ कळविली होती काय ?"

या प्रसंगानंतर कांहीं दिवसांनीं बाग बझारांतील प्रियनाथ मुकर्जी यांच्या घरीं स्वामीजींच्या दर्शनाचा लाभ मला झाला. या वेळीं स्वामी ब्रह्मानंद, स्वामी योगानंद, बाबू जी. सी. घोस, अतुल बाबू आणि दुसरेही एकदोन स्नेही होते. मी ह्मटलें, स्वामीजी, त्या दिवशीं मजबरोबर जे दोघे गृहस्थ आपल्या दर्शनाला आले होते, त्यांच्या मनांत प्राणायामाबद्दल कांहीं शंका आपणास विचारावयाच्या होत्या. आपण इकडे येण्यापूर्वी राजयोगावरील आपला ग्रंथ त्यांनीं वाचला होता. त्या वेळीं त्यांना आलेल्या कांहीं शंका त्यांनीं मजपाशीं बोलून दाखविल्या होत्या; पण त्या दिवशीं त्यांनीं स्वतः कोणताही प्रश्न विचारला नसतांना आपण स्वतः होऊनच त्या शंका काढून त्यांजवर विस्तृत निरूपणही केलें, या गोष्टीचें त्या दोघांना मोठें नवल वाटलें. याबद्दल आपणाजवळ मी पूर्वीच कांहीं बोललों होतों कीं काय, असेंही त्यांनीं मला विचारलें. स्वामीजींनीं उत्तर दिलें, पाश्चात्य देशांत सुद्धां पुष्कळ वेळां असा प्रकार घडून आला. तेव्हां ' आमच्या मनांतल्या शंका तुह्मांस कशा समजल्या ? ' असा प्रश्न तिकडील लोकही मला करीत असत. माझ्यासंबंधीं हा प्रकार वारंवार घडत नाहीं; पण श्रीरामकृष्णांसंबंधीं मात्र असें नेहमींच घडे.

या प्रश्नासंबंधीं बोलतां बोलतां अतुल बाबू ह्मणाले, "स्वामीजी, आपल्या पूर्वजन्मासंबंधींच्या सर्व गोष्टी कोणालाही जाणतां येतात असें आपण आपल्या राजयोगावरील ग्रंथांत ह्मटलें आहे. आपले स्वतःचे पूर्वजन्म आपणास आठवतात काय ? "

**स्वामीजी**—हो; बरोबर आठवतात.

**अतुलबाबू**—आपणास काय काय आठवतें ? आह्मांस त्या गोष्टी सांगण्यास कांहीं नड आहे काय ?

**स्वामीजी**—वाटल्यास मला त्या जाणतां येतील. अथवा असें कशाला ? मला त्या ठाऊक आहेतच; तथापि त्यासंबंधीं कांहीं न बोलणेंच मला बरें वाटतें.

८

# पौर्वात्य आणि पाश्चात्य गायनकला व संगीतशास्त्र.

[ श्रीयुत प्रियनाथ सिंह यांच्या खासगी रोजनिशीवरून. ]

बेलूर येथील नीलांबर मुकर्जींच्या उद्यानगृहांत आज आह्मी बसलों होतों. इ. स. १८९८ च्या जुलै महिन्याचे दिवस. संध्याकाळची वेळ होती. स्वामीजी आणि त्यांचे शिष्य ध्यानस्थ बसले होते. ध्यान संपल्यानंतर ते एका खोलींत येऊन बसले. पाऊस खूब पडत होता; आणि वाराही खूब झपाट्यानें व गार वाहात होता. स्वामीजींनीं दरवाजा बंद केला आणि ते गाऊं लागले. गाणें संपल्यानंतर संगीतशास्त्राबद्दल चर्चा सुरू झाली. पाश्चात्यांचें संगीत कसल्या प्रकारचें आहे याबद्दल स्वामी शिवानंदांनीं एक प्रश्न केला.

**स्वामीजी**--वा ! पाश्चात्य संगीतही फार चांगलें आहे. त्यांत जशी पूर्ण एकतानता आहे तशी ती आपल्यांत नाहीं. आपल्या कानांना तें ऐकण्याचें शिक्षण नसल्यामुळें आपणास तें बरें वाटत नाहीं. यामुळें युरोपीय गवयांचें गाणें आणि कोल्हेकुई हीं आपणास सारखींच वाटतात. मलाही प्रथम असेंच वाटत होतें; पण त्यांचें गाणें मी लक्षपूर्वक ऐकूं लागलों आणि सूक्ष्म दृष्टीनें त्याचा अभ्यास मी केला, तेव्हां तें हळूहळू मला समजत चाललें व त्याजबद्दलचा माझा आदरही वाढत चालला. प्रत्येक कलेची अशीच स्थिति आहे. अत्यंत सफाईदार अशा प्रकारचें एखादें चित्र आपण पाहिलें तर त्याचें खरें सौंदर्य कोठें आहे हें आपल्या लक्ष्यांत येत नाहीं. तसेंच कांहीं अंशीं डोळ्यांला शिक्षण मिळालें असल्यावांचून त्यांतील रंगांचें नाजुक मिश्रण आणि रंगांचें परस्पर संम्मेलन यांची खुबी आपल्या लक्ष्यांत येत नाहीं. चित्रकलेंतील खरें मर्म याच गोष्टींत असतें. आपल्यांतील खरें संगीत, कीर्तन आणि ध्रुपद यांत दिसून येतें. बाकीच्या भागावर मुसलमानी पद्धतीची छाया पडल्यामुळें तें दुष्ट होऊन गेलें आहे. टप्प्याचें तें मुरकत मुरकत आणि नाकांतलें गाणें हें खरोखर चांगल्या प्रतीचें गाणें आहे असें तुह्मांस वाटतें काय ? खरें गाणें असें नाहीं. प्रत्येक सूर स्पष्ट होण्यास त्याला योग्य अवकाश मिळाला पाहिजे. तसें न झालें तर साऱ्या संगीतशास्त्राचा

विध्वंस होतो. चित्रकलेच्या बाबतींत तुमचें चित्र प्रत्यक्ष सृष्टीस जितकें अधिक धरून असेल तितकी त्यांत कला अधिक व्यक्त होते. असें करण्यांत नुकसान कांहींच नसून त्यांत फायदा मात्र पुष्कळ आहे. त्याचप्रमाणें गाण्यांतही शास्त्रशुद्ध पद्धति कायम ठेवून मग तुह्मी आपली सुरांची चतुराई कितीही व्यक्त केली तरी त्यास हरकत नाहीं. असें गाणें कर्णमधुरही होतें. राग आणि रागिणी यांचें ज्ञान मुसलमानांस हिंदुस्थानांत आल्यानंतर झालें; पण आपल्या टप्प्याच्या धर्तीच्या गाण्याची छाप आमच्या शास्त्रावर त्यांनीं इतकी बसविली कीं त्यांत आमचें संगीतशास्त्र नष्ट होऊन गेलें.

**प्रश्न**—असें कां ह्मणतां महाराज? टप्प्याचें गाणें कोणाला आवडत नाहीं?

**स्वामीजी**--अरे, रातकिडयांची किरकिरही कोणाला आवडते. संताळ लोकांना त्यांचें गाणें सर्वोत्कृष्ट वाटतें. एक सूर दुसऱ्या सुरांत घाईघाईनें मिसळला गेला ह्मणजे गाण्यांतली सर्व शोभा नाहींशी होते. एवढेंच नव्हे तर त्यांत थोडा स्वरसंकरही होतो. सप्त स्वरांची निरनिराळ्या प्रकारची वजावाट करून त्यांतूनच राग आणि रागिण्या निर्माण झाल्या आहेत. आतां टप्प्यासारख्या गाण्यांत स्वरांचा आरोह आणि अवरोह फार सपाट्यानें झाल्यामुळें एक नवेंच स्वरसंम्मीलन उत्पन्न होतें; आणि त्यांतच सकंप आवाजानें गायकानें आपला आवाज अगदीं वरच्या सुरापर्यंत चढविला, तर रागाचें स्वरूप शुद्ध कसें राहील बरें? याशिवाय केवळ श्रोत्यांस खुष करण्याकरितां मुरकीच्या ताना घेतल्यानें गाण्यांतलें सारें काव्य नष्ट होतें तें वेगळेंच. या टप्प्याच्या ढंगाचा प्रवेश आमच्या देशांत झाल्यापासून गाण्यांतला सारा आत्माच नष्ट झाला आहे. कोणतीही विशिष्ट कल्पना गाण्याच्या द्वारें मनांत विशेष प्रकारें भरवितां येते. गाण्याचा खरा उपयोग हाच. टप्प्याचा ढंग आल्यानंतर गाण्याचा हा उपयोग लोकांच्या लक्ष्यांत राहिला नाहीं. अलीकडे या कलेनें नाट्यांत प्रवेश केल्यापासून या दृष्टीनें तिचें पुनरुज्जीवन होऊं लागलें खरें, पण दुसऱ्या बाजूनें राग आणि रागिण्या यांची मात्र वाताहात होत चालली आहे. ध्रुपद गाणाऱ्या लोकांच्या मताप्रमाणें पाहतां त्यांच्या दृष्टीनें टप्प्याचें गाणें अगदीं कर्णकटु भासतें. आपल्या गायनपद्धतींत स्वरांचे बसविलेले आरोह आणि अवरोह फार चांगल्या प्रतीचे आहेत. आपल्या गाण्यांतला हा विशेष फ्रेंच लोकांच्या

लक्ष्यांत प्रथम आला आणि त्यांस तो पसंतही पडला. स्वतःच्या संगीत-पद्धतींत त्याचा अंतर्भाव करण्याचा यत्न फ्रेंच लोकांनीं केला. या बाबींत फ्रेंचांचें अनुकरण आतां साऱ्या युरोपनें केलें असून या कलेंत पाश्चात्य लोक आतां चांगले वस्ताद झाले आहेत.

**प्रश्न**—महाराज, पाश्चात्यांच्या संगीतांत लष्करी बाणा फार मोठ्या प्रमाणावर आढळून येतो. आमच्या गाण्यांत हा लष्करी बाणा मुळींच नाहीं.

**स्वामीजी**—छे, छे ! असें मुळींच नाहीं. आमच्या संगीतांतही हा लष्करी थाट आहे. लष्करी थाटाच्या गाण्यांत एकतानता फार मोठ्या प्रमाणावर असावी लागते. आमच्या संगीतांत ही एकतानता कमी असल्यामुळें त्यांतला लष्करी थाट उघड दिसत नाहीं. आमच्या संगीताची वाढ हळूहळू चांगल्या प्रकारें होत होती; पण मुसलमानांच्या हातांत हें शास्त्र पडल्याबरोबर त्या बिचाऱ्याची वाढच खुंटली. पाश्चात्यांच्या संगीतशास्त्राची वाढ पुष्कळ अधिक झाली आहे. त्यांच्या गायनपद्धतींत करुण आणि वीर या दोन्ही रसांस चांगला अवकाश आहे. वास्तविक हें असेंच असलें पाहिजे. आमच्यांत भोपळा लावलेलीं जीं हत्यारें एकदां निर्माण झालीं, त्यावर कसल्याही प्रकारची सुधारणा ह्मणून केव्हां झालीच नाहीं.

**प्रश्न**—कोणत्या रागांत आणि रागिण्यांत लष्करी थाट आढळून येतो बरें ?

**स्वामीजी**—प्रत्येक रागांत लष्करी थाट आणतां येईल; पण हें साधण्यास त्यांत स्वरांची एकतानता आणि योग्य सुरभरणा करणारीं हत्यारें यांची जोड अवश्य आहे. त्याचप्रमाणें कांहीं रागिण्यांतही हा थाट आणतां येईल.

यानंतर जेवणाची वेळ झाल्यामुळें बैठक बरखास्त झाली. जेवणानंतर कलकत्त्याहून आलेल्या पाहुण्यांच्या निजण्याच्या जागेच्या व्यवस्थेबद्दल चौकशी करून स्वामीजी आपल्या खोलींत गेले.

## ९

**गुरुगृहीं वास–सांप्रतची विश्वविद्यालयाची पद्धत—श्रद्धाहानि—राष्ट्रीय इतिहासाचें अस्तित्व—वेदान्त आणि पाश्चात्य शास्त्रें यांचा संयोग—सांप्रतचें उच्च शिक्षण–राष्ट्रीय दिशेनें दिलेलें शिक्षण—सत्यकामाची कथा—पुस्तकी शिक्षण आणि संन्याशांच्या हाताखालचें शिक्षण—श्रीरामकृष्ण आणि पंडित—मठसंस्था—पाठशाला आणि साधुशिक्षण—मुलांसाठीं क्रमिक पुस्तकें कशीं असावीं—लौकर विवाह करूं नका—जपान देशाला अविवाहित सुशिक्षितांची रवानगी—जपानच्या मोठेपणाचें रहस्य—आशियांतील व युरोपांतील कलाकौशल्य—कलाकौशल्य आणि उपयुक्तता वाद—पेहरावांच्या निरनिराळ्या पद्धती.**

[ श्रीयुत प्रियनाथ सिंह यांच्या खासगी रोजनिशीवरून. ]

नव्या मठाची स्थापना होऊन दोन वर्षें झालीं होतीं. सर्व संन्यासी तेथें राहत होते. अशा स्थितींत एके दिवशीं सकाळीं मी आपल्या गुरूच्या दर्शनासाठीं गेलों. मजकडे पाहून आणि हास्यमुद्रा करून स्वामींनीं माझें कुशलवृत्त विचारलें; आणि नंतर ते ह्मणाले, आज येथेंच मुक्काम करण्याचा विचार आहे, नाहीं ?

"होय" असें उत्तर देऊन मी स्वामीजींस ह्मटलें, "महाराज, आपल्या मुलांच्या शिक्षणाबद्दल आपलें काय मत आहे ?"

**स्वामीजी**—गुरुगृहवासम्. मुलांनीं गुरूच्या घरीं राहिलें पाहिजे.

**प्रश्न**—हें कसें व्हावें ?

**स्वामीजी**—पूर्वींच्या आपल्या जुन्या पद्धतीप्रमाणेंच; पण या शिक्षणाबरोबरच अर्वाचीन पाश्चात्य शास्त्रांचें शिक्षणही मुलांस दिलें पाहिजे. हीं दोन्ही प्रकारचीं शिक्षणें अवश्य आहेत.

**प्रश्न**—सांप्रतच्या विश्वविद्यालयीन् पद्धतींत कोणता दोष आहे ?

**स्वामीजी**—त्यांत बहुतेक सारे दोषच आहेत. सांप्रतचीं विश्वविद्यालयें ह्मणजे नोकर तयार करणारीं यंत्रेंच होत; पण एवढयानेंच भागलें असतें

तरीही बरें झालें असतें; पण हे दोष येथेंच संपत नाहींत. आपले तरुण कसे श्रद्धाहीन बनत चालले आहेत पहा. गीता हा ग्रंथ मध्येंच कोणी तरी घुसडून दिला आहे आणि वेद ह्मणजे रानटी लोकांचीं स्तोत्रें आहेत असलीं विधानें ते खुशाल भडाभड झोंकून देतात. हिंदुस्थानच्या बाहेरच्या देशांसंबंधीं खडानूखडा माहिती त्यांना हवी असते, पण स्वतःच्या घराण्यांतील पांचसात पिढयांच्या पूर्वजांचीं नांवेंही त्यांस ठाऊक नसतात! मग याहून जुन्या माहितीबद्दल तर बोलावयासच नको.

**प्रश्न**—पण असें असलें ह्मणून झालें काय? त्यांच्या पूर्वजांचीं नांवें त्यांना ठाऊक नसलीं तर काय बिघडलें?

**स्वामीजी**—छे, छे! असें ह्मणूं नको. ज्या राष्ट्राला पूर्वेतिहास नाहीं, त्याला या जगांत कांहींच किंमत नाहीं. 'मी अमक्या अमक्या महापुरुषाचा वंशज' असें ह्मणण्यांत ज्याला अभिमान वाटतो आणि अशा प्रकारची श्रद्धा ज्याला आहे, असा मनुष्य कधीं तरी वाईट निघेल असें तुला वाटतें काय? तसें होणें शक्य नाहीं. अशा प्रकारची त्याची श्रद्धाच त्याच्या कृतींना आणि मनोवृत्तींना आळा घालील. अशा श्रद्धेचा मनुष्य प्रसंगीं प्राण देईल, पण तो वाईट गोष्ट करणार नाहीं. ज्या राष्ट्राला पूर्वेतिहास ह्मणून आहे तें राष्ट्र नेहमींच दोरीसूत चालत असतें. अशा राष्ट्राचा पूर्वेतिहास त्याला अधोगामी होऊं देत नाहीं. आतां अशा प्रकारचा राष्ट्रीय इतिहास आपणास नाहीं असें तूं ह्मणशील हें मला ठाऊक आहे. तुझ्याप्रमाणेंच दुसऱ्या पुष्कळांनाही अशाप्रकारचा इतिहास नाहीं असेंच वाटतें. त्याचप्रमाणें अलीकडच्या बऱ्या विश्वविद्यालयीन पंडितांच्या दृष्टीलाही तसेंच दिसतें. त्याचप्रमाणें युरोपांतून धांवपळ करून येऊन युरोपीय पेहरावांत फिरणाऱ्या लोकांसही आपण शुद्ध रानटी असून आपणापाशीं मूल्यवान् चीज कांहींच नाहीं असेंच वाटत असतें. आह्मी भात खातों आणि इंग्रज लोक तो खात नाहींत ह्मणून ते मरून नष्ट होणार असें तुला वाटतें काय? त्यांच्या देशांत जें अन्न पिकतें आणि जें त्यांस मानवतें त्या अन्नावर ते चांगल्या प्रकारें जगतात. त्याचप्रमाणें आह्मांस ज्या प्रकारचा पूर्वेतिहास हवा आहे. त्या प्रकारचा आह्मापाशीं तो आहे. आपण डोळे मिटून घेऊन 'आपणास पूर्वेतिहास नाहीं' अशी कितीही ओरड केली तरी तो नष्ट होणार आहे काय?

ज्यांना पहावयास डोळे असतील त्यांना आमचा प्रकाशमय इतिहास दिसेल, आणि आपलें राष्ट्र अद्यापि जिवंत आहे, हेंही त्या इतिहासाच्याद्वारें स्पष्टपणें कळून येईल; पण तो इतिहास पुन्हां लिहून काढला पाहिजे. पाश्चात्य शिक्षणाच्या संस्कारानें आपल्या लोकांची विचारपरंपरा अलीकडे बदलली असल्यामुळें तिला अनुरूप आणि लोकांस समजेल अशा रीतीनें तोच पूर्वेतिहास पुन्हां लिहिला पाहिजे.

**प्रश्न**—पण हें करावयाचें कसें ?

**स्वामीजी**—हा विषय फारच मोठा असल्यामुळें सध्यां त्याबद्दल अधिक चर्चा करतां येणार नाहीं; तथापि हें साधण्यासाठीं गुरुगृहवास आणि अशाच प्रकारच्या दुसऱ्या पूर्वीच्या शिक्षणपद्धती यांचें पुनरुज्जीवन आपणास केलें पाहिजे. वेदान्त आणि पाश्चात्य शास्त्रें यांचा संयोग, ब्रह्मचर्य ही आपली पताका आणि आत्मश्रद्धा यांची आपणास सध्यां जरूर आहे. एका मनुष्याजवळ एक गाढव होतें. त्याचा घोडा व्हावा अशी त्याची इच्छा होती. त्या गाढवाला खूप बडविल्यास त्याचा घोडा होईल असें कोणी त्याला सांगितलें. सांप्रतच्या शिक्षणपद्धतींत आमच्या पोरांबाळांचीही हीच दशा होत आहे. याकरितां ही पद्धति समूळ नाहींशी केली पाहिजे.

**प्रश्न**—आपल्या ह्मणण्याचा आशय काय बरें ?

**स्वामीजी**—खरोखर पाहतां कोणीही कोणास कांहीं शिकवूं शकत नाहीं. आपण मुलांस शिक्षण देत आहों असें जें सध्यांच्या शाळाशिक्षकांना वाटतें, त्यामुळेंच सर्व खराबा होत आहे. मनुष्य हा ज्ञाननिधि आहे असें वेदान्ताचें ह्मणणें आहे. लहान मुलांसंबंधींही हीच गोष्ट खरी आहे. तो निधि फक्त जागृत करावयाचा असतो; आणि शिक्षकाचें खरें काम इतकेंच असतें. आपल्या हातापायांचा, कानांचा आणि डोळ्यांचा योग्य उपयोग कसा करावा, हें दाखविणारी बुद्धि मुलांच्या ठिकाणीं जागृत केली कीं आपलें कार्य संपलें. यापलीकडे मुलांसंबंधीं आपलें दुसरें कर्तव्य नाहीं. एवढें कर्तव्य आपण केलें ह्मणजे बाकीच्या गोष्टी साहजिकपणें घडून येतील; पण या सर्वांच्या मुळाशीं धर्माचा पाया मात्र अवश्य आहे. धर्म हा जणूं काय भातासारखा आणि इतर वस्तु आमटी भाजीसारख्या होत असें ह्मणावयास हरकत नाहीं. आपण नुसती आमटीच भुरकीत सुटलों तर अपचन होईल. त्याच-

प्रमाणें नुसता भातच आपण खाल्ला तरीही परिणाम तोच. हल्लींचें शिक्षण मुलांना नुसतें पोपट बनवीत आहे. त्यांच्या डोक्यांत हजारों विषय कोंबून त्यांच्या मेंदूची ते नासाडी करीत आहेत. लॉर्ड कर्झनसाहेबांनीं विश्वविद्यालयाची पीठिका बदलून टाकून उच्च दर्जाचें शिक्षण नाहींसें केलें ह्मणून एका अर्थी आपण त्यांचे उपकारच मानावे. शिक्षणाच्या असह्य दडपणाखालीं बेजार झालेल्या लोकांस थोडेंसें हायसें तरी वाटेल. त्यांना बिचाऱ्यांना जरा दम तरी मोकळेपणानें घेतां येईल. पदवीधर होण्यासाठीं कोण ती धडपड ! आणि नंतर थोडया दिवसांनीं पहावें तों सर्वत्र अगदीं सामसूम ! आणि एवढी धडपड करून आमच्या सुशिक्षितांनीं मिळविलें तरी काय ह्मणून पहावें तर हेंच कीं 'आमचा धर्म वाईट आणि आमच्या चालीरीती खराब; आणि पाश्चात्यांजवळ जें कांहीं आहे तें सर्व चांगलें ! ' आणि इतकी धडपड करून मिळविलेल्या शिक्षणानें या बिचाऱ्यांना पोटभर अन्नसुद्धां मिळत नाहीं तें नाहींच ! असल्या प्रकारचें उच्च शिक्षण गेलें काय आणि राहिलें काय सारखेंच ! यापेक्षां लोकांना धंदेशिक्षण मिळालें तर ते कांहीं काम शोधून काढतील आणि पोटभर भाकरी तरी मिळवितील. मग त्यांना पायपीट करून नोकरीसाठीं तोंडें तरी वेंगाडावीं लागणार नाहींत.

**प्रश्न**—हें खरें महाराज; मारवाडी नोकरीच्या भानगडींत पडत नाहींत आणि त्यांपैकीं बहुतेक सारे कोणत्यातरी धंद्यांत पडलेले असतात. मारवाडी खरोखरच अधिक शाहाणे ह्मटले पाहिजेत.

**स्वामीजी**—छे, छे ! असें मात्र मुळींच समजूं नको. मारवाडी लोक खरोखर देशाचा नाश करीत आहेत. त्यांना स्वतःचें हित फारसें कळत नाहीं. कांहीं तरी धनोत्पादक कारखाना काढावा असें ज्यांना वाटतें तेच अधिक शहाणे. मारवाडी लोक आपल्या धंद्यांत पैसा घालून जो थोडाबहुत पैसा मिळवितात तोच पैसा एखाद्या कारखान्यांत अथवा धनोत्पादक धंद्यांत घातला तर देशाचें कल्याण होईल; एवढेंच नव्हे तर त्यांनाही अधिक नफा होईल. त्यांच्या पैशांतून होणाऱ्या नफ्याचा बराच मोठा भाग युरोपीय व्यापाऱ्यांच्या खिशांत जातो. काबूली लोकांना मात्र नोकरीची खरोखर चाड नसते. स्वतंत्रतेचें वारें त्यांच्या हाडांमासांत भिनून गेलें आहे. त्यांना नोकरीबद्दल विचारा ह्मणजे ते काय उत्तर देतील तें पहा.

**प्रश्न**—महाराज, उच्च प्रतीचें शिक्षण समूळ बंद केलें तर आमचे लोक पूर्वींप्रमाणेंच पशूच्या योग्यतेस जाणार नाहींत काय ?

**स्वामीजी**—काय मूर्खांसारखें बरळतोस हें ? अरे सिंहाचा कधीं तरी कोल्हा होईल काय ? तुझ्या ह्मणण्याचा अर्थच मला समजत नाहीं. अत्यंत प्राचीन काळापासून ज्या भूमीनें सर्व जगास ज्ञानामृत पाजिलें, तिचीं लेंकरें कधींतरी पशुवत् होतील काय ? कर्झनसाहेबांनीं उच्च शिक्षण बंद केलें ह्मणून असा परिणाम कधीं तरी होईल काय ?

**प्रश्न**—महाराज, पण इंग्रज लोकांच्या आगमनापूर्वी आपल्या लोकांची काय स्थिति होती ?

**स्वामीजी**—भौतिक शास्त्रांचा अभ्यास आणि रोजच्या लागणाऱ्या वस्तू यंत्रद्वारें उत्पन्न करणें याचेंच नांव उच्च शिक्षण काय ? मानवी जीवितांचीं उच्च प्रमेयें कशीं सोडवावीं हें ज्या शिक्षणानें समजतें, त्याला आह्मीं उच्च शिक्षण समजतों. अर्वाचीन सुधारलेल्या जगांतील मोठ्या पंडितांसही आतां मनापासून असेंच वाटूं लागलें आहे; पण आमच्या इकडे मात्र हजारों वर्षांपूर्वींच उच्च शिक्षणाची खरी व्याख्या ठरविली गेली होती.

**प्रश्न**—महाराज, पण आपला वेदान्तसुद्धां नष्ट होण्याच्या बेतांत आला होता याची वाट काय ?

**स्वामीजी**—तसें असेल कदाचित्; कालाच्या ओघांत वेदान्तही नष्ट होणार अशीं चिन्हें केव्हां केव्हां दिसतात; आणि असें झालें ह्मणजे भगवंताला मनुष्यरूपानें अवतार घ्यावा लागतो. त्यानें अवतार घेतला ह्मणजे तो धर्माला असें नवजीवन आणि असें सामर्थ्य देतो कीं कांहीं कालापर्यंत धर्मांचा जोम अप्रतिहत चालतो. हेंच नवजीवन आणि हेंच सामर्थ्य धर्माला सांप्रत पुन्हां प्राप्त झालें आहे.

**प्रश्न**—महाराज, भरतभूमीनें सर्व जगाला ज्ञानामृत पाजिलें या ह्मणण्याला पुरावा काय आहे ?

**स्वामीजी**—याबद्दल इतिहासाचाच पुरावा आहे. जीवात्म्याला उच्च दिशेकडे नेणारे सर्व विचार आणि ज्ञानाच्या ज्या शाखा आज जगांत उपलब्ध आहेत, त्यांचा उगम हिंदुस्थानांतूनच झाला होता असें योग्य शोधांतीं आढळून येईल.

स्वामीजी या वेळीं मोठया उत्साहानें बोलत होते. यामुळें त्यांचा चेहरा विलक्षण तेजस्वी दिसत होता. या वेळेच्या सुमारास त्यांची प्रकृति फारच बिघडली होती; आणि याशिवाय उन्हाळाही भारी कडक असल्यामुळें त्यांस वारंवार पाणी प्यावें लागे. नंतर ते ह्मणाले, ' सिंघी, बेव्या मला थोडें बर्फाचें पाणी आण. मी साऱ्या गोष्टी तुला स्पष्ट रीतीनें समजावून सांगतों.' बर्फाचें पाणी पाल्यानंतर स्वामीजींचें भाषण पुन्हां चालू झालें.

**स्वामीजी**—आपणास सांप्रत जर कशाची जरूर असेल तर ती आपल्या स्वतःच्या कलाकौशल्याच्या अभ्यासाची आहे. ज्या ज्ञानाच्या निरनिराळ्या शाखा आपल्या स्वतःच्याच आहेत, त्यांचा अभ्यास आपण आपल्याच पद्धतीनें केला पाहिजे. आपल्या शिक्षणसंस्थांच्या घटनेंत परकीयांचा हात नसावा; आणि याबरोबर इंग्रजी भाषा आणि पाश्चात्य शास्त्रें यांचाही अभ्यास आपण करावा. धंदेशिक्षण आणि कारखाने वाढविणारें सर्व प्रकारचें शिक्षण आपणास हवें आहे. असें झालें ह्मणजे आपले तरुण नोकरीच्या मागें न धांवतां पोटापुरतें मिळवूं शकतील; एवढेंच नव्हे तर आडीअडचणीसाठीं कांहीं कुणगाही करून ठेवतील.

**प्रश्न**—महाराज, गुरुगृहवासाबद्दल आपण त्या दिवशीं काय सांगत होतां ?

**स्वामीजी**—अरे, तूं उपनिषदांतल्या कथा वाचल्या नाहींस काय? त्यांतलीच एक कथा मी तुला सांगतों. सत्यकाम गुरुगृहीं ब्रह्मचर्यव्रतानें राहण्यासाठीं गेला. त्याच्या गुरूनें कांहीं गाई त्याच्या ताब्यांत देऊन त्यास अरण्यांत पाठविलें. या गोष्टीस पुष्कळ महिने लोटून गेल्यावर सत्यकामानें पाहिलें तों गाईची संख्या दुप्पट झाली असल्याचें त्यास आढळून आलें. तेव्हां तो गुरुगृहीं परत जावयास निघाला. वाटेंत कांहीं बैल आणि दुसरीं कांहीं जनावरें यांनीं त्यास ब्रह्मज्ञान सांगितलें. गुरुगृहीं परत आल्यावर गुरूनें त्याजकडे पाहिलें तो ब्रह्मज्ञानाचें तेज त्याच्या मुखावर गुरूस आढळून आलें. आतां या गोष्टींतलें मुख्य तात्पर्य काय आहे, हें आपण पाहिलें पाहिजे. सृष्टीशीं सदोदित तादात्म्य पावून राहिल्यानेंच खरें शिक्षण प्राप्त होतें हें या गोष्टीचें तात्पर्य होय.

ज्ञान अशा रीतीनें प्राप्त करून घेतलें पाहिजे; नाहीं तर एखाद्या पंडिताच्या शाळेंत शिकल्यानें तुम्ही मनुष्यरूपी माकड मात्र बनून जाल. तुमच्या

साऱ्या जन्मांत खरें ज्ञान तुम्हांस प्राप्त व्हावयाचें नाहीं. ज्या मनुष्याची दानत अग्नीप्रमाणें दिव्य असेल, अशाचाच सहवास शिष्यांनीं बालपणापासून करावा. अत्युच्च दर्जाच्या शिक्षणाचें जिवंत उदाहरण शिष्याच्या नजरे-समोर असलें पाहिजे; नाहीं तर ' मुला, खोटें बोलूं नको; तें मोठें पाप आहे. ' असलीं वाक्यें वाचल्याचा यत्किंचितही उपयोग होणार नाहीं. ब्रह्मचर्य कडकडीत पाळण्याचें शिक्षण प्रत्येक मुलास दिलें पाहिजे. असें झालें तरच श्रद्धा आणि आत्मविश्वास हीं प्राप्त होतील. ज्याजवळ आत्मविश्वास आणि श्रद्धा हीं नाहींत, अशा मनुष्यानें खोटें बोलूं नये तर करावें तरी काय ? आपल्या देशांत शिक्षण नेहमीं संन्याशांच्या हातीं असे. पुढें पुढें हें ज्ञान पंडितांच्या हातीं गेलें आणि तें शाळांतून देण्याची पद्धत त्यांनीं सुरू केली; पण या पद्धतीनें देशाचा नाश होण्याचा समय मात्र जवळ आला. ज्ञानदानाचें कार्य त्यागी पुरुषांच्या हातीं होतें तोंवर हिंदुस्थानची भवितव्यता उज्वल दिसत होती.

**प्रश्न**—महाराज, आपल्या ह्मणण्याचा भावार्थ माझ्या लक्षांत येत नाहीं. दुसऱ्या देशांत संन्यासी मुळींच नाहींत; पण असें असतांही त्या देशांनीं आपल्या ज्ञानबलानें हिंदुस्थानास आपल्या पायापाशीं कसें नम्र करून सोडलें आहे पहा !

**स्वामीजी**—गड्या, असें वेड्यासारखें बरळूं नकोस. मी काय ह्मणतों तें नीट ध्यानांत घे. हिंदुस्थानांतील ज्ञानदानाचें कार्य जोंवर पुन्हां त्यागी पुरुषांच्या हातांत जाणार नाहीं, तोंवर आह्मांस लोकांचें पादवंदन अशाच रीतीनें करावें लागेल. केवळ त्यागाच्या बळावर एका अक्षरशत्रु मुलानें तुमच्या मोठमोठ्या ज्ञानवृद्ध पंडितांचीं मस्तकें भ्रमवून टाकिलीं होतीं हें तुला ठाऊक नाहीं काय ? एके वेळीं दक्षिणेश्वराच्या देवालयांतील पुजाऱ्यानें विष्णूच्या मूर्तीचा एक पाय मोडून टाकला. आतां पुढें कसें करावें याबद्दल विचार करण्याकरितां पंडितांची मोठी सभा त्या प्रसंगीं भरली होती. पंडित महा-शयांनीं जुने जुने ग्रंथ आणि प्राचीन हस्तलिखितें पाहून ठरविलें कीं ही भंगलेली मूर्ति पूजनास योग्य नसून नव्या मूर्तीची स्थापना तिच्या जागीं केली पाहिजे. यामुळें देवळांत त्या वेळीं बरीच गडबड उडाली. अखेरीस हें प्रकरण श्रीरामकृष्णांकडे गेलें. सर्व हकीगत ऐकून घेऊन श्रीरामकृष्ण

ह्मणाले, " नवऱ्याचा पाय मोडला ह्मणून बायको त्याला कधीं टाकून देते काय ? " श्रीरामकृष्णांच्या या प्रश्नास पंडितांस कांहीं उत्तर देववेना. असल्या साध्या प्रश्नाला त्यांच्या प्रचंड धर्मग्रंथांत आणि विद्वत्ताप्रचुर टीकाग्रंथांत कोठेंही उत्तर सांपडेना. ही प्रत्यक्ष घडलेली हकीकत आहे. श्रीरामकृष्णांनीं या भूमीवर अवतार कां घ्यावा आणि पुस्तकी विद्येबद्दल अनादर कां दाखवावा या प्रश्नाचीं उत्तरें दे पाहूं? श्रीरामकृष्णांनीं आपणाबरोबर जी नवी जीवनदायी शक्ति आणली तिचा प्रवेश शिक्षणांत करून दिला पाहिजे. असें होईल तेव्हांच खऱ्या कार्यास आपण आरंभ केल्यासारखें होईल.

**प्रश्न**—हें बोलण्यास सोपें वाटतें, पण करण्यास फारच कठीण नाहीं काय?

**स्वामीजी**-अरे, तें करण्यास सोपें असतें तर श्रीरामकृष्णांस जन्मच घ्यावा लागला नसता. आतां तुह्मांस जें कांहीं करणें अत्यंत अवश्य आहे, तें हेंच कीं, प्रत्येक शहरांत आणि प्रत्येक खेडयापाडयांत सुद्धां एका एका मठाची स्थापना तुह्मी केली पाहिजे. हें तुह्मांस करतां येईल काय ? इतकें न झालें तरी थोडें तरी कार्य करून दाखवा. कलकत्त्यास एक मोठा मठ स्थापन करावा. एक चांगला सुशिक्षित साधु या मध्यवर्ती मठाचा प्रमुख असावा. या मुख्याच्या हाताखालीं कला आणि शास्त्रें शिकविण्याचीं निरनिराळीं खातीं असावीं. या प्रत्येक खात्यावर त्या त्या विषयांत निष्णात् अशा साधूची नेमणूक करावी.

**प्रश्न**—पण असे साधु मिळणार कोठें ?

**स्वामीजी**—असे साधु तयार केले पाहिजेत. असे साधु नवे बनविले पाहिजेत. याकरितांच मीं नेहमीं ह्मणतों कीं पूर्ण त्यागी आणि कडकडीत देशभक्त अशा तरुणांची आह्मांस जरूर आहे. कोणत्याही विषयांत त्यागी मनुष्य जितक्या लवकर पारंगतता मिळवितो तितक्या लौकर इतरांस ती मिळवितां येणार नाहीं.

थोडा वेळ स्तब्ध राहून स्वामीजी पुढें ह्मणाले, " सिंघी, आपल्या देशासाठीं इतक्या गोष्टी करावयाच्या अद्यापि शिल्लक पडल्या आहेत कीं, तुझ्या माझ्यासारखीं हजारों मनुष्यें देशकार्यास हवीं आहेत. नुसत्या बडबडीचा काय उपयोग होणार? आज आपल्या देशाची स्थिति किती शोचनीय झाली आहे

पहा ! आतां तरी कांहीं उद्योगास लागा. लहान मुलांस उपयोगी पडेल असलें एखादें चांगलेंसें क्रमिक पुस्तकसुद्धां आमच्यापाशीं नाहीं.

**प्रश्न**—असें कां ह्मणतां महाराज ? पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांनीं किती तरी पुस्तकें मुलांसाठीं लिहिलीं आहेत.

हे शब्द माझ्या तोंडांतून बाहेर पडतांच स्वामी मोठयानें हंसूं लागले. आणि ह्मणाले, " हो, खरी गोष्ट. त्यांच्याच एका पुस्तकांत ते लिहितात, 'ईश्वर निराकार, चैतन्यस्वरूप. दुबल हा मोठा बुद्धिमान् मुलगा आहे.' वा ! काय रचना ही ? छे, छे ! असें उपयोगी नाहीं. रामायण, महाभारत आणि उपनिषद् ग्रंथ इत्यादिकांतील गोष्टी बंगालींत आणि इंग्रजींत लिहिल्या पाहिजेत. या पुस्तकाची भाषा साधी आणि सोपी असावी. अशा प्रकारचीं पुस्तकें आमच्या लहान मुलांच्या हातीं दिलीं पाहिजेत.

आतां सुमारें अकरा वाजण्याची वेळ झाली होती. इतक्यांत आकाश ढगानें अगदीं भरून आलें आणि गार वारा वाहूं लागला. पाऊस पडण्याचीं चिन्हें पाहून स्वामीजींस मोठा आनंद वाटला. ते उभे राहिले आणि ह्मणाले, " सिंघी, गंगातटाकीं जरा फिरावयास जाऊं चल. " स्वामीजींच्या इच्छेप्रमाणें मी त्यांजबरोबर फिरावयास निघालों. फिरतां फिरतां कालिदासाच्या मेघदूतांतील कांहीं श्लोक स्वामीजी तोंडानें ह्मणत होते. तथापि या वेळींहि त्यांच्या चित्तांत हिंदुस्थानचें कल्याण कसें होईल हाच प्रश्न घोळत होता. मध्येंच ते ह्मणाले, " इकडे पहा सिंघी, तुला एक गोष्ट करतां येईल काय ? आमच्या मुलांचे विवाह तुला कांहीं काळ लांबवितां येतील काय ? "

मी ह्मणालों, " महाराज, ही गोष्ट शक्य तरी आहे काय ? लग्नें सुलभपणें व्हावीं ह्मणून लोक नानाप्रकारच्या खटपटी करीत आहेत. "

**स्वामीजी**—या बाबींत तूं फारशी काळजी करूं नको. अरे काळाचा ओघ थांबविण्यास कोण समर्थ आहे ? असल्या प्रकारच्या खटपटी शेवटीं खास फुकट जातील. विवाहाचें कार्य दिवसेंदिवस जितकें अधिक अवघड होत जाईल तितकें देशहिताच्या दृष्टीनें अधिक बरें. परिक्षा पास होण्यासाठीं आणि लग्न उरकून घेण्यासाठीं कोण धडपड ? जणूं काय, ब्रह्मचारी आतां कोणी उरावयाचाच नाहीं असें वाटतें. दरवर्षी बघावें तों हीच स्थिति.

थोडा वेळ थांबून स्वामीजी पुढें बोलूं लागले, " मला कांहीं अविवाहित पदवीधर मिळाले तर जपानास पाठवून त्यांस धंदेशिक्षण मिळण्याची कांहीं व्यवस्था करण्याची खटपट मी करीन. असे लोक स्वदेशीं परत आले ह्मणजे त्यांच्या ज्ञानाचा उपयोग देशाला पुष्कळ होईल. असें झालें तर किती चांगलें ?

**प्रश्न**—महाराज, इंग्लंडास जाण्यापेक्षां जपानला जाणें अधिक चांगलें आहे काय ?

**स्वामीजी**—अवश्य; आमचे सगळे श्रीमंत आणि सुशिक्षित तरुण एक वेळ जपानास जाऊन येतील तर त्यांचे डोळे खास उघडतील.

**प्रश्न**—हें कसें ?

**स्वामीजी**—ज्ञानाचा सुंदर परिपाक जपानांत आढळून येतो. तेथील लोकांस ज्ञान चांगलें पचलें आहे. आमच्या लोकांप्रमाणें ज्ञानाचें अजीर्ण त्यांस झालेलें नाहीं. त्यांनीं युरोपीय लोकांपासून सर्व गोष्टी घेतलेल्या आहेत; तथापि त्यामुळें युरोपीय बनून न जातां ते जपानीच राहिले आहेत. उलटपक्षीं आमच्या देशांत युरोपीय बनून जाण्याच्या सांथीनें सुशिक्षितांस पुरें पछाडलें आहे. त्यांच्यांत हें एक भयंकर खूळच पसरलें आहे.

मी ह्मणालों, "महाराज, मी कांहीं जपानी चित्रें पाहिलीं आहेत. जपानी चित्रकारांची कुशलता पाहून खरोखर मन थक्क होतें. त्या चित्रांतील अंतर्गत कला ह्मणजे कोणाचें अनुकरण नसून ती त्यांची स्वतःचीच आहे. खरोखर त्या कलेचें अनुकरण करणेंही शक्य नाहीं."

**स्वामीजी**—अगदीं बरोबर बोललास. त्यांचें कलाकौशल्य उच्च दर्जाचें आहे ह्मणूनच जपानी लोकांनीं राष्ट्र या नात्यानें महत्व मिळविलें आहे. आपणाप्रमाणेंच तेही आशियांतील लोक आहेत, हें तुला ठाऊक नाहीं काय? सध्यां आपण सर्वस्व गमावून बसलों आहों तरी जो कांहीं अवशेष आपणापाशीं उरला आहे तोच आश्चर्यजनक नाहीं काय? कलेचें ज्ञान हें आशियांतील लोकांच्या जीविताशीं एकरूप होऊन गेलें आहे. कोणत्याही गोष्टींत कलाकुसरीचा अंश असल्याशिवाय आशियांतील लोक तिचा उपयोग करीत नाहींत. कला हें आमच्या धर्माचेंच एक अंग आहे असें

ह्मणावयास हरकत नाहीं. ज्या स्त्रीला चांगल्या प्रकारची रांगोळी काढतां येते अथवा भिंतीवर चित्रें काढतां येतात तिची चहा आपल्या लोकांत किती असते ? खुद्द श्रीरामकृष्णसुद्धां या दृष्टीनें किती मोठे होते?

**प्रश्न**—इंग्रजांचें कलाकौशल्यही वाखाणण्याजोगें आहे, नव्हे काय ?

**स्वामीजी**—किती मूर्ख आहेस रे तूं ? पण तुला तरी दोष देण्यांत काय अर्थ आहे ? सध्यां सगळ्याच लोकांना असें वाटूं लागलें आहे ! मग तुला एकट्यालाच दोष देण्यांत काय अर्थ आहे ! हाय, हाय ! आमच्या देशाची काय ही हीन दशा ! स्वतःचें सोनें पितळेच्या भावानें गणलें जातें आणि परकीयांची पितळ येथें सोन्याच्या भावानें विकली जाते ! अर्वाचीन शिक्षणानें जी मोठी जादू केली आहे ती हीच. आतां तुला एक गोष्ट सांगतों ती नीट ध्यानांत धर. ती गोष्ट हीच कीं, आशियांतील लोकांशीं युरोपीय लोकांचें संघटन होऊं लागल्यानंतर युरोपियांनीं स्वतःच्या जीवन-क्रमांत कलेचा अंतर्भाव करण्याचा यत्न सुरू केला.

**मी**—महाराज, तुमचें हें भाषण कोणीं ऐकलें तर तुह्मीं खरोखर नैराश्यवादी आहां असेंच तो ह्मणेल.

**स्वामीजी**—हें तर अगदीं उघड आहे. ठरीव मार्गाच्या बाहेर न जाणाऱ्या लोकांच्या डोक्यांत दुसरी कल्पना येणार कशी ? माझ्या दृष्टीला काय दिसतें तें तुला दाखवितां आलें असतें तर किती बरें झालें असतें ? फार कशाला, युरोपीय लोकांच्या इमारतींकडे पहा. यांच्या बांधणींत कांहीं अर्थ ह्मणून दिसतो का ? त्यांत सामान्यत्वापलीकडे ह्मणून कांहीं आढळतें काय ? या पलीकडच्या मोठ्या सरकारी इमारती पहा. या इमारती कोणत्या विशिष्ट उद्देशानें बांधल्या आहेत हें त्यांच्या बाहेरच्या आकारावरून तुला सांगतां येईल काय ? कधींच येणार नाहीं. कारण, त्यांच्यांत विशिष्टपणा असा कांहीं नाहींच. त्यांच्या बांधणींत हेतुदर्शक असें कांहीं आढळून येणारच नाहीं. त्यांचा पोशाख पहा. आंगाला तंग बसणारे त्यांचे कोट आणि त्यांच्या इजारी आमच्या दृष्टीनें तर सभ्यपणाच्या सुद्धां ह्मणतां येणार नाहींत; आणि आतां त्याच कपड्यांत आह्मांस केवढें सौंदर्य दिसूं लागलें आहे ! आतां आमच्या देशांत फिरून पहा. आमच्या देशां-

तील इमारतींची बांधणी किती हेतुपूर्ण असते हें लक्ष्यांत आण. केवळ बाह्य देखाव्यावरूनच तिचा हेतू तुझ्या लक्ष्यांत येतो कीं नाहीं हें पहा. पाणी पिण्याचा त्यांचा ग्लास आणि आमची लोटी या दोहोंपैकीं कोणत्यांत तुला अधिक कला आढळून येते ? आमच्या एखाद्या सामान्य शेतकऱ्याचें खेड्यांतलें घर तूं पाहिलें आहेस काय ?

**मी**—होय महाराज.

**स्वामीजी**—त्यांत तूं काय पाहिलेंस ?

या प्रश्नाला काय उत्तर द्यावें तें मला समजेना; तथापि मी ह्मटलें, ' महाराज, आमच्या शेतकऱ्यांचीं घरें फारच नीटनेटकीं आणि स्वच्छ असतात. रोज जमिनी आणि आंगणें सारवून तीं ते स्वछ ठेवीत असतात.'

**स्वामीजी**—त्यांच्या धान्य ठेवण्याच्या जागा तूं कधीं पाहिल्या आहेस काय ? त्यांत सुद्धां केवढी कला असते ? त्यांच्या घरांतील चिखलाच्या भिंतीवरही किती तरी प्रकारचीं चित्रें काढलेलीं असतात. आतां इकडच्या शेतकऱ्यांची ही स्थिति पाहून तूं पश्चिमेकडील कनिष्ठ वर्गाची स्थिति पाहिलीस तर त्या दोघांतील फरक ताबडतोब तुझ्या लक्ष्यांत येईल. आपल्या आणि त्यांच्या राहणींत असलेल्या फरकाचा मुख्य मुद्दा हाच कीं, त्यांची दृष्टि उपयुक्ततेकडे असून आपली दृष्टि कलेकडे आहे. कोणत्याही वस्तूचा विचार पाश्चात्य मनुष्य उपयुक्ततेच्या दृष्टीनें करीत असतो. उलटपक्षीं आपण तिची किंमत कलेच्या दृष्टीनें ठरवीत असतों. पाश्चात्य शिक्षणाचा प्रवेश झाल्यानंतर आपल्या पाणी पिण्याच्या लोट्या जाऊन त्या जागीं एन्यामलचीं लोखंडी भांडीं आलीं. पाश्चात्यांच्या उपयुक्ततावादाचें ग्रहण आपण इतकें केलें आहे कीं आतां तो थट्टेचाच विषय झाला आहे असें ह्मणण्यास हरकत नाहीं. उपयुक्तता आणि कला या दोहोंचें मिश्रण आपणास हवें आहे. हें मिश्रण कसें करावें ही विद्या जपान देशाला लवकर साधल्यामुळें त्या देशाचें पाऊल विलक्षण झपाट्यानें पुढें पडलें. आतां जपानी लोक पाश्चात्यांचे गुरु होऊं पहात आहेत.

**प्रश्न**—महाराज, पृथ्वीवरील सर्व लोकांत अधिक चांगला पोषाख कोणाचा असतो ?

**स्वामीजी**—आर्यांचा. ही गोष्ट युरोपियन लोकसुद्धां कबूल करतात. त्यांचा तो चुण्या पडलेला पोषाख कसा चित्रासारखा दिसतो ? बहुतेक राष्ट्रांच्या राजांचे राजकीय पोषाख कांहीं अंशीं आर्यांच्या अनुकरणावर केलेले असतात. राजकीय पोषाखांत चुण्या आणि घोळदारपणा असतो. त्या त्या राष्ट्रांच्या सामान्य राष्ट्रीय पोषाखाहून हा पोषाख अगदीं वेगळा असतो. तें असो; पण सिंघी, शर्ट वापरण्याची ही भिकार पद्धत तुह्मी खरोखर सोडून द्या.

**प्रश्न**—कां महाराज ?

**स्वामीजी**—याचें कारण असें कीं, पाश्चात्य लोक हा कपडा फक्त आंतून वापरतात. हा कपडा बाहेर घालणें त्यांस आवडत नाहीं; पण बंगाली लोक तो बाहेरचा कपडा ह्मणून वापरतात, ही त्यांची केवढी चूक आहे बरें ? जणूं काय, वाटेल तो कपडा वाटेल तशा रीतीनें घातल्यास कांहीं हरकतच नाहीं. कपडे घालण्याच्या पद्धतीही ठरींव असतात. या बाबतींत तुमच्या पूर्वजांची पद्धत तुह्मी पुढें कां चालवूं नये ? हलक्या जातीच्या मनुष्याच्या हातचें अन्न एखाद्यानें खाल्लें तर लोक त्याला वाळीत टाकतात. वाटेल तसला विचित्र पोषाख करणारासही हाच कायदा लागू असता तर खरोखर फार बरें झालें असतें. तुह्मी स्वतःच्या पद्धतीनें आपलाच पोषाख कां घालीत नाहीं ? युरोपीय लोकांचे शर्ट आणि कोट घालण्यांत काय तात्पर्य आहे तेंच मला समजत नाहीं.

इतक्यांत पाऊस पडण्यास सुरवात झाली आणि जेवणाची घंटाही वाजली. तेव्हां इतरांबरोबर प्रसादग्रहण करण्यासाठीं आह्मीही गेलों. जेवतां जेवतां स्वामीजी मला ह्मणाले, 'थोडें पण पौष्टिक अन्न खावें. भाताची रास पोत्यांत भरल्यामुळें आळस मात्र वाढतो. जपानी लोकांकडे पहा बरें. भात आणि डाळीची आमटी दिवसांतून दोनतीनदां ते खातात. त्यांच्या जेवणाच्या वेळा अधिक असल्या तरी त्यांच्यांतला धष्टपुष्ट मनुष्यसुद्धां एका वेळीं थोडेंच अन्न खातो. त्यांच्यांतले श्रीमंत लोक रोज मांस खातात. आपण दिवसांतून दोनदांच जेवतों. पण प्रत्येक वेळीं घशापर्यंत भात भरून घेत असतों. यामुळें आपली सर्व शक्ति भाताच्या या राशी पचविण्यांतच नाहींशी होते !

**प्रश्न**—महाराज, आह्मी बंगाली लोक बोलून चालून दरिद्री. मग रोज मांस भक्षण करणें आम्हांस कसें परवडेल ?

**स्वामीजी**—कां नाहीं परवडणार ? थोडें मांस रोज घेण्यास कांहीं हरकत नाहीं. त्यांत विशेष खर्च होणार नाहीं. रोज अर्धा रत्तल मांस पुरेसें होईल. आपल्या दारिद्र्याचें मुख्य कारण आपला आळस हेंच होय. एखाद्या मनुष्याचा पगार कांहीं कारणानें एकदम कमी झाला अथवा कुटुंबांतल्या तीन-चार मिळवत्या मुलांपैकीं एखादा मृत्युमुखीं पडला, तर हें कुटुंब काय करतें पहा. प्रथम मुलांसाठीं लागणारें दूध कमी करण्यांत येतें; किंवा तीं माणसें एकभुक्त राहतात. संध्याकाळची वेळ चुरमुऱ्यांसारख्या पदार्थांवर भागविण्यांत येते.

**प्रश्न**—त्यांनीं असें न करावें तर करावें तरी काय ?

**स्वामीजी**—कां बरें ? अधिक श्रम करून अधिक पैसा त्यांनीं कां मिळवूं नये ? पण आमचे लोक असें कधींच करावयाचे नाहींत. त्यांना अड्ड्या-वर जाण्यास हवें आणि रिकाम्या चकाट्या पिटण्यास हवें. आपण आपला वेळ कशा रीतीनें फुकट घालवितों हें जर त्यांच्या लक्षांत आलें असतें तर किती बरें झालें असतें ?

---

## १०

## जाति आणि गुण यांच्या अनुरोधानें वर्णव्यवस्था—पश्चिमेकडील ब्राह्मण आणि क्षत्रिय—बंगाल्यांतील कुलगुरूंची पद्धत.

[ श्री. प्रियनाथ सिंह यांच्या रोजनिशीवरून. ]

परलोकवासी बालाराम बसू यांच्या घरीं स्वामीजी असतां एक वेळ मी त्यांस भेटावयास गेलों. जपान आणि अमेरिका यांजबद्दल बराच वेळ संभाषण झाल्यानंतर मी त्यांस ह्मटलें, " स्वामीजी, पाश्चात्य देशांत आपले कितीसे शिष्य आहेत ?"

**स्वामीजी**—पुष्कळ आहेत.

**प्रश्न**—किती? दोनतीन हजार?

**स्वामीजी**—कदाचित् त्याहूनही जास्त असतील.

**प्रश्न**—या सर्वांना आपण मंत्र दिले आहेत काय?

**स्वामीजी**—होय.

**प्रश्न**—प्रणवाचा जप करण्यास आपण त्यांना परवानगी दिली काय?

**स्वामीजी**—होय.

**प्रश्न**—महाराज, आपण असें कसें केलें? प्रणवोच्चार करण्यास शूद्रांस परवानगी नाहीं असें ह्मणतात. ब्राह्मणांशिवाय तशी कोणासही परवानगी नाहीं. त्यांतून पाश्चात्य लोक हे शूद्रसुद्धां नसून शुद्ध म्लेच्छ आहेत.

**स्वामीजी**—ज्यांना मी मंत्र दिला ते ब्राह्मण नाहींत हें तुला कसें समजलें?

**मी**—हिंदुस्थानच्या बाहेर ब्राह्मण कोठें सांपडणार? यवनांच्या आणि म्लेच्छांच्या देशांत ब्राह्मण आहेत काय?

**स्वामीजी**—माझे सर्व शिष्य ब्राह्मणच आहेत. प्रणवोच्चार करण्यास ब्राह्मणांशिवाय दुसऱ्या कोणासही अधिकार नाहीं, ही शास्त्राज्ञा मला सर्वथा मान्य आहे; पण केवळ ब्राह्मणाचा मुलगा झाला ह्मणून निश्चयानें तो ब्राह्मणच असतो असें नाहीं. तो ब्राह्मण असूं शकेल असें मानण्यास पुष्कळ आधार आहेत, तथापि कदाचित् तो ब्राह्मण नसेलही. बागबझारांतल्या अघोर चक्रवर्तीचा पुतण्या भंगी झाला आणि आपल्या जातीचीं कामेंही करूं लागला ही गोष्ट तुझ्या ऐकिवांत आहे कीं नाहीं? तो ब्राह्मणाचा मुलगा नव्हता का?

ब्राह्मण वर्ण आणि ब्राह्मण्याचे गुण या दोन वेगळ्या वस्तु आहेत. ब्राह्मणाच्या जातींत निर्माण झाला ह्मणजे आपल्या इकडे त्यास ब्राह्मण समजतात; पण पाश्चात्य देशांत गुणकर्मानुरोधानें कोणाचाही वर्ण ओळखला पाहिजे. सत्त्व, रज आणि तम असे ज्याप्रमाणें तीन गुण आहेत, त्याचप्रमाणें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र हे वर्ण दाखविणारेही गुण आहेत. आपल्या देशांत ब्राह्मण आणि क्षत्रिय यांच्या गुणांचा लोप होत चालला आहे; पण पाश्चात्य देशांतील लोक सांप्रत क्षत्रियत्वापर्यंत गेले

असल्यामुळें यापुढें ते ब्राह्मणत्वाकडे जाण्याचा संभव आहे. सध्यांही त्यांच्यांत गुणधर्मानें ब्राह्मण निर्माण झालेले आहेत.

**प्रश्न**—तर मग स्वभावत: जे सात्विक आहेत त्यांसच आपण ब्राह्मण ह्मणतां ?

**स्वामीजी**—अगदीं बरोबर; प्रत्येक मनुष्यांत कमी अधिकप्रमाणानें सत्त्व, रज आणि तम या गुणत्रयाचें मिश्रण असतेंच; त्याचप्रमाणें प्रत्येक मनुष्यांत ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र यांचे गुणही जन्मत:च व्यक्त झालेले असतात. कालपरत्वें यांपैकीं एका अथवा अधिक गुणांचें कमी अधिक प्रमाणानें आधिक्य होतें व त्याच्या वागणुकींत तें स्पष्टपणें आढळूनही येतें. उदाहरणार्थ, मनुष्य निरनिराळ्या प्रकारचे कोणते धंदे करतो हें पहा. ज्या वेळीं पगारासाठीं जो दुसऱ्याची नोकरी करतो, त्या वेळीं तो शूद्र असतो. ज्या वेळीं स्वत:च्या फायद्यासाठीं तो कांहीं व्यापार उदीम करतो, त्या वेळीं तो वैश्य असतो. न्यायासाठीं जेव्हां तो झगडत असतो, त्या वेळीं त्याचे क्षत्रियत्वाचे गुण व्यक्त होत असतात; आणि ज्या वेळीं तो ईश्वरचिंतन करतो अथवा ईश्वरविषयक बाबींची चर्चा करतो तेव्हां तो ब्राह्मण असतो. यावरून कोणाही मनुष्याला एका वर्णांतून दुसऱ्या वर्णांत साहजिक रीतीनें जातां येणें शक्य आहे हें उघड दिसतें. तसें नसतें तर विश्वामित्र क्षत्रियत्वांतून ब्राह्मण कसा झाला असता ? आणि परशुराम क्षत्रिय कसा झाला असता ?

**प्रश्न**—आपण ह्मणतां हें अगदीं बरोबर दिसतें; पण आमचे पंडित आणि कुलगुरु आह्मांस अशा प्रकारें कां सांगत नाहींत ?

**स्वामीजी**—हीच तर मोठी अडचण आपल्या देशांत आहे; पण जाऊंद्या; याबद्दल अधिक चर्चा करण्यांत हांशिल नाहीं.

यानंतर स्वामीजींनीं पाश्चात्यांच्या व्यवहारनैपुण्याबद्दल त्यांची मोठी स्तुति केली. पाश्चात्यांचीं चित्तें धर्ममार्गाकडे वळल्यानंतर त्यांतही ते व्यवहाराप्रमाणेंच उत्साह दाखवितात असेंही ते ह्मणाले.

**मी**—खरें आहे महाराज; ते धर्ममार्गांत पडल्यानंतर त्यांच्या अंतर्गत चैतन्यशक्तीचा विकास लवकर होतो असें मी ऐकिलें आहे. नुकतें परवांच स्वामी शारदानंदांनीं त्यांच्या एका पाश्चात्य शिष्याचें पत्र मल

दाखविलें. त्यांत केवळ चार महिने साधनाचा अभ्यास केल्यानंतर त्याची किती प्रगती झाली होती हें त्यानें लिहिलें होतें.

**स्वामीजी**--यावरून तूंच विचार कर. पाश्चात्य देशांत ब्राह्मण आहेत कीं नाहींत हें तुझें तूंच ठरव. आपल्या इकडेही ब्राह्मण आहेत; पण आपल्या जुलमी सामाजिक पद्धतीनें देशास ते अधोगतीस नेत आहेत. यामुळें जें कांहीं भांडवल स्वभावत:च त्यांजपाशीं आहे तेंही हळूहळू नष्ट होत आहे. सध्यांचा आपल्यांतला गुरुशिष्यसंबंध तरी किती विचित्र आहे पहा. क्वचित् प्रसंगीं गुरूच्या घरीं अन्नाचीही मारामार असते. गुरुपत्नी त्यांना नित्य म्हणत असते कीं आपल्या शिष्यांकडे जाऊन कांहीं तरी आणा. दिवसभर फांसे खेळून संसार कसा चालेल ? यावर ते गुरुमहाराज उत्तर देतात, " ठीक आहे; उद्यां सकाळीं मला आठवण कर. माझ्या अमक्या अमक्या शिष्याला खूप पैसा मिळाला आहे असें मी ऐकतों. अलीकडे पुष्कळ दिवसांत मी त्याच्याकडे गेलों नाहीं. " बंगाल्यांतील कुलगुरुत्वाची पद्धत सांप्रत या दशेप्रत गेली आहे. पाश्चात्यांचे पुरोहित अद्यापि इतके खालीं गेलेले नाहींत. आपल्यापेक्षां ते अझून पुष्कळ बरे आहेत.

---

## ११

## हिंदुस्थानाला बडबड्या लोकांची जरूर नसून काम करणाऱ्यांची जरूर आहे—दारिद्य—हाच हिंदुस्थानांतला मुख्य प्रश्न आहे—ऐहिक व पारलौकिक ज्ञान सामान्य जनतेस करून देण्यासाठीं तरूण संन्यासी शिकवून तयार केले पाहिजेत —तरुणांनीं परोपकारीं देह झिजविला पाहिजे.

[ श्री. शरच्चंद्र चक्रवर्ती बी. ए. यांच्या रोजनिशीवरून. ]

**शिष्य**—स्वामीजी, या देशांत आपण व्याख्यानें देत नाहीं हें कसें ? युरोप आणि अमेरिका हीं खंडें आपण आपल्या व्याख्यानांनीं हालवून सोडलीं; पण येथें आल्यापासून आपण अगदीं स्वस्थ कसे ?

**स्वामीजी**—या देशांत प्रथम भूमिका तयार झाली पाहिजे. तयार झालेल्या भूमींत बीं पेरलें ह्मणजे झाड चांगलें जोमानें उगवतें. युरोप आणि अमेरिका या खंडांतील भूमि सुपीक असून ती बीजग्रहणासाठीं योग्य झालेली आहे. तिकडे भोगाची आतां परमावधि झाली आहे. नानाप्रकारच्या भोगांचे आस्वाद घेऊन घेऊन त्या लोकांचीं मनें आतां तृप्त झालीं आहेत. यामुळें त्या भोगांतही त्यांस आतां शांति सांपडेनाशी झाली आहे. यांत आतां कांहीं तरी बदल झाला पाहिजे, असें तिकडील लोकांस वाटूं लागलें आहे. आपल्या देशांत आपल्या लोकांस भोगही नाहीं आणि योगही नाहीं अशी स्थिति झाली आहे. भोगेच्छा तृप्त झाल्यानंतर योगजिज्ञासा उत्पन्न होते आणि तशा स्थितींत योगाविषयीं ऐकण्यास श्रोता उत्सुक असतो व सांगितलेलें ज्ञान त्याला पटतें. आमच्या देशांत रोग, दुःख आणि नानाप्रकारचीं संकटें यांनीं आपलें माहेरघर केलें आहे. पोटभर खावयासही न मिळाल्यामुळें आपले लोक शरिरानें सुदामदेव बनले असून मनानेंही दुर्बल झाले आहेत. अशा प्रकारच्या स्थितींत नुसतीं व्याख्यानें देऊन कोणता कार्यभाग होणार ?

**शिष्य**—असें कां ह्मणतां ? आपला देश ही धर्मभूमि आहे असें आपणच ह्मणतां ना ? आपल्या लोकांस धर्मविषयक बाबी जितक्या चांगल्या समजतात, तितक्या दुसऱ्या कोणासही त्या समजत नाहींत असें आपलें मत आहे ना ? मग आपल्या स्फूर्तिकारक भाषणांनीं भरतभूमीस नवजीवन प्राप्त होऊन तें पूर्णपणें फलद्रूप कां होणार नाहीं ?

**स्वामीजी**—धर्म ह्मणजे काय, हें प्रथम नीट समजाऊन घेतलें पाहिजे. आपण प्रथम कूर्मावताराची पूजा केली पाहिजे. कूर्मावतार ह्मणजे पोट. ‘ आधीं पोटोबा आणि मग विठोबा ’ ही ह्मण सर्वांस ठाऊक आहेच. पोटाची शांति आधीं झाल्याशिवाय तुमचीं धार्मिक व्याख्यानें कोणासही रुचावयाचीं नाहींत. ह्या दुष्काळाच्या राक्षसाचा नाश कसा करावा या प्रश्नानें हिंदुस्थानाचें डोकें सध्यां अगदीं भंडावून गेलें आहे. अत्युत्कृष्ट खनिज संपत्तीची परकीयांनीं केलेली लूट, मालाची बाह्य देशीं होत असलेली अनावर वाहतुक आणि विशेषतः लोकांतील परस्परांबद्दलचा मत्सर या गोष्टी हिंदी लोकांचीं जिव्हारें खात आहेत. गुलामगिरींत कित्येक शतकें खितपत पडलेल्या लोकांचा मत्सर हा अगदीं उपजत स्वभाव होऊन जातो. प्रथम

पोटाची कांहीं तरी व्यवस्था करा. ज्या लोकांस तुह्मीं धर्मज्ञान देऊं पाहतां त्यांच्या डोळ्यांसमोरचा हा भुकेचा बागुलबोवा नाहींसा केल्याशिवाय व्याख्यानांसारख्या पोकळ गोष्टींनीं कोणतेंही हित साधणार नाहीं.

**शिष्य**—हा बागुलबोवा नाहींसा करण्यासाठीं काय केलें पाहिजे?

**स्वामीजी**—पूर्णपणें त्यागी अशा तरुणांची प्रथम जरूर आहे. स्वतः-च्या सुखावर अगदीं पाणी सोडून परहितार्थ प्रसंगीं प्राणही देण्याची ज्यांची तयारी असेल, असे तरुण आह्मांस पाहिजेत. हा उद्देश मनांत धरून तरुण संन्यासी शिकवून तयार करण्याकरितां एक मठ स्थापन करण्याचा माझा विचार आहे. सामान्य जनतेची स्थिति किती शोचनीय झाली आहे हें प्रत्यक्ष उदाहरणानें आणि बुद्धिवादानें पटवून देण्याकरितां हे संन्यासी दारो-दार हिंडतील. सामान्य जनतेच्या कल्याणाचा मार्ग आणि त्याचीं साधनें यांचा उपदेश ते तिला करतील; आणि याबरोबरच अगदीं साध्या आणि सोप्या भाषेंत धर्माचीं उच्च तत्त्वेंही ते सामान्य लोकांस सांगतील. आम-च्या देशांतील सामान्य जनतेची स्थिति झोंपीं गेलेल्या कुंभकर्णासारखी आहे. सांप्रतच्या विश्वविद्यालयाच्या पद्धतीनें दिलेलें शिक्षण फारतर शेंकडा एकदोन लोकांपर्यंत पोंचतें; आणि ज्यांना हें शिक्षण मिळतें त्यांना त्यांच्या देशकार्याच्या धडपडींत यश येत नाहीं. त्या बिचाऱ्यांचा यांत कांहीं अप-राध आहे असें नाहीं! बिचारे पाठशाळेंतून बाहेर पडतात न पडतात तोंच कित्येक मुलें 'बाबा' ह्मणून त्यांस हांक मारूं लागतात. कांहींतरी भानगडी करून एखाद्या कारकुनीची जागा ते मोठ्या कष्टानें मिळवितात. फार मोठी उडी पडली तर ते डेप्युटी मॅजिस्ट्रेट होतात. झालें! शिक्षणाची परमावधि झाली. कुटुंबाचें जंगी ओझें पाठीवर असल्यामुळें त्यांची मजल अधिक उच्च वस्तूकडे जात नाहीं अथवा अधिक उच्च विचार त्यांच्या मनास शिवत नाहींत. स्वतःच्या गरजा भागविण्यापुरतीं साधनेंसुद्धां त्यांस उपलब्ध नसतात. असले लोक परहितार्थ झटतील ही अपेक्षा तरी कां करावी?

**शिष्य**—या स्थितींतून बाहेर पडण्यास कांहीं मार्ग नाहीं काय?

**स्वामीजी**—मार्ग अवश्य आहे. हिंदुस्थान ही सनातन धर्मभूमि आहे. आज ती अवनतीला गेली आहे ही गोष्ट खरी, पण तिलाच पुढें उन्नतीही प्राप्त होईल यांत संशय नाहीं; आणि ही उन्नति अशी होईल कीं तिजकडे

सारें जग चकित दृष्टीनें बघीत राहील. अवनतीचा खाडा जितका अधिक खोल तितकीच उन्नतीचीही लाट अधिक जोरदार आणि अधिक उंच असते.

**शिष्य**—हिंदुस्थानची उन्नति कोणत्या प्रकारची होईल ?

**स्वामीजी**—हा मार्ग तुमच्या लक्षांत अद्यापिही येत नाहीं ? आकाशाच्या पूर्वभागीं अरुणोदयाची आरक्त प्रभा मला आजच दिसूं लागली आहे. आतां सूर्योदय होण्यास फारसा अवकाश नाहीं. तुह्मी आपल्या कार्यास आरंभ करण्याचीच बाकी राहिली आहे. ऐहिक गोष्टींचें व्यर्थ स्तोम माजवून ‘ माझा संसार, ’ ‘ माझा संसार ’ ह्मणून जप करीत बसण्यांत काय तात्पर्य आहे ? देशाच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत हिंडून लोकांस उपदेश करणें हेंच तुमचें सांप्रतचें कर्तव्य आहे. नुसतें हात जोडून बसून कोणतेंही कार्य व्हावयाचें नाहीं, ही गोष्ट लोकांच्या लक्ष्यांत तुह्मी आतां आणून दिली पाहिजे. त्यांची खरी स्थिति काय आहे ही त्यांस समजावून द्या. त्यांना ह्मणा, बंधू हो आतां उठा, जागे व्हा; आणखी किती वेळ तुह्मी असेच घोरत पडणार ? त्यांची स्थिति सुधारण्यास त्यांस तुह्मीं उपदेश करा. आपल्या शास्त्रांत जें ज्ञानभांडार भरलें आहे तें त्यांच्या समजुतींत येईसें करा. सामान्य बुद्धीच्या मनुष्यालाही समजेल अशा रीतीनें हीं तत्त्वें स्पष्ट करून लोकांस तुह्मी समजावून दिलीं पाहिजेत. धर्मज्ञानाचा मक्ता आजपर्यंत ब्राह्मणांनीं आपल्या हातीं ठेवला होता; पण कालचक्राच्या लाटेपुढें त्यांस तग काढवेना. आतां हें ज्ञान सर्वांस प्राप्त होईल अशी योजना तुह्मी केली पाहिजे. धर्मज्ञानावर ब्राह्मणाप्रमाणेंच सर्वांचाही हक्क आहे, ही गोष्ट लोकांच्या मनावर तुह्मी ठसविली पाहिजे. आमच्या धर्माच्या या जाज्ज्वल्य मंत्राचा उपदेश थेट चांडालापर्यंत सर्वांच्या कानीं पडूं द्या. त्याचप्रमाणें ऐहिक बाबींचें शिक्षणही सोप्या शब्दांनीं तुह्मीं त्यांस दिलें पाहिजे. व्यापार-उदीम, शेतकी इत्यादि विषयांचीं तत्त्वें तुह्मी त्यांस समजावून दिलीं पाहिजेत. हें काम तुमच्यानें होत नसेल तर तुमच्या शिक्षणाला, तुमच्या संस्कृतीला आणि तुमच्या वेदवेदांताच्या अभ्यासाला धिःक्कार असो.

**शिष्य**—महाराज, पण आमच्या ठिकाणीं एवढें सामर्थ्य आहे कोठें ? आपल्या अंगीं असलेल्या सामर्थ्याचा शतांश जरी माझ्या अंगीं असता तरी मी स्वतःस मोठा भाग्यवान् समजलों असतों.

**स्वामीजी**—किती मूर्खपणाची कल्पना ही! सामर्थ्य आपण होऊनच चालून येत असतें. कार्य करण्यास तुह्मी आरंभ केला ह्मणजे सामर्थ्य एवढया वेगानें तुमच्या अंगावर येतें कीं तें सहन करणेंही तुह्मांस जड जाईल. परहितबुद्धीनें अगदीं थोडेंसें काम केलें तरी तेवढयानेंही तुमची अंतस्थ शक्ति जागृत होऊं लागते. परहिताचें नुसतें चिंतन केल्यानेंही तुमच्या हृदयांत सिंहाचें सामर्थ्य भरून जातें. तुह्मां सर्वांवर माझें अगदीं निकट प्रेम आहे; तथापि परहितार्थ झटत असतां तुह्मांस मृत्यु यावा अशी माझी इच्छा आहे. परहितासाठीं मृत्युमुखांतसुद्धां तुह्मी उडी घातली तर मला आनंदच होईल.

**शिष्य**—पण अशा स्थितींत आमच्या बायकापोरांचें काय होणार ?

**स्वामीजी**—परहितार्थ आपल्या जिवाचा होम करण्यास तुह्मी सिद्ध झालां तर त्यांची तरतूद परमेश्वर खास लावील. ' **न हि कल्याणकृत्कश्चित् दुर्गतिम् तात गच्छति** ' हें भगवान् श्रीकृष्णाचें वचन तुझ्या पाहण्यांत कधीं आलें नाहीं काय ?

**शिष्य**—होय महाराज; आपलें ह्मणणें आतां माझ्या लक्ष्यांत आलें.

**स्वामीजी**—त्याग हाच काय तो मुख्य मुद्दा आहे. अंगीं त्याग पूर्ण बाणल्यावांचून एक दिलानें परहितार्थ कोणीही झटत नाहीं.ज्यांच्या आंगीं त्याग पूर्ण बाणला आहे त्याला समदृष्टि प्राप्त होते. उच्चनीच भेदभाव मावळून त्याला सर्व सारखींच दिसूं लागतात. अशा स्थितींत ही माझी बायको आणि हीं माझीं मुलें असा भेद करून तो त्यांस मिठी कां मारील ? ज्याला अशी समदृष्टि प्राप्त झाली असेल त्याच्या दाराशीं एखादा बुभुक्षित नारायण गेला तर त्याला भाकरीचा तुकडा न टाकतां आपल्या बायकापोरांपुढें जिलबीचें ताट तो ठेवील काय ? असें वर्तन खरोखर पशुलाच योग्य आहे.

**शिष्य**—परहितार्थ काम करावयाचें ह्मटलें कीं पुष्कळ वेळां पैशाची जरूर भासते. अशा वेळीं मला पैसा कोठून मिळणार ?

**स्वामीजी**—अरे, आपल्या हातीं जेवढें आहे तेवढेंच कां करूं नये ? पैशानें भागणाऱ्या इतरांच्या गरजा आपणास भागवितां न आल्या तर त्यांना सदुपदेश करणें एवढें तरी आपल्या हातीं आहे ना ? काय, यालाही पैसा लागतो ?

**शिष्य**—होय महाराज, एवढें माझ्या हातून होण्यासारखें आहे.

**स्वामीजी**—पण हातीं आहे एवढें नुसतें तोंडानें ह्मणूनच भागत नाहीं. प्रत्यक्ष कृतीनें कांहीं तरी करून दाखव ह्मणजे येथें तुझ्या येण्याचें सार्थक झालें असें मी समजेन. आतां कार्यासाठीं तुह्मी सर्वांनीं कंबर बांधिली पाहिजे. हें आयुष्य असें किती काळ टिकणार आहे? जगांत तुह्मी आलां आहां तर आतां आपली कांहीं तरी खूण मागें ठेवा. तसें न झालें तर झाडें आणि दगड व तुह्मी मनुष्यें यांत काय अंतर आहे? झाडेंही जन्मास येतात, वाढतात, कुजतात आणि मरतात. त्यांच्याच सारखें जन्मास यावें आणि मरावें अशी तुमची इच्छा असेल तर तसें करण्यास तुमचा हात कोणीही धरलेला नाहीं. तूं स्वतः वेदांताचा अभ्यास करतोस त्याचें उत्तम फळ तुझ्या कृतीनें स्पष्ट झालें पाहिजे. सर्वांच्या अंतर्यामीं अनंत शक्तीचा वास आहे, ही जागृति तूं सर्वत्र उत्पन्न कर. केवळ स्वतःच्याच मुक्तीमागें लागून तुला काय लाभ होणार आहे? असें करणें ह्मणजे शुद्ध आपलपोटेपणा होय. तुझी ध्यानधारणा आणि तुझी मुक्ति इत्यादि साऱ्या वस्तूंस तूं आतां गुंडाळून ठेव. जें कार्य करण्यास मी स्वतःस वाहून घेतलें आहे, त्यांतच तुझाही सारा जीव गुंतूं दे.

स्वामीजींचे हे उत्तेजनपर शब्द शिष्य गंभीरतेनें ऐकत होता. स्वामीजी आणखी पुढें बोलूं लागले:—

" प्रथम भूमीची मशागत करणें हें तुमचें कर्तव्य आहे. तसें झालें ह्मणजे धर्मावर व्याख्यानें देण्यास हजारों विवेकानंद जन्मास येतील. एक विवेकानंद गेला तर कसें होईल ही काळजी बाळगण्याचें प्रयोजन तुह्मांस नाहीं. भगिनी निवेदिता परक्या जातीची स्त्री होऊन हिंदु लोकांच्या हितासाठीं कशी झटत आहे आणि त्यांच्यासाठीं अगदीं कनिष्ठ प्रतीचींही कामें ती कशी करते हें तुह्मांस दिसत नाहीं काय? आणि तुह्मी हाडाचे हिंदु होऊन स्वदेशबांधवांसाठीं कोणतेंही कार्य तुमच्या हातून होऊं नये काय? जा; ज्या ठिकाणीं प्लेग, दुष्काळ इत्यादि विघ्नें लोकांच्या पाठीस लागलीं असतील अशा ठिकाणीं जा आणि त्यांचे हाल कमी करण्यासाठीं उद्योग करा. अशा कामीं फार झालें तर तुह्मांस मरण येईल. पण तसें झालें तरी काय हरकत आहे? तुमच्यासारखे लक्षावधि किडे रोजच्या रोज

जन्मून मरत नाहींत काय? तसें झालें ह्मणून जगाचें कांहीं अडून राहिलें आहे काय? मरण हें कोणासही सुटलें नाहीं; पण कोणत्या तरी महत्कार्यां-साठीं मरण पावणें हेंच मोठें भाग्य होय. अशा रीतीनें मरण पावणें हेंच ध्येय सर्वांच्या ध्यानीं आणून द्या; ह्मणजे त्यांत इतरांबरोबर तुमचाही फायदा होईल. तुमच्यासारख्या तरुणांकडेच सारा देश मोठया आशेनें दृष्टि लावून बसला आहे. तुमच्यासारखे तरुण हात जोडून स्वस्थ बसतात, हें पाहून दुःखानें माझें अंतःकरण पिळवटतें. आतां कंबरा बांधून उद्योगास लागा, क्षणभरही थांबण्याइतका अवकाश आतां उरलेला नाहीं. एकाएका दिवसानें काळ तुमचें आयुष्य भक्षण करीत आहे. पुढेंमागें सर्व कांहीं आपोआप होईल अशा विचारानें स्वस्थ बसूं नका. तुह्मी स्वस्थ बसलां तर कांहीं न होतां तुमचा घात मात्र अवश्य होईल हें पक्कें ध्यानांत ठेवा.

---

## १२

## ज्ञान आणि भक्ति यांची एकवाक्यता—सच्चिदानंद—पंथ कसे निर्माण होतात—शक्ति आणि अवतार यांचें पूजन व श्रद्धा हीं पुन्हां आलीं पाहिजेत--आपणास मधुर भावाची जरूर नसून वीर्ययुक्त ध्येयाची जरूर आहे--श्रीरामकृष्ण--अवतार.

[ श्री. शरच्चंद्र चक्रवर्ती, बी. ए. यांच्या रोजनिशीवरून. ]

**शिष्य**—स्वामी महाराज, ज्ञान आणि भक्ति यांची एकवाक्यता कशी होईल? भक्तिमार्गी लोक शंकराचें नांवही कानीं पडूं देत नाहींत. तसेंच ज्ञानमार्गीही भक्तांना वेडे समजतात. भक्तीच्या उन्मादानें भक्तानें गावें, नाचावें आणि डोळ्यांत अश्रु आणावे, या गोष्टी ज्ञानमार्गी लोकांना मूर्ख-पणाच्या वाटतात.

**स्वामीजी**—ज्ञान आणि भक्ति यांत जो तंटा आपणास दिसून येतो तो फक्त आरंभींच्या काळचाच आहे. या दोन्ही मार्गांच्या पूर्वदशेंतच हा तंटा दिसतो. एके वेळीं शिव आणि राम यांच्यांत युद्ध झालें. शिव हे रामाचे गुरु असून राम हे शिवाचे गुरु होते. थोड्या काळानें या दोघांतील

लढाई संपून ते पुन्हां एक झाले; तथापि शिवगण आणि वानर यांच्यांतील तंटा पुष्कळ काळ थांबला नाहीं. ही गोष्ट श्रीरामकृष्ण सांगत असत.

**शिष्य**--होय महाराज, ही गोष्ट मी ऐकिली आहे.

**स्वामीजी**--अत्युच्च प्रतीची भक्ति आणि अत्युच्च प्रतीचें ज्ञान यांत केव्हांही विरोध असत नाहीं. परमेश्वराला प्रेममय स्वरूपांत पाहणें हीच अत्युच्च भक्ति होय. सर्वत्र प्रेममय परमेश्वर भरला आहे असा अनुभव ज्याला येईल त्याच्या मनांत कोणाबद्दल तरी द्वेषभाव कसा उत्पन्न होईल? असा मनुष्य दुसऱ्याला पीडा कशी करील? आपल्या अंतःकरणांत कोणतीही वासना यत्किंचित् शिल्लक असेल तोंपर्यंत खऱ्या प्रेमाचा अनुभव आपणास केव्हांही येणार नाहीं. कामकांचनाची इच्छा आहे तोंवर परमेश्वराची भेट नाहीं असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत. प्रेमाच्या पूर्णत्वाचा अनुभव आला ह्मणजे स्वतःच्या देहाचीही शुद्धि राहत नाहीं. '**ब्रह्मानंदीं लागली टाळी। कोण देहातें सांभाळी**' असा अनुभव भक्ताला प्रेमाच्या अत्युच्च अनुभवांत येतो. त्याचप्रमाणें सर्वत्र एकरूप अनुभवास येणें ही ज्ञानाची परिसीमा होय. सर्वत्र मीच भरून गेलों आहें असा अनुभव ज्ञान्याला त्याच्या अत्युच्च दशेंत प्राप्त होतो. अहंकाराची यत्किंचितही छटा शिल्लक असेल तोंपर्यंत असा अनुभव येणें शक्य नाहीं.

**शिष्य**--तर मग अत्युच्च प्रतीचें ज्ञान आणि अत्युच्च प्रतीची भक्ति हीं एकच आहेत काय?

**स्वामीजी**--होय; अगदीं बरोबर. कोणीही पूर्ण ज्ञानी झाल्याशिवाय त्याला खऱ्या भक्तीचा अनुभव येतच नाहीं. ब्रह्म हें सच्चिदानंदरूप आहे हें वेदांताचें मत तुह्मांस ठाऊक असेलच.

**शिष्य**--होय महाराज!

**स्वामीजी**--सच्चिदानंद यांत तीन पदें आहेत. सत् ह्मणजे अस्तित्व; चित् ह्मणजे ज्ञान अथवा जाणीव आणि आनंद ह्मणजे प्रेम. ब्रह्माच्या अस्तित्वाबद्दल अथवा 'सत्' स्वरूपाबद्दल भक्त आणि ज्ञानी यांच्यांत वाद नाहीं. त्यांच्यांतील फरक इतकाच कीं, ज्ञानी हा चित्स्वरूपावर अधिक जोर देतो आणि भक्त आनंदस्वरूपाकडे अधिक लक्ष पोहोंचवितो. पण

चित्स्वरूपाच्या रहस्याचा अनुभव होण्याबरोबर आनंदस्वरूपाचा अनुभवही अवश्य होतोच. कारण, चित् आणि आनंद हीं वस्तुतः एकरूपच आहेत.

**शिष्य**—महाराज, असें आहे तर हिंदुस्थानांत इतके वेगवेगळे पंथ कसे निर्माण झाले? तसेंच ज्ञानी आणि भक्तिमार्गी यांच्या ग्रंथांत इतके भेद कसे निर्माण झाले?

**स्वामीजी**—या दोन्ही मार्गांच्या पूर्व स्वरूपांत मात्र वाद आहेत, एवढाच मुख्य मुद्दा ध्यानांत ठेवण्यासारखा आहे. ज्ञानी अथवा भक्त आपापल्या ध्येयास पोंचण्यासाठीं जे भिन्न भिन्न मार्ग स्वीकारतात त्यांच्या आरंभीं मात्र भिन्नता असते. अखेरीस ते सर्व मार्ग एकाच ठिकाणीं पोंचतात. साधनें अधिक उच्च कीं साध्य अधिक उच्च? साध्यापेक्षां साधनें अधिक किमतीचीं आहेत असें कोणीही ह्मणणार नाहीं. साध्य एकच असलें तरी प्रकृतिभेदानें आणि परिस्थितीच्या भेदानें तेंच साध्य सिद्ध होण्यास अनेक प्रकारचे मार्ग असूं शकतील. कोणी माळ घेऊन जप करील; कोणी ध्यान धरून बसेल; कोणी पूजाअर्चा करील अथवा आणखी कोणी होमहवन वगैरे करील; तथापि हीं साध्यें नसून हीं एकाच साध्याचीं अनेक साधनें मात्र आहेत. एकच सनातन धर्मपुरुषाचे हे निरनिराळे अवयव आहेत. हीं अनेक साधनें असून पराभक्ति अथवा ब्रह्मानुभव हें साध्य आहे. या तंट्याच्या मुळाशीं जाऊन त्याचें तुह्मीं निरीक्षण केलें तर या वादाचें मूळ कोठें आहे हें तुमच्या लक्षांत येईल. एक ह्मणतो ‘ पूर्वाभिमुख होऊन तुह्मी ईश्वरार्चन केलें तरच तो तुह्मांस प्राप्त होईल. ’ दुसरा ह्मणतो, ‘ तसें नाहीं; परमेश्वराची प्राप्ति करून घेण्यास पश्चिमेकडेच तोंड केलें पाहिजे. ’ कांहीं युगांपूर्वी एखाद्याला पूर्वाभिमुख स्थितींत ब्रह्मानुभव झाला असेल; एवढ्यावरून त्याचे शिष्य तशाच स्थितींत ब्रह्मानुभव होणें शक्य आहे असें लोकांस सांगत सुटले. दुसऱ्याला दुसऱ्या कांहीं प्रकारें अनुभव आला असेल तेव्हां त्याचे शिष्य तेवढाच मार्ग खरा समजूं लागले यांत नवल नाहीं. अशाच रीतीनें हे अनेक पंथ आजपर्यंत उद्भवले आहेत. ‘हरि’ या नामोच्चारानेंच कोणाची पराभक्ति सिद्ध झाली असेल; त्या बरोबर

**हरेर्नाम हरेर्नाम हरेर्नामैव केवलम् ।**
**कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥**

असा श्लोक त्यानें शास्त्रांत घातला असावा. दुसऱ्या एखाद्याला अल्लाच्या जपानेंच परमार्थप्राप्ति झाली असावी, अशी कल्पना केली तर त्यानें अल्लाचा पंथ काढला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. अशाच रीतीनें अनेक पंथांची उत्पत्ति झाली आहे; तथापि या साऱ्यांचा अंतिम हेतु काय आहे एवढेंच आपणास पहावयाचें आहे. 'श्रद्धा' हाच सर्वांचा अंतिम हेतु आहे. नाचिकेताच्या अंत:करणांत श्रद्धा उत्पन्न झाली असें वर्णन उपनिषदांत आहे. श्रद्धा या शब्दांत जो अर्थ आहे तो एकाग्रता या शब्दानेंही पूर्णपणें व्यक्त होऊं शकत नाहीं. श्रद्धा या शब्दाच्या अर्थांतील कांहीं अंशाचा बोध मात्र एकाग्रनिष्ठा या शब्दानें होतो. कोणत्याही सत्य प्रमेयाकडे अत्यंत श्रद्धेनें व अत्यंत एकाग्रतेनें आपलें ध्यान लावलें तर तुमचें मन हळूहळू अद्वैताकडे जात आहे असा अनुभव तुह्मांस येऊं लागेल. अशा प्रकारचा अभ्यास एकनिष्ठेनें करावा असा उपदेश भक्तिमार्गी आणि ज्ञानमार्गी या दोन्ही ग्रंथांतून केलेला आढळतो. कालांतरानें या मूळच्या तत्त्वार्थांचा लोप होऊन त्याचें बाह्यांग मात्र देशाचाराच्या रूपानें शिल्लक उरलें. असा प्रकार केवळ हिंदुस्थानांतच घडला आहे असें नसून जगांतील सर्व देशांत आणि सर्व प्रकारच्या समाजांत हीच स्थिति आढळून येते. सामान्य मनुष्यांना विवेकशक्ति कमी असल्यामुळें अखेरचें साध्य त्यांच्या ध्यानांतून जाऊन त्यांच्यांत तंटयास सुरवात होते. यामुळेंच अनेक पंथही निर्माण होतात.

**शिष्य**—स्वामी महाराज, ती स्थिति नाहींशी करावयास काय करावें?

**स्वामीजी**—तसें होण्यास आपली नष्ट झालेली श्रद्धा पुन्हां परत आली पाहिजे. हा दुष्ट वृक्ष मुळापासूनच उपटून टाकला पाहिजे. सर्व पंथांत आणि सर्व धर्मांत कालस्थलातीत अशीं सत्य तत्त्वें असतात ही गोष्ट खरी; पण त्यांजभोंवतीं इतर प्रकारचा उकिरडाही पुष्कळ माजलेला असतो. त्यांच्या भोंवतालची ही घाण काढून टाकून तीं सनातन तत्त्वें लोकांच्या नजरेसमोर आणलीं पाहिजेत. असें झालें तरच आपल्या धर्माची स्थिति सुधारून आपल्या देशाचाही त्यापासून फायदा होईल.

**शिष्य**--हें कोणत्या मार्गानें करतां येईल ?

**स्वामीजी**--हें साध्य करावयास प्रथम पुण्य पुरुषांच्या उत्सवांचा आणि पूजनाचा प्रघात पाडला पाहिजे. श्रीकृष्ण, श्रीरामचंद्र, महावीर, श्रीरामकृष्ण इत्यादि सत्पुरुषांचे उत्सव करून त्यांच्या चरित्राचे आदर्श लोकांपुढें मांडले पाहिजेत. या आदर्शांबरहुकूम आपणास चालावयाचें आहे ही गोष्ट लोकांच्या ध्यानीं आणून दिली पाहिजे. श्रीरामचंद्र आणि महावीर यांची उपासना तुह्मांस वाढवितां येईल काय ? गोकुळ वृंदावनांतील श्रीकृष्णाला सध्यां बाजूला ठेवून भगवद्गीतेचा उपदेश उच्च रवानें सांगणाऱ्या श्रीकृष्णाची भक्ति सर्व देशभर फैलाविली पाहिजे. श्रीकृष्णाच्या गीतेचा सिंहनाद साऱ्या देशभर दुमदुमून राहिला पाहिजे. त्याचप्रमाणें सर्व सामर्थ्याचें मूळ जी आदिमाता आदिशक्ति तिची उपासनाही दररोज होईल असे उपाय केले पाहिजेत.

**शिष्य**--वृंदावनांत गोपींशीं श्रीकृष्णानें केलेली क्रीडा चांगली नाहीं काय ?

**स्वामीजी**--आपल्या सांप्रतच्या परिस्थितींत या मार्गाचा उपयोग आपणास कांहीं होणार नाहीं. मुरली वाजवून आपल्या देशास आतां नवें चैतन्य प्राप्त होणार नाहीं. रजोगुणी वीरपुरुषाच्या उपासनेची आपणास सध्या गरज आहे. सत्यासाठीं मरण्यासही जो तयार असेल, ज्ञानाचें तीव्र खड्ग ज्यानें आपल्या हातीं धारण केलें असेल आणि त्यागाचें कवच ज्यानें आपल्या अंगावर चढविलें असेल अशा वीर पुरुषाची उपासनाच आपणास श्रेयस्कर होईल. संसारसंग्रामांत छातीनें दोन हात करण्यास पुढें सरणाऱ्या वीराची उपासना आपणास हवी आहे. संसार ह्मणजे नंदनवन आहे असें समजून प्रेमालाप काढीत फिरणाऱ्या प्रेमी पुरुषाची उपासना आपणांस सध्यां श्रेयस्कर नाहीं.

**शिष्य**--तर मग गोपींचा भक्तिमार्ग खोटा आहे काय ?

**स्वामीजी**--असें कोण ह्मणतो ? माझें असें मुळींच ह्मणणें नाहीं. परमेश्वरप्राप्तीचीं जीं अनेक साधनें आहेत त्यांपैकीं हें एक श्रेष्ठ प्रतीचें साधन आहे; पण हल्लींच्या कनककामिनीच्या युगांत त्या उच्च तत्त्वांचें नुसतें आकलन करणारेही फार थोडे सांपडतील.

**शिष्य**--तर मग मधुरभावाच्या साधनांनीं जे परमेश्वराची उपासना करीत असतील त्यांचा मार्ग बरोबर नाहीं असें ह्मणावें काय?

**स्वामीजी**--होय; असें ह्मणणें भाग पडतें खरें. यांत कदाचित् हाताच्या बोटांवर मोजतां येण्यासारखे सन्मार्गवर्ती सत्पुरुष सांपडतील ही गोष्ट खरी; तथापि यांत पुष्कळ लोक तमोगुणीच असतात. यांपैकीं पुष्कळांचीं चित्तें अधोगामी झालेलीं असून त्यांना विलक्षण दौर्बल्य आलेलें असतें. आपला देश आपणास उदयोन्मुख करावयाचा आहे. तेथें उत्साहाचा संचार आपणास कर्तव्य आहे. याकरितां महावीराचें पूजन आणि शक्तिपूजन हीं सर्वत्र रोज होतील असें आपण केलें पाहिजे. श्रीरामचंद्राची उपासना घरोघर झाली पाहिजे. तुमच्या देशाचें कल्याण आणि तुमचें स्वतःचें कल्याण हीं तुह्मांस साधावयाचीं असतील तर असें करण्यावांचून अन्य उपाय नाहीं.

**शिष्य**—पण भगवान् श्रीरामकृष्णसुद्धां मधुरभावानें परमेश्वराचें भजन करीत असत असें मी ऐकलें आहे हें खरें नाहीं काय ?

**स्वामीजी**—होय; तूं ऐकलेंस तें अगदीं खरें. पण त्यांची गोष्टच वेगळी. श्रीरामकृष्ण आणि इतर सामान्य मनुष्यें यांची तुलना कशी होईल ? भगवान् श्रीरामकृष्णांनीं निरनिराळ्या पंथांच्या मार्गानीं जाऊन आत्मानुभव घेतला. सर्व पंथ शेवटीं एकाच सत्याकडे जातात हें दाखविण्याचा त्यांचा उद्देश होता. त्यांनीं जी गोष्ट साध्य करून दाखविली ती तुह्मांआह्मांसारख्यांस कधीं तरी साध्य होईल काय? भगवान् श्रीरामकृष्णांच्या चरित्राचें संपूर्ण आकलन आपणांपैकीं एकासही झालें नाहीं. यामुळें त्यांच्यासंबंधीं कोणतेही उद्गार ठामपणें काढणें मला धोक्याचें वाटतें. त्यांचें चरित्र त्यांना स्वतःलाच ठाऊक. शरिरानें ते सामान्य मनुष्यासारखे दिसत; तथापि त्यांची प्रत्येक गोष्ट इतर सामान्य माणसांहून अगदींच वेगळी असे.

**शिष्य**—ते अवतारी पुरुष होते असा आपला समज आहे काय ?

**स्वामीजी**—अवतार ह्मणजे आपण काय समजतां हें मला प्रथम सांगा.

**शिष्य**—माझ्या ह्मणण्याचा भावार्थ इतकाच कीं, श्रीरामचंद्र, श्रीकृष्ण, श्रीगौरांग, श्रीबुद्ध अथवा येशूख्रिस्त यांच्यासारखेच ते होते काय ?

**स्वामीजी**—तुह्मी जीं नांवें आतां घेतलीं त्यांहूनही श्रीरामकृष्ण अधिक मोठे होते, हें मला अनुभवानें ठाऊक आहे. हा केवळ माझा समज होता असें नव्हे—समज ही अगदीं क्षुल्लक बाब आहे—असा माझा प्रत्यक्ष अनुभव आहे. असो; तूर्त याबद्दल अधिक चर्चा नको.

थोडा वेळ थांबून स्वामीजी पुढें बोलूं लागले, " काल, परिस्थिति आणि लोकांच्या गरजा यांस योग्य होईल अशा प्रकारचा धर्ममार्ग स्थापन करण्याकरितां महापुरुष अवतार घेत असतात. त्यांना महापुरुष अथवा अवतारी पुरुष यांपैकीं कोणतेंही नांव तुह्मी द्या. नुसत्या नांवांत विशेष मातब्बरी नाहीं. मनुष्यमात्राचें अखेरचें साध्य काय आहे हें आपल्या चरित्रांत ते व्यक्त करीत असतात. यानंतर इतर सामान्य मनुष्यें त्यांच्या अनुरोधानें हळूहळू चालूं लागतात. पुढें हळूहळू पंथ निर्माण होतात आणि त्यांचा प्रसार होतो. कालेंकरून या पंथांस अवनतावस्था प्राप्त होते. असें झालें ह्मणजे नवे महापुरुष पुन्हां जन्म घेतात. अशा प्रकारचा हा सनातन कायदा आहे. नदीच्या प्रवाहाप्रमाणें हा क्रम युगानुयुगें अखंड सुरू असतो.

**शिष्य**—श्रीरामकृष्ण अवतारी पुरुष होते असा उपदेश आपण लोकांस कां करीत नाहीं ? तसें करण्यास लागणारें सामर्थ्य आणि वक्तृत्व हें सर्व आपणापाशीं आहे.

**स्वामीजी**—मी तुह्मांला खरेंच सांगतों कीं रामकृष्णांच्या चरित्राचा संपूर्ण उलगडा मला झालेला नाहीं. त्यांच्यासंबंधीं मी बोलूं लागलों ह्मणजे सत्यवस्तु बाजूस राहून मीं कांहीं अपुरें बोलेन कीं काय अशी भीति मला वाटते. त्यांचें चरित्र सर्व बाजूंनीं खुलवून दाखविण्यास लागणारें वाक्चातुर्य मजपाशीं नाहीं अशी मला भीति वाटते. यामुळें माझ्या भाषणानें लोकांच्या मनावर त्यांचें महत्व न बिंबतां कदाचित् त्यांना कांहीं उणेपणाच येईल अशी धास्ती मला नित्य वाटत असते.

**शिष्य**—पण ते अवतारी पुरुष होते असें सांगत फिरणारे आज पुष्कळ आहेत.

**स्वामीजी**—ठीक आहे. त्यांच्या मर्जीप्रमाणें त्यांनीं वागावें. श्रीरामकृष्णांबद्दल त्यांची स्वतःची जी काय समजूत झाली असेल ती ते लोकांस

सांगत आहेत. तुह्मांलाही वाटेल तर उद्यांपासून तुह्मीही तसें करण्यास सुरवात करा.

**शिष्य**--महाराज, मला आपल्या चरित्राचेंसुद्धां आकलन झालेलें नाहीं; मग श्रीरामकृष्णांची गोष्ट कशाला बोलावी ? आपल्या सामर्थ्यांचा एक लहानसा अंश जरी मला प्राप्त झाला तरी मी स्वतःला मोठा भाग्यवान् समजेन.

## १३

## ब्रह्म आणि भेद--आत्मानुभव--परमानंद हेंच सर्वांचें ध्येय --'अहं ब्रह्मास्मि' हेंच चिंतन सदोदित करा--विवेक आणि त्याग हींच साधनें--निर्भय व्हा.

[ श्री. शरच्चंद्र चक्रवर्ती, बी. ए. यांच्या खासगी रोजनिशीवरून. ]

**शिष्य**—स्वामी महाराज, ब्रह्म हें एकच जर सत्यरूप आहे तर जगांत इतकी अनेकता कां असावी ?

**स्वामीजी**—दृश्य जगाच्या दृष्टीनेंच हा प्रश्न तुह्मी विचारीत आहां ना ? ब्रम्हाचें जें व्यक्त स्वरूप आहे त्याकडे विवेक दृष्टीनें अवलोकन करून करून आपण अखेरीस एकरूपापर्यंत येतों. पण तुह्मी ब्रह्मरूपांत एक वेळ स्थिरावलांत ह्मणजे तेथून तुह्मास या भेदांची ह्मणजे विविधतेची प्रतीति होईल काय ?

**शिष्य**--हें खरें महाराज; मी स्वतःच अभेद रूपास पावल्यावर तेथें मला ' कां ? ' हा प्रश्नच विचारतां येणार नाहीं. तशा स्थितींत हा प्रश्न विचारणें मला शक्यच नाहीं. अर्थात् हा प्रश्न मी करतों तो दृश्य जगांत राहून आणि विविधतेचा अनुभव घेऊनच करीत असतों हें उघड आहे.

**स्वामीजी**—ठीक आहे. जगांतील विविधतेचा विचार करून व तिचें अस्तित्व आरंभीं गृहित धरून नंतर विवेकद्वारा एकरूपाकडे येणें याला व्यतिरेकाचा मार्ग असें नांव शास्त्रकारांनीं दिलें आहे. उलट्या रीतीनें सिद्धांत सिद्ध करण्याचा हा मार्ग आहे. जें प्रत्यक्ष अस्तित्वांत नाहीं, तें अस्तित्वांत आहे, असें गृहित धरून बुद्धिगम्य मार्गांनीं विवेकदृष्ट्या

त्याचें नास्तित्व अखेरीस सिद्ध करणें, असा हा उलटा मार्ग आहे. अशाच रीतीनें विश्वाचें अस्तित्व गृहित धरून तुह्मी सत्य वस्तूकडे जात आहां, असेंच ह्मणावयाचें ना ?

**शिष्य**—महाराज, जें कांहीं दृश्य आहे त्याचें अस्तित्व प्रत्यक्ष भासत असल्यामुळें माझ्या चित्ताला तें खरें वाटतें. त्याचें खरेपण सिद्ध करण्यासाठीं कांहीं पुरावा मला लागत नाहीं; आणि उलटपक्षीं आपण ज्याला सत्य मानतों तें मला खोटें वाटतें.

**स्वामीजी**—**'सर्वं खल्विदं ब्रह्म,' 'एकमेवाद्वितीयम्'** अशीं श्रुतिवचनें आहेत. जर ब्रह्माचें एकच अस्तित्व खरें असेल तर श्रुतिवचनाप्रमाणें ही विविधता खोटी असली पाहिजे. आपण श्रुति प्रमाण मानतां असें मला वाटतें.

**शिष्य**—होय महाराज; श्रुतींचें प्रामाण्य माझ्यापुरतें मला खरें वाटतें; पण वादविवादाच्या प्रसंगीं श्रुतींचें प्रामाण्य कोणाला मान्य झालें नाहीं तर दुसऱ्या प्रमाणानें त्याचें ह्मणणें खोडून काढलें पाहिजे.

**स्वामीजी**—ठीक आहे. तसें करणेंसुद्धां कांहीं अशक्य नाहीं; पण इकडे पहा ज्याला आपण विविधता असें ह्मणतों ती अदृश्य होत असल्याचा अनुभवही आपणास येतो. मला स्वतःला हा अनुभव आला आहे.

**शिष्य**—आपणाला हा अनुभव केव्हां आला ?

**स्वामीजी**—एके दिवशीं दक्षिणेश्वराच्या देवालयाजवळील बागेंत आह्मी बसलों असतां श्रीरामकृष्णांनीं माझ्या हृदयास स्पर्श केला. त्याबरोबर घरेंदारें, खोल्याखिडक्या, सज्जे, झाडें, चंद्र, सूर्य इत्यादि सारे पदार्थ जणूं काय झपाझप विरळ होत जात आहेत, त्यांचें जणूं काय चूर्ण होत आहे असें मला वाटलें. शेवटीं त्या सर्वांचा लय आकाशतत्वांत झाला. हळूहळू आकाशही नाहींसें झालें आणि त्यानंतर माझी स्वतःच्या अस्तित्वाची शुद्धिही मावळली. यापुढें काय झालें तें मला आठवत नाहीं. आरंभीं मला मोठी भीति वाटली. त्या स्थितींतून परत आल्यावर घरें, दारें, झाडें वगैरे सर्व वस्तु मला पूर्वीसारख्या दिसूं लागल्या. दुसऱ्या एका प्रसंगीं अमेरिकेंतील एका सरोवराच्या तटाकीं मला असाच अनुभव पुन्हां आला.

स्वामींची ही गोष्ट शिष्य आश्चर्यानें स्तब्ध होऊन ऐकत होता. कांहीं वेळानें तो ह्मणाला, 'महाराज, मेंदूंत कांहीं बिघाड झाल्यामुळें अशी स्थिति होणें शक्य नाहीं काय ? आणि हा अनुभव आला तरी त्यांत आनंद तो कोठें आहे, हें मला समजत नाहीं.'

**स्वामीजी**—काय, मेंदूचा बिघाड ? कोणत्याही विकृतीमुळें वातविकार झाला नसतां अथवा एखाद्या मादक पदार्थांचें सेवन केलें नसतां अथवा कांहीं विशिष्ट पद्धतीचा प्राणायाम केला नसतां हा अनुभव आला तर त्याला मेंदूचा बिघाड हें नांव कसें देतां येईल ? सुदृढ प्रकृतीच्या आणि शाबूत डोक्याच्या मनुष्याला असा अनुभव आला तर त्याला मेंदूचा बिघाड ह्मणवेल काय ? याशिवाय त्याला श्रुतिवचनाचाही पूर्ण आधार आहे. तसेंच प्राचीन काळचे ऋषि आणि आचार्य यांच्या अनुभवांशींही तो तंतोतंत जुळतो. स्वामीजी हांसून ह्मणाले, 'तर इतका वेळ माझी गणना तुह्मी वेड्यांतच करतां आहां कीं काय ?'

**शिष्य**—छे छे महाराज ! माझ्या ह्मणण्याचा तसा भावार्थ मुळींच नव्हता. या एकरूपाचा अनुभव येतो अशीं शेंकडों शास्त्रवचनें असतां आणि तसा अनुभव करतलमलवत् प्रत्यक्ष घेतां येतो असें आपण स्वानुभवानें सांगत असतां तो खोटा आहे असें ह्मणण्याची छाती मला होईल तरी कशी ? श्रीशंकराचार्यांनींही आपला असाच अनुभव नमूद करून ठेविला आहे.

**स्वामीजी**—ब्रह्मानुभव असें नांव शास्त्रांनीं ज्याला दिलें आहे तो हाच अनुभव होय. हा अनुभव आला असतां भीतीचें समूळ उच्चाटण होतें व जन्ममरणाचे पाश कायमचे तुटतात. एक वेळ ब्रह्मानुभव प्राप्त झाला असतां या जगांतील सुखदुःखांनीं असा मनुष्य व्याप्त होत नाहीं. कनककामिनी-सुखाच्या आशापाशांत बद्ध झालेल्या मनुष्याला ब्रह्मानुभवाचा अनुभव प्राप्त होत नाहीं.

**शिष्य**—जर आह्मी स्वतः ब्रह्मरूप आहों तर तें स्वरूप प्राप्त करून घेण्यास आह्मी खटपट कां करीत नाहीं ? कनककामिनीच्या तुच्छ सुखाच्या आशेच्या जाळ्यांत पुनःपुन्हां फसून मृत्यूच्या जबड्यांत आह्मी पुनःपुन्हां प्रवेश कां करतों ?

**स्वामीजी**--ब्रह्मानंदाच्या इच्छेनें कोणीच खटपट करीत नाहीं अशा समजानें तुह्मी हें बोलतां; पण याचा थोडा खोल विचार तुह्मी केला तर प्रत्येक मनुष्य जी जी गोष्ट करतो ती ती ब्रह्मानंदाच्या आशेनेंच करीत असतो हें तुमच्या लक्ष्यांत येईल. यांत खुबी इतकीच कीं, आपण कोणतेंही कर्म कोणत्या आशेनें करीत असतों हें पुष्कळांच्या लक्ष्यांत येत नाहीं. आब्रह्मस्तंबपर्यंत ब्रह्मानंदाची व्याप्ति सर्वत्र आहे. तुह्मी स्वतः ब्रह्माशीं एकरूप आहां. आपण वास्तविक तसेच आहों अशी तुमची पक्की खात्री याच क्षणीं पटली तर ब्रह्मानंदाचा अनुभव याच क्षणीं तुह्मांस प्राप्त होईल. येथें खऱ्या दृष्टीचीच कायती उणीव आहे. तुह्मी नोकरी करतां आणि मरेमरेपर्यंत काम करतां. अशा वेळीं हें आपण आपल्या कुटुंबासाठीं करतों असें तुह्मांस वाटतें; पण या तुमच्या साऱ्या खटपटीचा अंतिम हेतु ब्रह्मानंद मिळविण्याचाच असतो. मायेच्या जाळ्यांत पुन:पुन्हां गटंगळ्या खाऊन व दु:खाचे अनेक प्रचंड तडाखे सोसून मनुष्याची दृष्टि पुन्हां आपल्या मूळच्या स्वरूपाकडे वळते. हेंच त्याचें मूळचें खरें स्वरूप होय. अशी वेळ प्रत्येकाला केव्हांना केव्हां अवश्य येईल. यांत कोणीही अपवाद उरणार नाहीं. कोणाला ही वेळ या चालू आयुष्यांत येईल, दुसऱ्या एखाद्याला ती पुढील जन्मीं येईल अथवा आणखी कोणाला ती वेळ येण्याला हजार जन्म घ्यावे लागतील इतकेंच.

**शिष्य**--महाराज, पण ही वेळ येणें परमेश्वराच्या कृपेवर आणि गुरूच्या आशिर्वादावर अवलंबून नाहीं काय ?

**स्वामीजी**—परमेश्वराच्या कृपेचा शीतल वायू सदोदित वाहत आहेच. तो केव्हां थांबला अशी वेळच कधीं येत नाहीं. आपलीं शिडें उभारण्याचें काम मात्र तुमचें आहे. कोणतीही गोष्ट करीत असतां ती एकचित्तानें तुह्मीं करा. "मी ब्रह्मरूप आहें, मी आनंदरूप आहें, चिंता आणि भय मला कशाला? हें शरीर, हें मन आणि ही बुद्धि हीं सर्व क्षणिक--तुटणारीं मात्र आहेत आणि पलीकडे जें कांहीं आहे तेंच मी आहें" असें चिंतन नित्य करीत जा.

**शिष्य**--अशा प्रकारचे विचार मधूनमधून थोडा वेळ उद्भवतात; पण लगेच ते नष्टही होतात; आणि नंतर विलक्षण वेडेवांकडे विचार मनांत येऊं लागतात, याला काय करावें ?

**स्वामीजी**--अभ्यासाच्या आरंभींच्या काळीं मात्र अशी मनःस्थिति होते; पण पुढें हळूहळू मन ताब्यांत येऊं लागतें; तथापि आरंभापासून आपलें साध्य सिद्ध करण्याची इच्छा मनांत अनावर असली पाहिजे. 'मी सदा शुद्ध आहें; मी सदा ज्ञानी आहें; मी चिरमुक्त आहें; माझ्या हातून पातक घडणें शक्य नाहीं; कनककामिनीची झडप सामान्य मानवी प्राण्यां-प्रमाणें मजवर पडूं शकणार नाहीं' अशा प्रकारचें चिंतन नित्य करीत जा ह्मणजे तुह्मांस मनोबल प्राप्त होईल. कल्याणाचा हाच खरा मार्ग आहे.

**शिष्य**--केव्हां केव्हां मन प्रबल आहे असें वाटतें; पण थोडा वेळ गेला नाहीं तोंच अमुक परीक्षा द्याव्या, द्रव्य मिळवावें, कीर्ति मिळवावी, चैन करावी असल्या प्रकारचे विचार मनांत येऊं लागतात.

**स्वामीजी**—अशा प्रकारचे विचार मनांत आले ह्मणजे सत्यासत्य विवेक आपल्या मनाशीं करीत जावा; तुह्मी वेदांत ग्रंथ वाचले आहेत ना? तुह्मीं झोंपीं जाल तेव्हां आत्मानात्मविवेकाची ही तरवार आपल्या उशा-खालीं ठेवीत जा; ह्मणजे कनककामिनीचा लोभ तुमच्या स्वप्नांतही येणार नाहीं. अशा प्रकारच्या बलदायक अभ्यासानें तुमच्या आंगीं हळूहळू त्याग उद्भवेल आणि त्याग उद्भवला ह्मणजे स्वर्गद्वार उघडेल.

**शिष्य**—स्वामी महाराज, असें आहे तर चित्तांत फार त्याग असूं नये असें भक्तिमार्गी ग्रंथ कां सांगतात? त्यांच्या मतें त्यागाच्या अतिरे-कानें चित्त शुष्क होतें. भक्तिमार्गांत जो द्रव अवश्य असतो तो त्यागानें नष्ट होतो असें भक्तिमार्गाचें मत आहे.

**स्वामीजी**--अशा प्रकारचें मत ज्या ग्रंथांत प्रतिपादन केलें असेल ते ग्रंथ अगोदर लांब फेंकून द्या. त्यागावांचून, इंद्रियजन्य सुखाची लालसा सोडल्यावांचून आणि कनककामिनीची इच्छा हें पाप आहे असें समजून त्यापासून पराङ्मुख झाल्यावांचून '**न सिध्यति ब्रह्म शतान्तरेऽपि**।' शंभर प्रलयांनीं सुद्धां मुक्ति सिद्ध होणार नाहीं. जप, ध्यान, पूजा, यज्ञयाग, तप या सर्वांचा उपयोग त्याग उत्पन्न करण्यापुरताच आहे. बोटीचा नांगर तळांत बुडालेला असतां नुसतीं वल्हीं मारून जसा फायदा नाहीं, त्याच-प्रमाणें ज्याच्या हृदयांत त्याग बाणलेला नाहीं त्यानें दुसरे कितीही यत्न केले

तरी त्यांचा कांहीं उपयोग नाहीं. '**त्यागेनैकेन अमृतत्वमानशुः।**' हा शास्त्रसिद्धांत कालस्थलाबाधित आहे.

**शिष्य**--कनककामिनीची इच्छा मनांतून काढून टाकली तर तेवढयानें सर्व कार्यभाग होईल काय ?

**स्वामीजी**--ही इच्छा गेली तरी या मार्गांत दुसरे कांहीं अडथळे असतातच. उदाहरणार्थ एखाद्याला कीर्तीचाच मोठी आवड असते. कीर्तीसाठीं आपल्या समतेचा भंग न होऊं देणारा असा धीर पुरुष फार विरळा. लोकांत कीर्ति होऊं लागली ह्मणजे इतर चैनी तेथें हळूहळू प्रवेश करतात आणि साधकाच्या चित्ताची समता नष्ट होत जाते. तीनचतुर्थांश संन्याशांचा मार्ग यामुळेंच पुष्कळ वेळां बंद झालेला आहे. फार काय सांगावें ? मला एक मठ स्थापन करण्याची इच्छा आहे. कदाचित् तेवढया इच्छेमुळेंच मला पुन्हां जन्म घेणें भाग पडेल !

**शिष्य**--महाराज, असें असेल तर आमच्यासारख्यांचा कारभारच आटपला.

**स्वामीजी**--छे छे! असें बोलूं नको. '**अभीरभीरभीः।**' नागमहाशयांची आणि तुमची कधीं भेट झाली नाहीं वाटतें ? पूर्ण गृहस्थाश्रमी असून ते कसे पूर्ण संन्यासी आहेत पहा. अशीं माणसें फारशीं आढळत नाहींत. मला तर त्यांच्यासारखा दुसरा कोणीच आढळला नाहीं. कोणाला गृहस्थाश्रमी व्हावयाचें असेल तर त्यानें नागमहाशयांसारखें व्हावें. नागमहाशय हे पूर्वबंगाल्यांतील प्रकाशमय ताऱ्यासारखे आहेत. अशा लोकांची भेट वारंवार घेत जावी. त्यानें आपलें पुष्कळ कल्याण होतें.

**शिष्य**--श्रीरामकृष्णांनीं या भूतलावर जें अवतारकार्य दाखविलें, त्यांत सौजन्य आणि नम्रता हीं नागमहाशयांच्या रूपानें अवतरलीं, असेंच मला वाटतें.

**स्वामीजी**--यांत काय संशय ? तुह्मी अगदीं बरोबर बोललांत. मीही एकदा त्यांच्या दर्शनाला जाणार आहें. तुह्मी मजबरोबर याल काय ? त्यांना एक पत्र लिहाल काय ? पावसाळ्यांत जलमय झालेली सृष्टि पाहण्याची मला मोठी मजा वाटते.

**शिष्य**--होय महाराज, मी खास पत्र लिहीन. आपल्या गोष्टी महाशयांच्या कानांवर गेल्या ह्मणजे ते आनंदानें अगदीं वेडे होतात. 'विवेकानंद इकडे आले तर पूर्वबंगाल ह्मणजे एक क्षेत्रभूमि बनून जाईल' असेंही ते ह्मणत असतात.

**स्वामीजी**--'नागमहाशय हे ज्वलज्ज्वालारूप आहेत' असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत हें तुह्माला कदाचित् ठाऊक असेलच.

**शिष्य**--होय, असें मी ऐकलें आहे खरें.

एवढें संभाषण झाल्यानंतर स्वामीजींच्या आज्ञेवरून प्रसादग्रहण करून शिष्य बऱ्याच रात्रीं आपल्या घरीं गेले. '**शिवोऽहं शिवोऽहं**' व '**अभीरभीरभीः**' हा स्वामींचा उपदेश त्यांच्या चित्तांत एकसारखा घोळत होता.

---

## १४

## कामकांचनाचा त्याग—आत्मसिद्धीसाठीं जे खटपट करतात त्यांजवर परमेश्वराचा प्रसाद होतो.

( श्री. शरच्चंद्र चक्रवर्ती यांचे रोजनिशीवरून. )

**शिष्य**--'कामकांचनाचा त्याग प्रथम केल्याशिवाय आत्मलाभाच्या मार्गांत पुढें पाऊल पडणें शक्य नाहीं' असें श्रीरामकृष्ण ह्मणत. हें ह्मणणें खरें असेल तर सामान्य गृहस्थाश्रमी मनुष्याची काय वाट होईल? कारण, अशा माणसांचीं मनें या दोन्ही लोभांत पूर्ण गुंतलेलीं असतात.

**स्वामीजी**--कोणी संन्यासी असो अगर गृहस्थाश्रमी असो कनककामिनीचा लोभ नष्ट झाल्याशिवाय त्याचें चित्त परमेश्वराकडे वळणार नाहीं हें खरें आहे. जोंपर्यंत या जाळ्यांत मन गुंतलेलें राहील तोंपर्यंत भक्ति, दृढता आणि श्रद्धा हीं कधींही प्राप्त व्हावयाचीं नाहींत.

**शिष्य**--मग गृहस्थाश्रमी माणसांची वाट काय? त्यानें कोणता मार्ग स्वीकारावा?

**स्वामीजी**--त्यांनीं आपल्या बारीकसारीक इच्छा तृप्त कराव्या व पुन्हां त्यांची गरज ठेवूं नये आणि आत्मानात्म विवेकानें मोठया लोभास त्यांनीं आळा घालावा, हाच मार्ग त्यांस युक्त आहे. संन्यासावांचून आत्म-

लाभ कधींही होणार नाहीं. '**यदि ब्रह्मा स्वयं वदेत्।**' अशा स्थितींत ब्रह्मदेवाचा उपदेशही उपयोगी पडणार नाहीं.

**शिष्य**—संन्यासग्रहण केलें म्हणजे ताबडतोब खऱ्या त्यागाची प्राप्ति होते काय?

**स्वामीजी**—किमान पक्ष त्यागाची पूर्वतयारी तरी संन्यासी करीत असतात; आणि गृहस्थाश्रमी म्हटला तर तो पाण्यांत नांगर असलेली बोट वल्हविण्याचा यत्न करीत असतो. भोगेच्छा कधीं तरी शांत होणें शक्य आहे काय? छे, छे, '**भूय एवाभिवर्द्धते।**' दिवसेंदिवस ती अधिकच प्रबळ होत जाते.

**शिष्य**—महाराज असें कां म्हणतां? भोग भोगून भोगून पुष्कळ काळानें तरी त्यांचा कंटाळा येईल कीं नाहीं?

**स्वामीजी**—कितीशा लोकांना असा कंटाळा आला आहे? इंद्रियजन्य भोगांच्या सतत सान्निध्यानें मनावर दाब पडतात आणि या भोगांचा कायम ठसा तेथें उमटून राहतो. संन्यास—आत्मलाभाचा मूलमंत्र—खरें रहस्य संन्यास हेंच होय.

**शिष्य**—पण शास्त्राज्ञा कशी आहे पहा—'**गृहेषु पञ्चेन्द्रिय निग्रहस्तपः।**' स्त्रीपुत्रादि परिवारांत राहून पंचेंद्रियांचा निग्रह करणें याचें नांव तप. '**निवृत्त रागस्य गृहम् तपोवनम्।**' ज्याचा सर्व लोभ नाहींसा झाला आहे त्याला गृह आणि तपोवन हीं सारखींच.

**स्वामीजी**—स्त्रीपुत्रादि परिवारांत राहात असतां कामकांचनाचा लोभ ज्याच्या चित्तांतून गेला असेल, तोच पुरुष खरोखर धन्य होय. पण अशीं माणसें कितीशीं आढळतात?

**शिष्य**—पण संन्याशाचें तरी काय? कनककामिनीचा लोभ त्यांच्या चित्तांतून तरी पूर्णपणें गेलेला असतो काय?

**स्वामीजी**—संन्यासी हे त्यागाच्या मार्गावर आरूढ तरी झालेले असतात असें मी नुकतेंच म्हटलें. लोभादि शत्रूंशीं दोन हात करण्यासाठीं समरभूमीवर ते उभे तरी राहिलेले असतात; पण गृहस्थाश्रमी मनुष्याविषयीं पाहतां कनक आणि कामिनी यांचा लोभ अखेरच्या सिद्धीस फार घातक आहे, ही गोष्ट त्यांच्या लक्षांतसुद्धां आलेली नसते. आत्मानुभव

घेण्याचा नुसता यत्नही ते करीत नाहींत. किंबहुना आत्मानुभवासाठीं हा लोभ सोडण्याची धडपड केली पाहिजे ही गोष्ट त्यांच्या ध्यानींमनींसुद्धां आलेली नसते.

**शिष्य**—महाराज, असें कां ह्मणतां? पुष्कळ लोक अशी धडपड करीत असतात.

**स्वामीजी**—ठीक आहे; जे लोक अशी धडपड करीत असतील त्यांना हळूहळू सिद्धीही प्राप्त होईल. हळूहळू कामकांचनाचा त्यांचा लोभ जाईल. पण जे लोक ही गोष्ट दिरंगाईवर टाकीत असतील, 'आतांच काय घाई आहे? वृद्धापकाळीं याचा विचार करूं' असें जे ह्मणत असतील, ते मात्र आत्मानुभवापासून फार दूर पल्ल्यावर आहेत असें समजावें. 'याच देहांत, याच जन्मांत, याच क्षणीं मी आत्मानुभव घेईन' असें शूर पुरुष ह्मणतात. वाटेल त्या क्षणीं त्याग करण्याची त्यांची तयारी असते. अशा लोकांना '**यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्।**' अशी आज्ञा शास्त्रांनीं दिली आहे. ज्या क्षणीं विराग प्राप्त होईल त्याच क्षणीं संन्यासाश्रम घ्यावा अशी शास्त्रांची मोकळीक आहे.

**शिष्य**—परमेश्वराची भक्ति केली तर त्याच्या प्रसादानें हे सर्व मायापाश तुटतात असें श्रीरामकृष्ण ह्मणत असत, नाहीं का?

**स्वामीजी**—हो; ते असें ह्मणत हें खरें. परमेश्वराच्या कृपेनें मायापाश तुटतात हें खरें आहे; पण तशी कृपा होण्यास कायिक, वाचिक आणि मानसिक शुद्धि असावयास नको काय? असें झालें तरच त्याच्या कृपेची प्राप्ति होईल.

**शिष्य**—पण, कायिक, वाचिक आणि मानसिक तप करून सिद्धि मिळविण्यासाठीं जो कंबर बांधतो, त्याला अशा कृपेची आवश्यकता तरी काय? कारण, तो स्वतःच्याच प्रयत्नानें आत्मलाभ करून घेईल.

**स्वामीजी**—आत्मानुभवासाठीं खरोखर जो मनापासून धडपडत असतो त्याला परमेश्वराची कृपा आपोआपच प्राप्त होते; पण कोणतीही धडपड न करतां तुह्मी नुसते स्वस्थ बसून राहिलां तर त्या कृपेची प्राप्ति कधींही व्हावयाची नाहीं.

**शिष्य**--प्रत्येकाला आपण चांगलें व्हावेंसें वाटतें; पण काय असेल तें असो, मनाची प्रवृत्ति वाईटपणाकडे आपोआपच वळते. महाराज, आपण चांगलें व्हावें असें प्रत्येकाला वाटत नाहीं काय? प्रत्येकाला पूर्णत्व पावण्याची—ईश्वराची भेट घेण्याची—इच्छा नाहीं काय ?

**स्वामीजी**--ज्याला खरोखरच अशी इच्छा होत असेल तो तिच्या पूर्ततेसाठीं धडपडूं लागला आहे असें समजावें. ही त्याची धडपड अशीच टिकून राहील तर परमेश्वर त्याजवर कृपा करील.

**शिष्य**—अवतारांच्या कथा आपण वाचूं लागलों तर पुष्कळ वाईट प्रवृत्तीचीं माणसें विशेष श्रम केल्याशिवाय, विशेष भक्तीशिवाय अथवा विशेष साधनाशिवाय परमेश्वराच्या कृपेस पात्र झालीं असें आपणास आढळून येतें; याचें कारण काय ?

**स्वामीजी**—होय; अशा कथा आपणास आढळून येतात खऱ्या; पण त्यांच्या ठिकाणीं तीव्र आतुरता अगोदरच उत्पन्न झाली असली पाहिजे. इंद्रियजन्य सुखांचा उपभोग घेतां घेतां अखेरीस त्या सुखांचा त्यांना पूर्ण वीट आला असला पाहिजे. शांतीच्या अभावानें त्यांचीं अंतःकरणें जळत असलीं पाहिजेत. परमेश्वराच्या कृपेच्या प्राप्तीबरोबर ज्या शांतीची प्राप्ति होते ती शांति आपणास मिळत नाहीं असें पाहून त्यांचीं अंतःकरणें शून्य बनलीं असलीं पाहिजेत. आतां परमेश्वरी कृपेच्या शांतीशिवाय आपलें जीवित क्षणभरही टिकणार नाहीं असें त्यांस वाटत असलें पाहिजे. अशा स्थितींत परमेश्वराच्या कृपेचा प्रसाद त्यांना मिळाला. आरंभीं हीं माणसें तमोगुण प्रधान होतीं; पण तेथून त्यांनीं एकदम सत्वांत उड्डाण केलें.

**शिष्य**—तर मग कोणत्याही मार्गानें कां होईना, परमेश्वराची प्राप्ति त्यांस झाली हें खरें मानतां येईल काय ?

**स्वामीजी**—हो; असें कां मानतां येऊं नये? तथापि मागील दारानें चोरूनमारून राजवाड्यांत प्रवेश करण्याऐवजीं दिल्लीदरवाजाच्या राजरस्त्यांतून जाणें अधिक बरें नाहीं काय ?

**शिष्य**—होय महाराज; आपलें ह्मणणें बरोबर आहे. तथापि केवळ कृपेच्या प्रसादानें परमेश्वराची प्राप्ति होते हा मुद्दा सिद्ध होतो.

**स्वामीजी**—हो; हें खरें ! पण अशा रीतीनें परमेश्वराची प्राप्ति करून घेणारे फारच विरळा.

**शिष्य**—इंद्रियदमन करून व कनककामिनीचा लोभ सोडून जे परमेश्वराची प्राप्ति करून घेऊं इच्छितात ते लोक बहुधा स्वतंत्र बाण्याचे असतात असें मला वाटतें. स्वतःच्याच प्रयत्नानें सिद्धि मिळविण्याची त्यांची इच्छा असते. उलटपक्षीं जे परमेश्वराचें नांव घेऊन सर्वप्रकारें त्याजवर अवलंबून असतात, त्यांना परमेश्वर आपण होऊन मायेच्या जाळ्यांतून सोडवितो, व त्यांना आत्मानुभवाच्या मार्गावर आरूढ करतो.

**स्वामीजी**—होय; तुमचें ह्मणणें बरोबर आहे. एकाच साध्याकडे जाण्याचे हे दोन वेगवेगळे रस्ते आहेत. पहिला रस्ता ज्ञान्याचा असून दुसरा भक्ताचा आहे; तथापि त्याग हें दोघांचेंही अखेरचें साध्य आहे.

**शिष्य**—होय; हें निःसंशय खरें आहे. पण परमेश्वराची कृपा कालस्थलाबाधित आहे. ती प्राप्त होण्यास कांहीं विशेष निर्बंध नाहींत असें घोस बाबू मला एकदां ह्मणाले होते. परमेश्वराच्या कृपेच्या बाबींतही जर नियम, निर्बंध आणि कायदे असतील तर तिला कृपा तरी कसें ह्मणावें ? कृपेचें राज्य कायद्याच्या पलीकडे असलें पाहिजे.

**स्वामीजी**—मुक्तावस्थेच्या अखेरच्या पायरीवर पोहोंचलेल्या पुरुषाच्या तोंडीं मात्र असे शब्द शोभतात. ही अखेरची पायरी मात्र कालस्थलातीत आहे; पण त्या स्थलीं पोंचल्यावर कृपा कोणी करावी आणि कोणावर करावी ? ज्या ठिकाणीं कारण आणि कार्य या दोहोंचाही अभाव होतो, तेथें कृपा करणारा आणि घेणारा हा भेदही उरत नाहीं. त्या ठिकाणीं पूज्य आणि पूजक, ध्येय आणि ध्याता, ज्ञेय आणि ज्ञाता हीं द्वंद्वें नष्ट झालेलीं असतात. त्या ठिकाणीं सर्व एकरूपच असतें. त्या रूपाला कृपामय ह्मणा अथवा तुह्मांला वाटल्यास ब्रह्म असें नांव द्या. तेथें जें कांहीं असतें तें एकरूप असतें.

**शिष्य**—स्वामीमहाराज, आपले हे शब्द ऐकून सर्व वेदवेदांताचें सार आज माझ्या कर्णसंपुटांत प्रविष्ट झालें असें मला वाटतें. आजपर्यंत अर्थशून्य अशा पोकळ शब्दजालांत मी गुंतून राहिलों होतों, असें मला आतां समजून आलें.

---

१५

## अहिंसा आणि मांसभक्षण—मनुष्यांतील सत्त्व, रज आणि तम—आहारशुद्धि आणि धर्म—अन्नांतील तीन दोष—जातिभेद—ऋषींचे कायदे आणि प्राचीन चातुवर्णाची पुन्हां स्थापना.

[ श्री. शरचंद्र चक्रवर्ती यांच्या रोजनिशीवरून. ]

**शिष्य**—स्वामीमहाराज, अन्नभेदानुरूप मनुष्यांतील धार्मिक वृत्तींत कांहीं फेर पडतो काय? अन्न आणि धार्मिक वृत्ति यांत कांहीं परस्पर संबंध आहे काय?

**स्वामीजी**—होय; थोडाबहुत संबंध आहे.

**शिष्य**—मासे आणि मांसभक्षण करणें हें युक्त अथवा आवश्यक आहे काय?

**स्वामीजी**—हें अन्न खुशाल खा. यांत कांहीं दोष असेल तर तो मी माझ्या माथीं घेईन. आपल्या देशांतील खालच्या वर्गांतील लोकांची काय स्थिति आहे ती पहा. त्यांच्या चेहऱ्यावर सदोदित सुतकीपणा दिसत असतो. त्यांच्या अंतःकरणांत धैर्य आणि उत्साह यांचा पूर्ण अभाव आहे. हातापायांच्या काड्या आणि विस्तीर्ण पोट. आमचे लोक नुसत्या वाऱ्यालाही भितात.

**शिष्य**—मासे आणि मांसभक्षण केलें ह्मणजे अधिक शक्ति येते काय? **'अहिंसा परमो धर्मः'** हें ब्रीदवाक्य बौद्धांनीं आणि वैष्णवांनीं उराशीं कां बाळगलें आहे?

**स्वामीजी**—बौद्ध आणि वैष्णव या दोन मतांत फारसा भेद नाहीं. बौद्धधर्माला हिंदुस्थानांत उतरती कळा लागली, तेव्हां हिंदुधर्मानें त्यांतील कांहीं आचार आपलेसे केले व त्याच पंथाला नंतर वैष्णव असें नांव प्राप्त झालें. **'अहिंसा परमो धर्मः'** हें बौद्धांचें तत्त्व फार चांगलें आहे; पण सर्व लोकांची कर्तृत्वशक्ति लक्ष्यांत घेतल्यावांचून या तत्त्वाची अंमलबजावणी कायद्यानें सर्वांवर एकसारखी झाल्यामुळें हिंदुस्थानाचा नाश झाला. एकी-

कडे मुंग्यांना साखर घालणारे आणि दुसरीकडे पैशाच्या लोभानें प्रत्यक्ष भावाचा गळा कापणारे बकध्यानी आणि बोकेसंन्यासी माझ्या पाहण्यांत पुष्कळ आले आहेत.

**शिष्य**—पण श्रुतींत आणि मनुस्मृतींतही मांसाचा निषेध केला आहे.

**स्वामीजी**—होय; आणि त्यांत हिंसेचाही निषेध केला आहे. '**मा हिंस्यात् सर्व भूतानि**' असें श्रुतिवचन आहे. तसेंच '**निवृत्तिस्तु महाफला**' असें मनूचें वचन आहे. हिंसा अथवा अहिंसा हीं प्रत्येक व्यक्तीच्या मनोधर्मानुरूप त्याज्य अथवा युक्त समजलीं पाहिजेत. योग्यता आणि कर्तृत्वशक्ति यांच्या अनुरोधानें हिंसा अथवा अहिंसा यांचा उपयोग ठरविला पाहिजे.

**शिष्य**—धर्माचा अभ्यास करूं लागतांच मांसाशनाचा त्याग करावयाचा अशी एक नवीच रीत हल्लीं प्रचारांत आली आहे. कित्येकांना तर परस्त्रीच्या स्पर्शापेक्षांही हें पाप मोठें वाटतें. महाराज, या नव्या कल्पना कोठून आल्या ?

**स्वामीजी**—त्या कोठून आल्या हें समजून काय करावयाचें आहे ? असल्या कल्पना आपल्या समाजाचा आणि देशाचा नाश करीत आहेत, एवढें समजलें म्हणजे पुरे. पूर्व बंगाल्यांतील लोक मासे आणि मांस खातात आणि इतरांपेक्षां ते अधिक धष्टपुष्ट असतात हें लक्ष्यांत आणा. लूची आणि असलेच तळकट पदार्थ ते लोक खात नसल्यामुळें त्यांना अग्निमांद्य कसें तें ठाऊकसुद्धां नाहीं. अग्निमांद्याचा विकार म्हणजे काय याची नुसती कल्पनासुद्धां पूर्व बंगाल्यांतील खेडवळ लोकांस नाहीं.

**शिष्य**—स्वामीजी, हें अगदीं खरें आहे. आमच्या भागांतील लोक अपचनाच्या विकाराबद्दल कधींही तक्रार करीत नाहींत. बंगालच्या या भागांतच या रोगाचें नांव मला प्रथम ऐकूं आलें. आमच्या भागांतील लोक सकाळ संध्याकाळ लागेल तेवढी मासळी खात असतात.

**स्वामीजी**—खुशाल खात जा; या बाबींत लोकांच्या टीकेची पर्वा मुळींच करूं नका. नुसता शाकाहार करतां करतां आमच्याइकडील लोक अपचनाच्या विकारानें आसन्नमरण झाले आहेत. ही कांहीं सत्त्वाची खूण नव्हे. हें तमोगुणाचें लक्षण आहे. ही मृत्यूची छाया आहे. चेहऱ्यावर तेज,

अंतःकरणांत पूर्ण उत्साह, पूर्ण निर्भयता आणि अविरत उद्यमशीलता हीं सत्वाचीं लक्षणें आहेत. निद्रा आणि आळस हीं तमाचीं लक्षणें आहेत.

**शिष्य**--पण, मांसाशनानें मनुष्यांत रजोगुण अधिक प्रबल होत नाहीं काय ?

**स्वामीजी**--हो; तोच गुण तुमच्या ठिकाणीं अधिक उत्पन्न व्हावा हीच माझी इच्छा आहे. आपणाला सध्यां रजोगुणाचीच अधिक आवश्यकता आहे. आपण ज्यांना सात्विक असें समजतों अशा माणसांपैकीं शेंकडा नव्वद माणसें तमोगुणांत सध्यां पूर्ण बुडालेलीं आहेत. यांत शेंकडा पांच-सहा माणसें खरीं सत्वगुणी सांपडलीं तर तुमचें मोठें भाग्य. तमोगुणांत आपला देश सध्यां पूर्ण बुडाला असल्यामुळें प्रचंड रजोगुणाची जागृति तेथें हवी आहे. लोकांना खावयाला मिळेनासें झालें आहे. त्यांच्या पोटाची आणि वस्त्रप्रावरणाची तरतूद केली पाहिजे. त्यांच्यांत जागृति आणली पाहिजे; आणि त्यांस अधिक कर्तृत्वशाली केलें पाहिजे. असें न झालें तर हीं माणसें काष्ठलोष्टवत् बनून जातील. याकरितां मांसाशन करून रजोगुण वाढवा असेंच माझें तुह्मांस सांगणें आहे.

**शिष्य**—सत्त्वगुणाचें पूर्ण प्राबल्य झाल्यानंतर अशा मनुष्याच्या ठिकाणीं मांसाशनाची आवड शिल्लक राहते काय ?

**स्वामीजी**—नाहीं; सत्त्वगुणाचा पूर्ण उदय झाला ह्मणजे मासे आणि मांस यांजबद्दलची आवड नष्ट होते. त्याच्या ठिकाणीं परहितदृष्टीचा उगम होतो. कनककामिनीची इच्छा नाहींशी होऊन त्याच्या ठिकाणीं कोणत्याही प्रकारचा अहंकार उरत नाहीं. असें झालें ह्मणजे मांसाशनाची त्याची इच्छाही नष्ट होते. अशा प्रकारचे कोणतेही गुण आंगीं नसतां एखादा मनुष्य **'अहिंसा परमो धर्मः'** असें ह्मणूं लागला तर तो पक्का भोंदू आहे अथवा नुसता सोंगाड्या धार्मिक आहे असें पक्कें समजा. तुमच्या ठिकाणीं खऱ्या सत्त्व गुणांचा उदय झाला ह्मणजे मांसाशनाचा खुशाल त्याग करा.

**शिष्य**—पण छांदोग्य उपनिषदांत **' आहारशुद्धौ सत्वशुद्धिः '** असें वचन आहे.

**स्वामीजी**—होय; हें मला ठाऊक आहे. आहार या शब्दाचा अर्थ इंद्रियविषयक वस्तु असा शंकराचार्यांनीं केला असून, त्याच शब्दाचा अर्थ

श्रीरामानुजांनीं अन्न असा केला आहे. आपण दोघांचेही अर्थ घ्यावे असें माझें मत आहे. अन्नाच्या शुद्धीबद्दल अथवा अशुद्धीबद्दल वादविवाद करूनच आपण सारा जन्म घालविणार कीं इंद्रियनिग्रहही करणार ? इंद्रियनिग्रह हाच मुख्य हेतु आहे हें विसरतां कामा नये; आणि अन्नांतील शुद्धाशुद्धतेच्या प्रमाणानें या हेतूस तें पोषक होतें अथवा विघातक होतें. आपल्या शास्त्राप्रमाणें अन्न तीन प्रकारच्या दोषांनीं युक्त असूं शकेल. लसूण, कांदा वगैरे पदार्थांच्या ठिकाणीं उपजत असलेला जो दोष तो जातिदोष होय. केरकचरा, किडे, केंस वगैरे पदार्थ पडून अन्नांत उत्पन्न होणारा दोष निमित्तदोष होय; आणि दुष्ट मनुष्याच्या स्पर्शानें अन्न दुष्ट होणें हा आश्रयदोष होय. पहिल्या व दुसऱ्या प्रकारचे दोष अन्नाच्या ठिकाणीं नसण्याबद्दल फार काळजी घेतली पाहिजे; पण आमचे लोक हे पहिले दोन दोष वगळून तिसऱ्याबद्दलच एकमेकांशीं लढाया करीत सुटतात. वास्तविक पाहतां एखाद्या पदार्थाच्या ठिकाणीं आश्रयदोष आहे कीं नाहीं हें फक्त योगीच जाणूं शकेल. ' विटाळ होईल, ' ' शिवूं नका ' असल्या आरोळ्यांनीं सारा देश भरून जाऊन आतां अगदीं मृत्युपंथास लागला आहे. गळ्याभोंवतीं जानवें गुंडाळून एखाद्यानें आपणास ब्राह्मण ह्मणविलें कीं त्याच्या सुष्टदुष्टपणाचा विचार कोणाच्या मनास शिवतसुद्धां नाहीं. भगवान् श्रीरामकृष्ण अशा प्रकारें वाटेल त्याच्या हातचें अन्न कधींही गृहण करीत नसत. एखाद्या मनुष्यानें कांहीं पदार्थ आणला तर तो घेण्याचें ते साफ नाकारीत. चौकशीअंतीं अशा मनुष्याच्या वर्तणुकींत कांहीं तरी जबर व्यंग हटकून आढळून येई. आपला सारा धर्म सध्यां फक्त स्वयंपाकघरांतच घुसून बसला आहे असें दिसतें. एखाद्या आंब्याचा गर टाकून देऊन कोय आणि साल यांजबद्दलच भांडण करावें, तशी तुमची गत झाली आहे. तात्त्विक दृष्टीचा लोप होऊन नुसत्या शुष्क लोकाचाराबद्दलच तुह्मीं तंटे करीत बसतां.

**शिष्य**—तर मग आह्मीं कोणाच्याही हातचें अन्न खावें असें आपलें ह्मणणें आहे काय. ?

**स्वामीजी**—असें कोण ह्मणतो ? हें पहा तुह्मी स्वतः ब्राह्मण आहांत. तुह्मी एका विशिष्ट पोटजातीचे ब्राह्मण आहांत असें समजा. मग तुह्मी

इतर पोटजातींतील ब्राह्मणाच्या हातचें अन्न कां खाऊं नये ? अशाच रीतीनें सर्व पोटजातींनीं एकमेकांशीं अन्नव्यवहार कां करूं नये ? त्याचप्रमाणें महाराष्ट्र ब्राह्मण, तेलंगी ब्राह्मण, कनोजी ब्राह्मण या सर्व ब्राह्मणजातींनीं एकमेकांशीं अन्नव्यवहार करण्यास कोणती हरकत आहे ? बंगाल्यांतील शेंकडों कायस्थ आणि ब्राह्मण सार्वजनिक उपाहारगृहांत चोरून एकमेकां-जवळ बसून खातात; आणि बाहेर येऊन आपणांस समाजाचे पुढारी ह्मण-वितात व सोंवळ्याओवळ्याच्या गप्पा पुन्हा मारूं लागतात. असल्या दांभिकांनीं घालून दिलेल्या नियमांबरहुकूम आमच्या समाजानें अझूनही चालावें काय ? चालूं नये असें मी स्पष्ट ह्मणतों. उलटपक्षीं समाजानें अशा लोकांना बहिष्कृत केलें पाहिजे. प्राचीन ऋषींनीं घालून दिलेले नियम पुन्हां अमलांत आणले पाहिजेत, आणि त्याबरहुकूम समाजाची व्यवस्था पुन्हां अमलांत आणिली पाहिजे. असें झालें तरच आमच्या राष्ट्राचें कल्याण होणार आहे.

**शिष्य**—तर मग ऋषींनीं घालून दिलेल्या नियमांप्रमाणें आमचा समाज सध्यां चालत नाहीं काय ?

**स्वामीजी**—भ्रम ! हा निव्वळ भ्रम आहे ! आपला समाज तसा सध्यां कोठें चालतो ? साऱ्या हिंदुस्थानभर मी प्रवास केला आणि उभ्या देशाचा कोनाकोंपरा मी धुंडाळून पाहिला; पण प्राचीन ऋषींच्या काय-द्याचें अस्तित्व मला कोठेंही आढळून आलें नाहीं. कांहीं लोकांनीं घालून दिलेले आचार सामान्य जनता आंधळ्याप्रमाणें पाळीत आहे. कित्येक रीतिरिवाज तर अगदीं निरर्थक आहेत. लोकाचार, देशाचार, देशकल्पना आणि बायाबापड्यांचीं व्रतेंवैकल्यें हींच आमच्या समाजाचीं सांप्रतचीं बंधनें आहेत. शास्त्रें वाचण्याची काळजीतरी कोण घेतो ? आणि त्यांचा काळजीपूर्वक अभ्यास करून समाजाला तदनुरूप वळण तरी कोण लावतो ?

**शिष्य**—मग आह्मी काय करावें असें आपलें ह्मणणें आहे ?

**स्वामीजी**—ऋषींचे कायदे पुन्हां अमलांत आणा. सांप्रतच्या बदल-लेल्या परिस्थितीला अनुरूप असा थोडासा फेरफार करून मनु आणि याज्ञ-वल्क्य यांच्या स्मृतीचें पुनरुज्जीवन केलें पाहिजे. या स्मृतींचें ज्ञान सर्व लोकांस करून दिलें पाहिजे. प्राचीन चातुर्वर्ण्य समाजरचना हिंदुस्थानांत

सांप्रत कोठेंही आढळून येत नाहीं हें तुह्मांस दिसत नाहीं काय ? ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र अशी वर्णव्यवस्था आपण पुन्हां अमलांत आणली पाहिजे. एकट्या ब्राह्मणांच्याच जातींत सध्यां असंख्य पोटभेद निर्माण झाले आहेत. ते सारे नाहींसे करून एक ब्राह्मणवर्ण निर्माण केला पाहिजे. त्याच प्रमाणें वैदिक काळीं अस्तित्वांत असलेले इतर तीन वर्ण पुन्हां अस्तित्वांत आणले पाहिजेत. हल्लींचे हजारों भेद आणि पोटभेद कायम राखून व हल्लीं-च्या पद्धतीचें सोंवळें कडकपणें अमलांत आणून आपल्या मातृभूमीचें कांहीं कल्याण होईल असें तुह्मांस वाटतें काय? छे, छे! माझ्या मुला, अशानें आपलें कल्याण कधींही होणार नाहीं!

# उद्गार आणि बोधवचनें.

१. सृष्टीला जिंकण्यासाठीं मनुष्य अवतरला आहे. तिला नुसता अनुसरण्यासाठीं नव्हे.

२. आपण ह्मणजे देह असें आपणास वाटतें तेव्हां विश्वापासून आपण विभक्त असतों; मी ह्मणजे जीव असें आपणास वाटतें तेव्हां त्या प्रचंड आणि अनंत अग्नीचा एक स्फुलिंग आपण असतों; पण मी ह्मणजे आत्मा असें जेव्हां आपणास वाटतें तेव्हां आपण सर्वव्यापी होऊन बसतों.

३. इच्छा ही स्वतंत्र नाहीं; कारण आणि कार्य यांच्या शृंखलेंत बद्ध झालेली ती एक दृश्य ऊर्मी आहे; पण त्या इच्छेच्या मागें जें एक अस्तित्व आहे तें स्वतंत्र आहे.

४. चांगुलपणा आणि पावित्र्य यांतच सारें स्वातंत्र्य आहे.

५. विश्व ह्मणजे दृश्य झालेला परमात्मा.

६. आत्मश्रद्धा असल्यावांचून तुमच्या ठिकाणीं परमेश्वरावरील श्रद्धेचा उदय होणार नाहीं.

७. मी ह्मणजे देह असें वाटणें हाच भ्रम साऱ्या दुःखाचें मूळ आहे. आपलें पहिलें पातक ह्मणून कांहीं असेल तर तें हेंच.

८. जडवस्तूंच्या द्वारा विचार उत्पन्न होतो असें एका पक्षाचें ह्मणणें आहे. याच्या उलट विचारापासून जड वस्तु उत्पन्न होतात असें दुसरा पक्ष ह्मणतो. हीं दोन्ही विधानें चुकीचीं आहेत. जड वस्तु आणि विचार हीं बरोबरच जन्म पावलीं असून त्यांचें अस्तित्वही एकाच काळीं सुरू आहे. या दोहोंवांचून जें तिसरें एक आहे त्यापासून हीं दोन्ही उत्पन्न झालीं आहेत.

९. विस्तीर्ण आकाशांत ज्याप्रमाणें जड परमाणू संयोग पावतात त्याचप्रमाणें अनंत कालांत मनाचे विरल परमाणू संयोग पावतात.

१०. परमेश्वर ह्मणजे काय? परमेश्वराची व्याख्या करणें ह्मणजे पिष्टपेषण करणें होय. दळलेलें पीठ पुन्हां दळणें होय; कारण एवढयाच एका अस्तित्वाची जाणीव आपणास असते.

११. ज्या कल्पनेनें पशूचा मनुष्य होतो आणि मनुष्याचा परमेश्वर होतो ती कल्पना ह्मणजेच धर्म.

१२. अंतर्गत सृष्टीचा विस्तार ह्मणजेच बाह्य सृष्टि.

१३. आपल्या कामाची मोजदाद आपल्या हेतूवरून होते. आपण स्वतः परमेश्वरस्वरूप आहों आणि त्याचप्रमाणें अत्यंत क्षुद्र मनुष्यही परमेश्वरच आहे. या हेतूहून अधिक उच्च असा कोणता हेतू असूं शकेल?

१४. मनःसृष्टीचा अभ्यास करणाऱ्या मनुष्याचें मन बलवान् आणि सशास्त्र तयार झालें असलें पाहिजे.

१५. मन ह्मणजेच सर्व, अथवा विचार हेंच सर्वांचें सार असें वाटणें हा एक उच्च प्रकारचा जडवादच होय.

१६. हें जग एखाद्या तालीमखान्यासारखें असून स्वतःस बळकट करण्यासाठीं आपण येथें आलों आहों.

१७. झाड ज्याप्रमाणें तुह्मांस वाढवितां येत नाहीं, याचप्रमाणें लहान मुलाला तुह्मांला शिकवितां येत नाहीं. तुह्मीं जें कांहीं करूं शकतां तें फक्त नकारात्मक स्वरूपाचें असतें. तुह्मांस थोडासा हातभार मात्र लावतां येईल. वाढ ह्मणजे जें कांहीं अंतर्गत असतें, त्याचेंच स्पष्टीकरण. अंतर्गत मुग्ध स्वभाव तेथें स्पष्ट होत असतो. या स्पष्टीकरणांत जे अडथळे असतील तेवढेच दूर करणें तुह्मांस शक्य आहे.

१८. एखादा पंथ तुह्मी निर्माण केला ह्मणजे असें करणें विश्वबंधुत्वाविरुद्ध होतें. विश्वबंधुत्वाची कल्पना ज्यांच्या चित्तांत खरोखर रुजली आहे ते फारसे बोलके नसतात; तथापि त्यांचीं कृत्यें प्रचंड गर्जना करीत असतात.

१९. एकच सत्य हजारों निरनिराळ्या मार्गांनीं सांगतां येतें; आणि असें असतांही यांतील प्रत्येक मार्ग खरा असूं शकतो.

२०. तुमच्या अंतर्गत शक्तीचा विकास तुह्मांस करावयाचा आहे. या बाबींत तुह्मांस कोणी कांहीं शिकवूं शकणार नाहीं. धर्मप्रवृत्ति तुमच्या ठिकाणीं कोणीं नवी उत्पन्न करूं शकणार नाहीं. या बाबींत तुमचा स्वतःचा जीवात्मा हाच फक्त तुमचा गुरु आहे.

२१. एखाद्या अनंत सांखळींतील जर थोड्याशा दुव्यांचें स्पष्टीकरण करतां आलें तर त्याच रीतीनें सर्व सांखळीचें स्पष्टीकरण करतां येईल.

२२. कोणत्याही ऐहिक वस्तूनें ज्याच्या चित्ताची चलबिचल होत नाहीं, तोच अमृतत्त्व पावला आहे असें समजावें.

२३. सत्यासाठीं कोणत्याही वस्तूचा त्याग करतां येतो; पण सत्याचा त्याग कोणत्याही वस्तूसाठीं करतां येत नाहीं.

२४. सत्याच्या शोधार्थ यत्न करणें हें सामर्थ्याचें चिन्ह आहे. हें दुर्बळपणाचें अथवा आंधळ्याचें चांचपडणें नव्हे.

२५. मनुष्यरूपानें परमेश्वरच अवतरला आहे. मनुष्य पुन्हां परमेश्वरस्वरूप होईल.

२६. मनुष्य मरतो आणि स्वर्गास जातो असें ह्मणणें बालिशपणाचें आहे. आपण कधीं येत नाहीं अथवा जातही नाहीं. आपण जागच्या जागींच असतों. जितके जीवात्मे आजपर्यंत झाले, सध्यां अस्तित्वांत आहेत अथवा पुढें होतील ते सारे भूमितीच्या एका बिंदूंतच आहेत.

२७. ज्याच्या अंतःकरणाचा ग्रंथ उघडला गेला असेल त्याला इतर ग्रंथांची जरूर नाहीं. आपल्या ठिकाणीं पराविद्येची आवड उत्पन्न करणें एवढयाच दृष्टीनें ग्रंथांना किंमत आहे. ग्रंथ ह्मणजे इतरांचे अनुभव.

२८. जीवमात्राबद्दल मनांत दया बाळगा. जे संकटांत असतील त्यांच्याबद्दल सहानुकंपा असूंद्या. सर्वांवर प्रेम करा. कोणाचेंही नुकसान करूं नका. कोणाचेही दोष पाहूं नका.

२९. मनुष्य कधीं मरत नाहीं अथवा जन्मासही येत नाहीं. शरीर मरतें पण तो मरत नाहीं.

३०. कोणीही मनुष्य विशिष्ट धर्मात जन्मास आला एवढयानेंच भागतें असें नाहीं. प्रत्येक मनुष्य धर्माचा प्रत्यक्ष आचार करण्याकरितां जन्मास आलेला असतो.

३१. विश्वांत एकच सत्य आहे. बाकी जितकें दृश्य ह्मणून आहे तें सर्व त्याचेंच स्पष्ट स्वरूप आहे.

३२. परमेश्वराची आराधना करणाऱ्या लोकांत दोन प्रकार आहेत. एक प्रकार सामान्य लोकांचा. यांत बहुधा मोठा भरणा असतो. दुसरा प्रकार शूरांचा. हे लोक थोडे असतात.

३३. चालू परिस्थितींत आणि याच जीवितांत पूर्णत्व पावणें अशक्य असेल तर दुसऱ्या एखाद्या जन्मीं आपणास पूर्णत्व मिळवितां येईल या ह्मणण्यास कांहीं पुरावा नाहीं.

३४. मातीच्या लहानशा ढेकळाचें ज्ञान मला पूर्णत्वानें झालें तर सर्व मातीचें ज्ञान मला होतें. हीच गोष्ट तत्त्वज्ञानासही लागू आहे. तत्वाचें ज्ञान एका स्वरूपाचें असलें तरी परिस्थित्यनुरूप त्याचीं प्रत्यक्ष रूपें भिन्न होतात. तुह्मांस आत्मज्ञान झालें ह्मणजे तुह्मी सर्व जाणलें असें होतें.

३५. माझ्या स्वत:पुरतेंच बोलावयाचें ह्मटलें तर युक्त बुद्धीला वेदाचा जितका भाग जुळतो तितकाच मी घेतों. वेदांतील कित्येक भाग परस्पर-विरोधी आहेत हें सहज दिसून येण्यासारखें आहे. पाश्चात्यांच्या भाषेनें बोलावयाचें ह्मटलें तर वेद हे ईश्वरप्रणीत नसून परमेश्वरविषयक उपलब्ध असलेलें सर्व ज्ञान त्यांत सांठविलें आहे. प्रत्येक नव्या सृष्टीच्या आरंभीं हें ज्ञान व्यक्तदशेस येतें; आणि प्रलयाबरोबर तें सूक्ष्मरूप होऊन बसतें. नव्या सृष्टीस पुन्हा आरंभ झाला ह्मणजे हें ज्ञान पुन्हां व्यक्त होऊं लागतें. येथपर्यंत ही उपपत्ति ठीक आहे; पण हें ज्ञान फक्त वेदांतच सांठविलें आहे, असें ह्मणणें हठवादीपणाचें आहे. युक्त बुद्धीशीं जुळतील तेवढेच खरे वेद असून बाकीचा भाग त्याज्य आहे असें मनूनें एका ठिकाणीं ह्मटलें आहे. आमच्या पुष्कळ तत्त्ववेत्त्यांचें असेंच ह्मणणें आहे.

३६. वेदांचा अभ्यास करणें हें अत्यंत आवश्यक नसून तें केवळ दुसऱ्या प्रतीचें कर्तव्य आहे, असें फक्त वेदग्रंथांनींच स्पष्ट सांगितलें आहे. पृथ्वीवरील दुसऱ्या कोणत्याही धर्मग्रंथांत असें ह्मटलेलें नाहीं. जें काल-स्थलातीत आहे, त्याचा अनुभव घेणें हाच खरा अभ्यास. हें नुसता विश्वास ठेवून, नुसता बुद्धिवाद करून अथवा नुसत्या वाचनानें साध्य होत नाहीं. हें फक्त समाधीनेंच साध्य होतें.

३७. आपणही एके काळीं हलक्या प्रतीचे क्षुद्र जीव होतों. हलके प्राणी आपणाहून निराळे आहेत असें आपणास भ्रमानें वाटत होतें. "जग हें आमच्यासाठीं निर्माण झालेलें आहे" असें पाश्चात्यांनीं बोलतांना मी ऐकलें. वाघांना ग्रंथ लिहितां आले असते, तर मनुष्यें वाघासाठीं निर्माण झालीं आहेत असें त्यांनीं ह्मटलें असतें. वाघाच्या भक्ष्यस्थानीं सुलभतेनें

माणसें येऊन पडत नाहींत ह्मणून तीं पापी आहेत असेंही त्यांनीं लिहिलें असतें. तुमच्या पायाखालीं आज सरपटणारा किडा ह्मणजे भविष्यत् कालचा परमेश्वर होय.

३८. "स्त्रियांच्या बुद्धिमत्तेचा विकास व्हावा हें मला ठीक वाटतें, तथापि तसें करतांना जो बालिशपणा उत्पन्न होतो तो मात्र नको." न्यूयार्क येथें असतां स्वामीजी एकदां ह्मणाले होते, "येथल्या स्त्रियांच्या ठिकाणीं जें ज्ञान मला आढळून येतें, त्याबद्दल मी त्यांची तारीफ करतों; पण वाइटा-लाही चांगल्याचें स्वरूप देऊन त्याची स्तुति त्या करतात, तें मात्र मला आवडत नाहीं. बुद्धिमत्ता हें मनुष्याचें सारसर्वस्व नव्हे. नीतिमत्ता आणि धार्मिकपणा यासाठींच आपली धडपड चालली आहे. आमच्या हिंदु स्त्रिया इतक्या विद्वान् नाहींत. तथापि त्या अधिक पवित्र आहेत. आपल्या पती-शिवाय बाकीच्या सर्व पुरुषांकडे स्त्रीनें पुत्रभावानें अवलोकन करावें.

त्याचप्रमाणें प्रत्येक पुरुषानें आपल्या पत्नीशिवाय बाकी सर्व स्त्रिया माता समजाव्या. अमेरिकन समाजांत फिरत असतां मी त्यांच्या स्त्रीपुरु-षांची परस्परांशीं वर्तणूक पाहतों तेव्हां माझें अंत:करण तिरस्कारानें भरून जातें. ही स्त्री आणि हा पुरुष हा भेद दृष्टींतून जाऊन तुमची वागणूक परस्परांशीं केवळ मनुष्यत्वाच्या सामान्य नात्यानें होऊं लागेपर्यंत स्त्रियांची खरी वाढ होणार नाहीं. तोंपर्यंत स्त्रिया ह्मणजे पुरुषांचीं खेळणीं होऊन राहतील. याहून त्यांची अधिक किंमत असावयाची नाहीं. अमेरि-केंत इतके घटस्फोट होतात याचें कारण हेंच. अमेरिकन पुरुष स्त्रियांपुढें नमतात आणि बसण्यासाठीं खुर्ची पुढें करतात. पण लगेच ते त्यांची व्याजस्तुतीही करूं लागतात. ते ह्मणतात, 'बाईसाहेब, आपले नेत्र किती सुंदर आहेत.' असलीं भाषणें करण्यास वास्तविक त्यांस काय अधिकार आहे? परकी स्त्रियांकडे इतक्या खोलपणें पाहण्याची त्यांची छाती तरी कशी होते? आणि स्त्रियांना तरी हें कसें आवडतें हें मला समजत नाहीं. अशा वागणुकीमुळें मनुष्यांतील पशुवृत्ति वाढीस लागते व यामुळें मनुष्याचा स्वभाव अधिकाधिक उदात्त होत जात नाहीं. अशा वागणुकीनें कमकुवत झालेलें मन उदात्त विचारांकडे वळूंसुद्धां शकत नाहीं.

आपण स्त्रीपुरुषें आहों ही भावनाच आपण सोडून द्यावी. आपण केवळ मनुष्यें असून एकमेकांस मदत करण्यासाठीं जन्मलों आहों असें आपण आपल्या चित्तांत नित्य वागवीत जावें. एखाद्या तरुणाची एखाद्या तरुणीशीं एकीकडे गांठ पडली कीं तिच्या स्तुतीस त्यानें आरंभ केलाच. प्रत्यक्ष विवाह होईपर्यंत किमान पक्ष दोनशें स्त्रियांबरोबर तरी त्यानें थट्टा-मस्करी केली असेल. मला लग्न करावयाचें असतें, तर जिला या असल्या गोष्टींचा गंधही नाहीं, अशी स्त्री मी शोधून काढली असती.

मी हिंदुस्थानांत होतों तेव्हां तेथेंही असले देखावे मला बाहेरून दिसत; आणि यांत कांहीं विशेष नाहीं असें लोक मला सांगत. मला तेव्हां तें खरें वाटे; पण त्यानंतर मी प्रवास केला आणि आतां असली वर्तणूक चांगली नाहीं हें माझ्या लक्ष्यांत आलें. ही वर्तणूक खरोखरच गर्हणीय आहे. तुह्मीं पाश्चात्य लोक हट्टानें डोळे मिटून घेतां आणि असल्या वागणुकीची स्तुति करीत सुटतां. पाश्चात्य राष्ट्रें अद्यापि तरुण, मूर्ख, अस्थिर स्वभावांचीं आणि द्रव्यवान् आहेत: येथेंच सारें नडतें. यांतला एकेकही गुण मोठी हानि करण्यास पुरेसा आहे. या साऱ्यांचा समवाय जेथें असेल, तेथें केवढे अनर्थ कोसळावे याचा तुह्मीच विचार करा आणि सावध रहा.

सर्व अमेरिकेंत बोस्टनइतकें दुसरें वाईट शहर नाहीं. तिथल्या साऱ्यां बायका कसल्या तरी नादाच्या मागें असतात. सर्वांची वृत्ति उथळ. कोणताही नवा विक्षिप्तपणा आढळला कीं त्याच्यामागें त्या धांवत सुटतात.

३९. आपल्या संस्कृतीची ज्या देशाला एवढी मोठी व्यर्थ घमेंड वाटते, त्या असल्या देशांत खरा धार्मिकपणा आढळण्याची आशाच नको.

४०. ऐहिक आणि पारलौकिक हे शब्द मुलांना भिवविण्यापुरतेच उपयोगी आहेत; वास्तविक असा भेदच नाहीं. जें कांहीं आहे तें सर्व येथेंच आहे. तुह्माला परमेश्वरस्वरूपच व्हावयाचें असेल, याच देहांत तुह्मांस मुक्ति मिळवावयाची असेल, तर सर्व अहंकार नाहींसा करा, सर्व भोळसटपणा झुगारून द्या. हिंदुस्थानांत आज असे लोक जिवंत आहेत. असे लोक तुमच्या देशांत ( अमेरिकेंत ) कोठें आहेत? हिंदु लोक स्वप्नसृष्टीच्या मागें धांवतात असा आक्षेप तुमचे पाद्री घेतात. खरोखर तुमचे लोक स्वप्नसृष्टीमागें आह्मांहूनही अधिक प्रमाणानें धांवले असते तर बरें झालें असतें.

आमची स्वप्नसृष्टि आणि एकोणिसाव्या शतकाचा तुमचा वाचाळपणा यांत फार अंतर आहे. सर्व जगांत ईश्वर भरून उरला आहे, त्यांत पातकास कोठेंही जागा नाहीं. आपण सर्वांनीं परस्परांस मदत करावी आणि परस्परांवर प्रेम करावें.

४१. कनक, कामिनी अथवा कीर्ति यांपैकीं कोणाच्याहि जाळ्यांत न गुरफटतां माझ्या गुरूप्रमाणेंच मला खऱ्या संन्याशाचें मरण यावें अशी माझी इच्छा आहे. या सर्वांत कीर्तीची आवड टाळण्यास मोठी कठीण आहे.

४२. दुसऱ्याला अपकार करावा असें माझें केव्हांच ह्मणणें नव्हतें. सामर्थ्यवान् व्हा, इतकेंच माझें सांगणें आहे. समुद्राचे तुषार अंगावर उडाले ह्मणून त्यांजवर आपण रागावून त्यांचा सूड घेतों काय? पण एखाद्या मशकाला हेच तुषार आपणासारखे क्षुद्र वाटत नाहींत. त्याच्या दृष्टीनें तेच त्याला मोठे दिसत असतात.

४३. अमेरिका हा फार चांगला देश आहे; तथापि मला तेथें राहणें आवडणार नाहीं. अमेरिकन लोक सदोदित पैशाचें चिंतन करीत असतात. सर्वांपूर्वी त्यांस पैसा आठवतो. तुमच्या देशाला ( अमेरिकेला ) अद्यापि पुष्कळ गोष्टी शिकावयाच्या आहेत. तुह्मी आह्माइतके वृद्ध झालां ह्मणजे तुह्माला हल्लींहून अधिक शहाणपणा येईल.

४४. जुनें वस्त्र फेंकून दिल्याप्रमाणें हा देहही टाकून देणें मला कदाचित् बरें वाटेल; तथापि त्यामुळें माझें कर्तव्य थांबणार नाहीं. सर्व ठिकाणीं जाऊन मी मनुष्यांना चैतन्य देईन. सृष्टि आणि परमेश्वर हीं वस्तुतः एकरूपच आहेत, हा सिद्धांत सर्वांस पटेपर्यंत मी कार्य करीत राहीन.

४५. माझें जें आज कांहीं स्वरूप आहे आणि सर्व जगाला जें एका दिवशीं प्राप्त होणारें आहे, तें सर्व माझे सद्गुरु श्रीरामकृष्ण यांच्या आशिर्वादाचें फळ आहे. श्रीरामकृष्णांनीं हिंदु, इस्लाम आणि ख्रिस्ती या तिन्ही धर्मांचा अनुभव घेऊन या सर्वांची अंतिम एकवाक्यता अनुभविली, आचरून दाखविली आणि लोकांसही शिकविली.

४६. तुह्मी जिव्हेला मोकळी सोडली ह्मणजे बाकीच्या इंद्रियांचा लगामही ढिला पडून तीं वाटेल तिकडे भडकतील.

४७. ज्ञान, भक्ति, योग आणि कर्म हे मुक्तीचे चार मार्ग आहेत. ज्याला जो बरोबर अनुकूल वाटेल तो त्यानें घ्यावा; तथापि सांप्रतच्या युगांत कर्मयोगावर विशेष भर दिला पाहिजे.

४८. धर्म ही काल्पनिक वस्तु नव्हे. तिचा प्रत्यक्ष अनुभव घ्यावयाचा आहे. ज्याला अनुभवाचा यत्किंचित् तरी अंश प्राप्त झाला असेल, तो पुष्कळ पुस्तकी पंडितांपेक्षां अधिक मोठा होईल.

४९. एके वेळीं स्वामीजी एका गृहस्थाची फार स्तुति करीत होते. ती ऐकून शेजारचा गृहस्थ त्यांस ह्मणाला, ' पण महाराज, आपल्यावर त्याचा विश्वास नाहीं. ' हें ऐकून स्वामीजी एकदम ह्मणाले त्यानें मजवर विश्वास ठेवावा असें कायद्याचें एखादें कलम आहे काय ? तो सत्कर्म आचरीत आहे आणि त्या अर्थी तो स्तुतीस पात्रच आहे.

५०. खऱ्या धर्माच्या हद्दींत शिरावयास पुस्तकी पंडितगिरीस अधिकार नाहीं.

५१. एखाद्या धर्मपंथांत लक्ष्मीपुत्रांच्या पूजेस सुरवात झाली कीं त्या पंथाचा अवतार आटोपलाच ह्मणून समजावें.

५२. तुह्मांला कांहीं वाईट काम करावयाचें असेल, तर आपणाहून अधिक अधिकार असलेल्या लोकांसमोर तें करीत जा.

५३. कोणतेंही पुस्तक वाचल्यावांचून केवळ सद्गुरूच्या कृपेनें शिष्य पंडित होतो.

५४. हिंदु धर्म इतर लोकांस आपणाकडे बोलावीत नाहीं असा त्याजवर आक्षेप आहे; पण बुद्धानें ज्याप्रमाणें इतर पौर्वात्यांस परमेश्वराचा संदेश सांगितला, त्याचप्रमाणें पाश्चात्य लोकांस तो मला सांगावयाचा आहे.

५५. पाप आणि पुण्य हीं दोन्ही खोटीं आहेत. जें कांहीं आहे तें अज्ञान हेंच. अद्वैतभावाचा प्रत्यक्ष अनुभव आला ह्मणजे हें अज्ञान नाहींसें होतें.

५६. अनेक प्रकारच्या धार्मिक चळवळी एकाच वेळीं जन्मास येत असतात. यांतील प्रत्येक इतरांस मागें सारून स्वतः पुढें सरसावूं पाहत असते; पण यांतील एकच दिवसेंदिवस बळावत जाते, आणि अखेरीस बाकीच्या चळवळींस नामशेष करून स्वतः शिल्लक राहते.

५७. स्वामीजी रामनद येथें असतां एका खासगी भाषणांत ह्मणाले, राम ह्मणजे परमात्मा असून सीता जीवात्मा आहे. त्याचप्रमाणें शरीर हें लंका आहे. जीवात्मा शरिरांत ह्मणजे लंकेच्या बेटांत कैदेंत पडला असून परमात्म्याशीं ह्मणजे श्रीरामाशीं ऐक्य पावण्याची इच्छा करीत आहे. पण राक्षस ह्मणजे दुर्गुण ही भेट होऊं देत नाहींत. बिभीषण ह्मणजे सत्वगुण, रावण ह्मणजे रजोगुण आणि कुंभकर्ण ह्मणजे तमोगुण. सत्त्वगुण ह्मणजे चांगुलपणा, रजोगुण ह्मणजे इंद्रियजन्य सुखांची लालसा आणि कनककामिनीची इच्छा, आणि तमोगुण ह्मणजे निबिड अंधकार, लोभ, दुष्टपणा आणि तज्जन्य इतर दुर्गुण. हे दुर्गुण लंकेंत ह्मणजे शरिरांत असलेल्या जीवात्म्याची ह्मणजे सीतेची परमात्म्याशीं ह्मणजे रामाशीं भेट होऊं देत नाहींत. अशा रीतीनें बंदिवासांत सांपडलेल्या सीतेला हनुमान भेटतो. हनुमान ह्मणजे सद्गुरु. तो तिला रामाची आंगठी दाखवतो. ती आंगठी ह्मणजे ब्रह्मज्ञान. या आंगठीच्या दर्शनाबरोबर सर्व भ्रम लयास जातो, आणि अशा रीतीनें सीता–रामाची ह्मणजे जीवात्मा–परमात्याची भेट होते.

५८. जो अस्सल ख्रिस्ती असतो तो खरा हिंदूही असतो, आणि जो अस्सल हिंदु असतो, तो खरा ख्रिस्तीही असतो.

५९. समाजरचनेंत जे हितकर फेरफार होत असतात ते समाजाच्या जिवंत धार्मिकबुद्धीचे द्योतक होत. ही बुद्धि अशीच बळकट राहील व तिला योग्य दिशा आगली तर समाज योग्य मार्गानें आपली वाढ करून घेईल. स्वतःच्या मुक्तीसाठीं स्वतःच खटपट केली पाहिजे. येथें दुसऱ्याची मदत कामीं पडत नाहीं. ही गोष्ट ज्याप्रमाणें एका व्यक्तीला त्याचप्रमाणें राष्ट्रांनाही लागू आहे. कोणत्याही राष्ट्रांत ज्या कांहीं मोठया संस्था अस्तित्वांत असतात, त्यांच्या जिवंतपणावरच राष्ट्राचेंही जीवित अवलंबून असतें. यामुळें एका राष्ट्राच्या संस्था दुसऱ्या राष्ट्राच्या मुशींत ओतून त्यांत तदनुरूप फेरफार करणें शक्य नाहीं. अधिक उच्चप्रतीच्या संस्था निर्माण होण्यापूर्वीं जुन्या मोडून टाकण्याचा यत्न करणें हें अनर्थकारक आहे. कोणतीही वाढ हळू हळूच होत जाते.

कोणत्याही संस्थांतील उणेपणा दाखविणें हें फार सोपें काम आहे; कारण सर्व मानवी कृती कमी अधिक प्रमाणानें उण्या असतात; पण एखाद्या

मनुष्याला तरी पूर्णत्व पावण्यास जो कोणी मदत करतो तोच मनुष्य जातीचा खरा हितकर्ता होय. व्यक्तीची सुधारणा झाली ह्मणजे त्याबरोबरच राष्ट्राची आणि राष्ट्रांतील संस्थांची सुधारणा होत जाते; सद्गुणांची वाढ झाली ह्मणजे वाईट चालीरीती आणि कायदे यांचा विसर आपोआपच पडतो. अशा स्थितींत प्रेमाचा विश्वव्यापी कायदा त्या कायद्यांच्या जागीं येतो आणि सहानुकंपा व विश्वास हीं उत्पन्न होतात. ज्या देशांत कायद्यांचीं पुस्तकें अत्यंत कमी तो देश सुखी होय. त्या देशाला ह्या अथवा त्या संस्थेच्या बऱ्यावाईटपणाबद्दल डोकेफोड करण्याचें कारण नसतें. सत्पुरुष असतात ते कायद्याच्या मर्यादेबाहेर जातात; आणि कोणत्याही स्थितींत असलेल्या आपल्या बांधवांस वर येण्यास मदत करतात.

याकरितां हिंदुस्थानचें कल्याण व्यक्तीवर अवलंबून आहे. आपण वस्तुतः परमेश्वरस्वरूप आहों या खुणेचा अनुभव प्रत्येक व्यक्तीनें घेतला ह्मणजे साऱ्या देशाचें कल्याण आपोआपच होतें.

६०. संन्यासी ह्मणजे काय? असा प्रश्न उपस्थित झाला असतां स्वामीजींनीं पुढील उत्तर दिलें:—

ज्या वेळीं जन्मतः प्राप्त झालेलीं आपलीं सारीं कर्तव्यें मनुष्य पार पाडितो आणि ज्या वेळीं सत्ता, कीर्ति आणि इतर लौकिक संपत्ति हीं त्याला तुच्छ वाटूं लागतात; तसेंच जगाचें अंतःस्वरूप कळल्यामुळें त्याची क्षणभंगुरता ज्याच्या प्रत्ययास आली आहे, तसेंच जगांतील तंटेबखेडे, त्यांतील सुखदुःखें आणि त्यांतील तुच्छ विषय यांजपासून पराङ्मुख होऊन जो सत्य आणि पराभक्ति शोधूं लागला आहे, तो संन्यासी. असा मनुष्य आपल्या लौकिकसर्वस्वावर पाणी सोडतो आणि अंतःकरणांत त्यागी बनून सर्व जगभर फिरत असतो. धार्मिक ज्ञानाची प्राप्ति करून घेणें हें एकच कार्य तो करतो. भक्ति आणि दया यांत पूर्णत्व पावण्यासाठीं तो खटपट करतो व चिरस्थायी विवेकबुद्धी संपादण्याचा तो उद्योग करतो. कित्येक वर्षांच्या ध्यानानें, इंद्रियनिग्रहानें आणि शोधकबुद्धीनें हीं ज्ञानमौक्तिकें त्याला प्राप्त होतात आणि मग तो स्वतः सद्गुरूच्या पदावर आरूढ होतो व ज्ञानार्जनासाठीं आपणाकडे येणाऱ्या शिष्यांस हीं मौक्तिकें तो देतो.

स्वा. वि. खं. ६–१९.

संन्यासी अमुक एक धर्माचा आहे असें ह्मणतां येत नाहीं. कारण, त्याचा सारा आयुष्यक्रम स्वावलंबी झालेला असतो. त्याची बुद्धि सर्व धर्मांचें शोधन करीत असते. त्याचा आयुष्यक्रम ह्मणजे प्रत्यक्ष अनुभवाचा मार्ग असतो. त्यांत नुसती उपपत्ति नसते. त्यांत आंधळा विश्वास नसतो अथवा त्यांत हठवादही नसतो.



# खासगी पत्रें.

## पत्र ४२ वें.

प्रिय— शिकागो, २८ डिसेंबर १८९३.

शिकागो येथें झालेल्या माझ्या व्याख्यानांची बातमी हिंदुस्थानांतील पत्रांत आली आहे ही मोठया नवलाची गोष्ट होय; कारण मी जें कांहीं करतों त्याचा गाजावाजा होऊं नये अशासाठीं मी फार प्रयत्न करीत असतों. या देशांतील कित्येक गोष्टी मला फारच मनोवेधक वाटल्या. या देशांत दारिद्याला वस्तुत: अस्तित्वच नाहीं असें ह्मटलें तरी चालेल. येथल्या इतक्या सुविनीत आणि सुशिक्षित स्त्रिया मला यापूर्वीं दुसऱ्या कोठेंही आढळल्या नाहींत. आपल्या देशांत सुशिक्षित पुरुष बरेच आढळतात, पण येथल्या सारख्या स्त्रिया मात्र बहुधा कोठेंच आढळावयाच्या नाहींत. सद्गुणी मनुष्यांच्या घरांत प्रत्यक्ष देवतांचाच वास असतो असें ह्मणतात तें अगदीं खरें आहे. निष्पाप आणि अगदीं शुद्ध अंत:करणाच्या अशा हजारों स्त्रिया मला येथें आढळल्या आहेत. अहाहा! त्या स्वभावानें तरी किती मोकळ्या! सामाजिक कामांवर स्त्रियांची देखरेख येथें असते. शाळा आणि कॉलेजें स्त्रियांनीं भरून गेलेलीं आढळतात; आणि आमच्या देशांत बिचाऱ्या स्त्रियांना रस्त्यांतून सुद्धां निर्भयपणें जाण्याची मारामार! माझ्याशीं येथल्या स्त्रियांची वर्तणूक इतकी दयाळुपणाची आहे कीं खरोखर तिचें मोल करतां येत नाहीं. आपल्या घरीं बोलावून सर्वप्रकारें त्या माझें आदरातिथ्य करीत असतात. माझ्या खाण्यापिण्याची सोय त्यांनींच लावली आहे. व्याख्यानांचीही सर्व व्यवस्था त्याच करतात; त्याच मला बाजारांत घेऊन जातात आणि माझ्या सुखसोईची सर्व व्यवस्था त्याच करतात. त्यांनीं केलेल्या साऱ्या उपकारांचें ऋण अंशत:सुद्धां माझ्या हातून कधींही फिटणार नाहीं.

खरा शक्तिउपासक कोण हें तुह्मांला ठाऊक आहे काय? विश्वांत परमेश्वर हा सर्वव्यापी चालक असून तो आपली शक्ति स्त्रियांच्या द्वारें प्रकट

करतो असें जो जाणतो तोच खरा शक्तिउपासक. स्त्रियांकडे या दृष्टीनें अवलोकन करणारे पुष्कळ पुरुष येथें आढळतात; ' **यत्र नार्यस्तु पूज्यन्ते रमन्ते तत्र देवताः** ' असें भगवान् मनूंनींही ह्मटलें आहे. येथें स्त्रियांस शक्य तितक्या चांगल्या रीतीनें वागविण्यांत येतें, यामुळेंच त्यांची भरभराट होत असून येथें विद्वत्त्व, स्वातंत्र्य आणि उमेद यांचें वास्तव्य आढळून येतें. उलटपक्षीं आह्मी गुलामासारखे दुःखी, कष्टी आणि मृत्पिंड कां बनलों आहों या प्रश्नाचें उत्तर उघडच आहे.

येथील स्त्रिया सच्छील तरी किती ह्मणून सांगूं ? वीस पंचवीस वर्षांच्या खालीं बहुधा त्यांचीं लग्नें होत नाहींत. इतस्ततः स्वच्छंदानें संचार करणाऱ्या पक्ष्यांप्रमाणें त्या मोकळेपणीं फिरत असतात. त्या बाजारांत जातात, शाळांत आणि कॉलेजांत जातात, पैसे मिळवितात आणि सर्व प्रकारचीं कामेंही करितात. ज्या घरच्या श्रीमंत आहेत. त्या गरिबांच्या बऱ्यासाठीं उद्योग करीत असतात; आणि आह्मी काय करीत आहोंत ? आमच्या मुली बिघडूं नयेत आणि कुमार्गगामी होऊं नयेत ह्मणून अकराव्या वर्षी त्यांचीं लग्नें लावून टाकण्यांत मात्र आह्मी सदोदित उत्सुक असतों ! "मुलांप्रमाणें मुलींचीही जोपासना करून त्यांस शिक्षण द्यावें " असें भगवान् मनूंचें सांगणें आहे. तीस वर्षांपर्यंत ब्रह्मचर्य पाळणें पुरुषांस जसें आवश्यक आहे तसेंच स्त्रियांसही तें आवश्यक आहे. त्याचप्रमाणें स्त्रियांस शिक्षण देणें हेंही त्यांच्या आईबापांचें कर्तव्य आहे. आमच्या पूर्वकालीन् ऋषींनीं केलेल्या या आज्ञा आह्मी व्यवहारांत कशा पाळतों या प्रश्नाचें उत्तर देण्याचें कारणच नाहीं. तुमच्या स्त्रियांची परिस्थिति हल्लींच्याहून अधिक बरी करण्याचें तुह्मांस साधत नाहीं काय ? तसें झालें तरच तुह्मांस तुमच्या कल्याणाची आशा आहे. नाहींतर आतां आहांत असेच साऱ्या जन्मभर तुह्मी मागसलेले रहाल.

आपल्या देशांत यदृच्छेनें एकाद्याचा जन्म हलक्या जातींत झाला कीं सारा जन्म तो वायां गेलाच. मग त्या बिचाऱ्याला कसलीही आशा नाहीं. हा जुलूम तरी कोणत्या रीतीचा ? या देशांत प्रत्येक मनुष्याला भावी उन्नतीची आशा वाटत असते. तसें करण्यास त्याला संधि प्राप्त होते. आज तो गरीब असला तर उद्यां तो लक्ष्मीपुत्र बनतो. तो विद्वान् होऊं शकतो आणि

त्याची सर्वत्र मान्यता होते. गरिबांना मदत करण्यास येथें प्रत्येकाचा पुढें पाय असतो; 'आह्मी गरीब आहों' असा टाहो हिंदुस्थानांत सर्वत्र आढळून येतो. पण गरीबांच्या कल्याणासाठीं निर्माण झालेल्या संस्था कितीशा आहेत? हिंदुस्थानांतील लक्षावधि भिकाऱ्यांच्या आपत्तीनें ज्यांच्या डोळ्यांतून अश्रुधारा वाहतात असे लोक तेथें कितीसे आहेत? आपण खरोखर मनुष्य तरी आहों काय? त्यांना दोन घांस अन्न मिळावें आणि त्यांची स्थिति सुधारावी ह्मणून आह्मी कोणता उद्योग करीत असतों? त्यांचा नुसता स्पर्श झाला तर आह्मांस विटाळ होतो. त्यांनीं आमच्या जवळपाससुद्धां येऊं नये यासाठीं आमची सारी धडपड! खरोखर आह्मी मनुष्य नाहीं. पायाखालीं तुडविले गेलेल्या लक्षावधि लोकांसाठीं ते हजारों ब्राह्मण काय करीत आहेत? 'विटाळ' 'विटाळ,' एवढाच जप ते घेऊन बसले आहेत. असल्या लोकांच्या हातीं आमचा सनातन धर्म सांपडल्यामुळें त्या बिचाऱ्याची आज माती होऊन गेली आहे. आमचा सारा धर्म 'विटाळ' या एकाच शब्दांत सध्यां येऊन बसला आहे. त्याचें दुसरें कोणतेंही स्वरूप आह्मांमध्यें अस्तित्वांत नाहीं.

चार देश हिंडून मन रिझवावें ह्मणून मी येथें आलों नाहीं. येथें येण्यांत मला कीर्तीचीही लालसा नव्हती. आपल्या देशांतील गरिबांची स्थिति सुधारण्यास कोठें मदत मिळेल कीं काय, हें पाहण्याकरितां मी येथें आलों. परमेश्वराची कृपा असली तर माझीं हीं साधनें काय आहेत याचा उलगडा हळूहळू तुह्मांस होईलच. धर्माच्या बाबतींत ह्मणाल तर अमेरिकन लोक आमच्या पासंगासही पुरावयाचे नाहींत. पण त्यांची समाजरचना आमच्यापेक्षां कितीतरी पटीनें श्रेष्ठ आहे. आमचा धर्म आपण त्यांस शिकवूं आणि त्याच्या मोबदल्यांत त्यांच्या समाजांतील उत्तमोत्तम भाग आपण शिकूं.

आपला,

—विवेकानंद.